# विश्वनाथ काशिनाथ राजवाडे

## व्यक्तित्व कर्तृत्व व विचार

प्रा. श. श्री. पुराणिक



# विश्वनाथ काशिनाथ राजवाडे

( व्यक्तित्व, कर्तृत्व व विचार )

प्रा. श. श्री. पुराणिक

रविराज प्रकाशन / पुणे ३०

पहिली आवृत्ती
ऑगस्ट १९८९

प्रकाशक
रवि बेहेरे
रविराज प्रकाशन
४५८।२ सदाशिव पेठ,
पुणे ४११०३०



मुखपृष्ठ
चंद्रमोहन कुलकर्णी

प्रकाशन क्रमांक / ९०

मुद्रक
रवि बेहेरे
रविराज प्रिंटरी
६३४ बुधवार पेठ
पुणे ४११ ००२

मूल्य
पासष्ठ रुपये

माझे
दिवंगत
परमस्नेही
कै. दत्तात्रय महादेव गद्रे
यांस

# विषयानुक्रमणिका

राजवाडे यांच्या वडिलांचा चुलता पेशवाईच्या पडत्या काळात लोहगडचा किल्लेदार होता. पण पेशवाई मावळली आणि पेशवाई-बरोबर किल्लेदारीचे वैभवही मावळले. जिकडे–तिकडे इंग्रजी राज्य झाले आणि राजवाडे मंडळींना साहेबांच्या राज्यात शोभतील आणि पचतील असे धंदे करण्याची वेळ आली. राजवाडे यांचे वडील काशि-नाथपंत हे पुण्याला वकिली करू लागले. आणि त्यांचे बंधू जगन्नाथ बापूजी राजवाडे हे पुणे जिल्ह्यात वडगावी मराठी वकील झाले. राजवाडे यांच्या आईचे नाव यमुनाबाई. तिचे माहेर कोकणात वर-सई येथे होते. वरसईला राजवाडे यांचा जन्म आषाढ शुद्ध अष्टमी शके १७८५, २४ जून १८६३ रोजी दुपारी बारा वाजता झाला. त्यांना एक मोठा भाऊ होता- त्याचे नाव वैजनाथ. तो राजवाडे यांच्यापेक्षा चार वर्षांनी मोठा होता.

पित्याचे छत्र राजवाडे यांना फार दिवस लाभले नाही. ते लहान असतानाच, त्यांच्या चवथ्या वर्षी त्यांचे वडील वारले, घरात कर्ता आणि मिळवता माणूस तोच. तोच गेल्यामुळे त्या कुटुंबावर मोठाच कहर गुदरला. वादळ सुरू व्हावे आणि घरावरचे छप्पर उडून जावे तसे झाले. काही दिवस त्यांची आई दोन मुलांना घेऊन माहेरी वडिलांकडे जाऊन राहिली, काही दिवस वडगावला तिने दिराकडे काढले. पण असे फार दिवस चालणे कठीण होते. मुलांच्या शिक्षणाचे काही पाहणे जरूर होते. म्हणून ती अखेरी पुण्याला फुटक्या बुरुजा-जवळ जोगळेकरांच्या वाड्यात येऊन राहिली. त्यावेळी त्यांची स्थिती चांगली नव्हती. राजवाडे यांचे स्नेही मिरजेचे गोगटे मास्तर एकदा त्यांच्याकडे त्या दिवसात गेले होते. ते म्हणतात, त्यांची घरची स्थिती चांगली नव्हती. दोघे बंधु विश्वनाथ व वैजनाथ एका खोलीत वाचीत

बसले होते. वैजनाथपंतांच्या एका आरामखुर्चीशिवाय दुसरे काहीएक सामानसुमान त्या खोलीत नव्हते. जोगळेकरांच्या वाड्यातली बिऱ्हाडाची जागा व सामानसुमान यावरून त्यांच्या गृहपरिस्थितीची कल्पना येईल. परंतु दारिद्रय जरी असले तरी स्वस्ताई कमालीची होती आणि काशिनाथपंत जरी फार श्रीमंत वकील नसले तरी वकिलीत त्यांनी थोडीफार माया केली होती, त्यामुळे या संचित धनावर त्या सुबत्तेच्या काळात थोडीथोडकी नव्हे तर वीस वर्षे त्यांच्या आईने निभावून नेली. १८८७ साली, मोठे चिरंजीव वैजनाथपंत यांना कराचीच्या कॉलेजात प्रोफेसरची नोकरी मिळाली आणि या कुटुंबाची दारिद्रयातून एकदाची सुटका झाली. ते शिकत असतानाही त्यांचा भार कुटुंबाला असा फारसा नव्हताच. त्यांना शाळेत बक्षिसे मिळत, फीची सवलत मिळे आणि डेक्कन कॉलेजात तर त्यांना स्कॉलरशिपच मिळत होती. त्या काळात डेक्कन कॉलेजात सारा खर्च दरमाणशी दरमहा किती येत असेल म्हणाल, तर फक्त आठ रुपये !

राजवाडे लहानपणी अतिशय तेजस्वी व सुरेख दिसत. ते वर्णाने गोरेपान होते आणि वयाच्या पाचव्या वर्षापर्यंत आईच्या अंगावर पोसले गेल्यामुळे ते चांगले भरदार दिसत. त्यांच्या आईचे व आजीचे त्यांच्यावर फार प्रेम होते. त्यात काही विशेष नाही. पण शेजारपाजारची माणसेसुद्धा त्यांची मुखश्री पाहून मोठी प्रसन्न होत आणि म्हणत की, 'हा कुटुंबाचे साकडे फेडील.' मनुष्याचा चेहरा हेच त्याचे शिफारसपत्र. वडील वारल्यामुळे बापाचा धाक नाही आणि घरात आई आणि आजीचे रामराज्य, त्यामुळे राजवाडे यांना अडपता दडपता कोणीच नव्हता. त्यामुळे आधीच सुखाचा असलेला त्यांचा बाळपणीचा काळ फारच सुखात गेला. नदीवर पोहावयास जाणे, झाडावर चढणे, गावभर हिंडणे यात त्यांचे लहानपण गेलें. पोहण्याचा, तालीम करण्याचा आणि कुरापती काढण्याचा, मारामाऱ्या करण्याचा षोक फार. मोरोबादादाच्या वाड्यात एक हिरवा हौद होता. त्यात शंभर वेळा उड्या मारून त्यांनी पहिले बक्षीस मिळविले होते. एकदा पर्वतीला जात असताना एक तालीमबाज पोरांचे टोळके भेटले. त्याची

आणि राजवाड्यांची काही बोलाचाली झाली तेव्हा मागचापुढचा काही एक विचार न करता राजवाडे एकटे त्या पोरांवर तुटून पडले. तेवढ्यात पर्वतीवरून परत येणाऱ्या काही लोकांनी ती मारामारी सोडविली. ' दिधले दुःख पराने उसने फेडू नयेचि, सोसावे ' असला गरीबपणा राजवाड्यांच्या रक्तातच नव्हता. त्यांची कोणी खोडी काढली तर खुनशीपणाने तो डूक ते मनात ठेवीत आणि संधी साधून त्याची खोड मोडल्याशिवाय राहत नसत. पुण्याला जोगेश्वरीच्या बोळात भिडे यांच्या वाड्यात राजवाड्यांची बहीण राहात होती. राजवाडे कधीमधी तिच्याकडे राहण्यास जात. या वाड्याच्या मालकाचा गणपती नावाचा एक मोठा व्रात्य मुलगा होता. त्या मुलाने राजवाड्यांचे पाय, त्यांना नकळत ओढून, त्यांना खाली पाडले. ते राजवाड्यांनी लक्षात ठेवले आणि वेळ आली तेव्हा त्या व्रात्य गणपतीचे पाय ओढून त्यांनीही त्याला खाली पाडले. स्वभाव रागीट व फटकळ. आत–बाहेर काही नाही. मनात येईल ते बोलायचे व मनात येईल तसे वागायचे. विकारावर ताबा बिलकूल नाही. जेवण मनासारखे झाले नाही, किंचित हेळसांड झाली की तोंडाचा तोफखाना सुरू, मग समोर आई असो की आजी असो की आणखी कोणी असो. थोडा संशय आला किंवा थोडे बिघडले की समोरच्या माणसाला मारायला धावत. अनेक वेळा मोठे बंधू मध्ये पडून ती मारामारी सोडवीत. एकदा संध्याकाळी काळोखात दोघे भाऊ उखळीभोवती घिरट्या घालण्याचा खेळ खेळत होते. खेळता खेळता ती उखळी त्यांच्या भावाच्या पायावर पडली आणि त्याला फार लागले. तेव्हा साहजिकच त्यांच्या आईने त्यांना बेदम मार दिला. तेव्हापासून त्यांचा स्वभाव अतिशय संशयी बनला. खोडसाळपणा तर इतका की, आंधळ्या आजीला घेऊन येताना अर्ध्या वाटेत तिला ते सोडून देत, व लपून बसत आणि मला सोडून देऊ नकोस रे, अशी तिने केविलवाणी आरडाओरड केल्यावर प्रकट होत. कोणी घोरताना पाहिले की स्वारीला खदखदा हसू येई. इतके की, ते त्यांना आवरत नसे. एकदा तर काय होते ते पाहावे या जिज्ञासेने त्यांनी वाळत घातलेल्या धोत-

राला काडीने आग लावून दिली. सगळी वृत्ती केवळ 'बालोन्मत्त पिशाचवत्' अशी होती. त्यांच्या या वृत्तीला अनुलक्षूनच त्यांची आई व आजी त्यांना 'आग्या वेताळ' असे म्हणत असत. महाभारतात एक श्लोक आहे, 'यथा धेनुसहस्रेषु वत्सो विंदति मातरम्। एवं पूर्वकृत कर्म कर्तारमनुगच्छति ॥'–हजारो गाईतून वासरू आपल्या आईला नेमके ओळखते, त्याप्रमाणे पूर्वी केलेले कर्म कर्त्याच्या मागोमाग बरोबर जाते. ज्याप्रमाणे वासरू गाईला ओळखते, त्या-प्रमाणे गाय वासराला ओळखते आणि आई मुलाला ओळखते. आई-इतकी मुलाच्या स्वभावाची पारख कोणालाच नसते, राजवाड्यांच्या आईने आपल्या 'वारा प्यायलेल्या वासराचा स्वभाव किती बरोबर ओळखला होता हे तिने राजवाड्यांना दिलेल्या 'आग्या वेताळ' या किताबावरूनच समजते. या श्लोकांचे इतके समर्पक उदाहरण दुसरीकडे सापडणे फार कठीण आहे.

परंतु मोठ्या खेदाची गोष्ट म्हटली पाहिजे की, आईला ज्याप्रमाणे मुलाची ओळख पटली त्याप्रमाणे मुलाला आईची ओळख काही शेवट-पर्यंत पटू शकली नाही. 'कुपुत्रो जायेत क्वचिदपि कुमाता न भवति' हे शंकराचार्यांचे प्रसिद्ध वचन 'कुपुत्र' म्हणून राजवाडे यांच्या वर्तनास लावण्याचे खरोखर जिवावर येते. पण ते खरे असल्यामुळे नाइलाज आहे. त्यांची आई बिचारी त्यांच्यासाठी जीव टाकी, पण हे मात्र, लहानपणी नेणते असताना काय किंवा मोठेपणे जाणते झाल्यावर काय तिला हिंग लावून म्हणून विचारीत नसत. एकदा ते कोठे लांबच्या प्रवासाला गेले आणि तेथून आईला त्यांनी तार केली की, 'मी मरतो आहे, मला पैसे पाठवा.' त्यांच्या आईने जवळचे किडुकमिडुक होते ते सगळे विकले आणि पंधरा रुपये उभे केले व त्यांना तातडीने पाठवून दिले. १८८७ पासून १८९६ पर्यंत त्यांचे बंधू कराचीस होते तेव्हा राजवाडे यांची आई त्यांच्या जवळच राहत होती. या काळात राजवाडे यांनी आईला कंगाल केले व तिची उपासमार केली. १८९२ च्या सुमारास त्यांनी एक क्लास चालवला होता. त्याचे महिन्याला त्यांना तीस-पस्तीस रुपये मिळत. एवढे पैसे त्या काळात खूप होते.

आणि मनात असते तर राजवाड्यांना आईला अगदी फुलासारखे सुखात ठेवता आले असते. पण तो विचार त्यांच्या मनात चुकून काही आला नाही.

हाती आलेला सगळा पैसा ते खुशाल उडवून टाकीत आणि आईच्या हाती छदाम म्हणून लागू देत नसत. आपल्या लाडक्या मुलाचे हे वर्तन पाहून त्या बिचारीचे डोके फिरले. तेव्हा राजवाडे यांचे बंधू मुंबईला विल्सन कॉलेजात होते, त्यांच्याकडे तिला सरळ पोचवून दिले. तिच्याजवळ ते कधी बसले नाहीत की तिची त्यांनी कधी विचारपूसही केली नाही. मुंबईची हवा तिला मानवली नाही. तिचे डोके आणखीनच फिरले. अशा वेडाच्या स्थितीतच १९०० साली ती मृत्यू पावली आणि मुलाच्या तावडीतून एकदाची सुटली.

'यावज्जीही काय मी न कळले आप्ताप्रति नीटसे !' मित्रांतेही कळे न गूढ न कळे माझे मलाही तसे ! असे गडकऱ्यांनी म्हटले आहे. गडकऱ्यांच्या या ओळी राजवाड्यांना फार लागू पडतात. शेवटपर्यंत त्यांचा स्वभाव म्हणजे एक चमत्कारिक गूढ होते. ते त्यांच्या मित्रांनाही कधी उलगडले नाही आणि त्यांचे त्यांना तरी ते उलगडले असेल की नाही याची शंकाच आहे. राजवाडे हे जात्या दुष्ट नव्हते. त्यांच्या ठिकाणी प्रेमळपणा व अनुकंपा उदंड होती. पण ती केव्हा, कोठे व कशामुळे जागी होईल याचा काही नेम नव्हता. ते लहान असताना एकदा एक भिकारीण भीक मागण्यासाठी आली व दाराशी उभी राहून मोठमोठ्याने ओरडू लागली. ताबडतोब राज–वाडे यांनी कसलाही विचार न करता अंगावर दुलई होती तीच तिला देऊन टाकली. भिड्यांच्या वाड्यात ते जात असत तेथे अबू नावाचे एक म्हातारे गृहस्थ राहत होते. त्यांच्या शेवटच्या आजारात राज–वाडे यांनी त्यांची शुश्रूषा इतकी जीव लावून केली की जवळपासचे लोकसुद्धा चकित झाले, जो ना नात्याचा ना गोत्याचा त्या या अबूला राजवाडे यांनी जीव लावावा, आणि जी जन्मदाती आई तिच्या प्रेमाची परतफेड 'हे काय फल मम तपाला' असे तिला वाटावे, इतक्या निर्घृणपणाने करावी, भिकारणीला आईसारखे वागवावे आणि

आईला भिकारणीसारखे वागवावे या वर्तनाचा प्रश्न लागणे दुरापास्त आहे. राजवाड्यांचे त्यांच्या आईशी वर्तन म्हणजे त्यांच्या जीवनातले न सुटणारे एक दुर्दैवी कोडे आहे.

अशा या मुळात मनस्वी आणि स्वच्छंदी असलेल्या स्वभावाला, आकार देण्यास राजवाडे यांना मिळालेले शिक्षण सर्वस्वी असमर्थ ठरले यात नवल नाही. १८७१ पासून १८९१ पर्यंत शाळा व कॉलेजात मिळून वीस वर्षे त्यांनी घालविली आणि अखेर या खटाटोपातून 'काहीच वेचिलें नाही शेवटी हात झाडिले' असे रामदासांप्रमाणे म्हणण्याची त्यांच्यावर वेळ आली. पण, राजवाडे यांच्या मनाप्रमाणे शिक्षणातून प्राप्त झालेल्या या 'शून्यलब्धी' च्या फलश्रुतीला ते स्वत: जबाबदार नव्हते तर त्यांच्या वेळी असलेली शिक्षणपद्धती जबाबदार होती. शिक्षण संपल्यानंतर दहा-बारा वर्षांनंतर 'कनिष्ठ, मध्यम व उच्च शाळातील स्वानुभव' म्हणून त्यांनी एक प्रदीर्घ लेख लिहिला. त्यात शिक्षणातल्या वदतो व्याघातांची त्यांनी मूलग्राही मीमांसा केली आहे आणि कमीजास्त प्रमाणात आजही ती अबाधित राहावी, इतके तिचे महत्त्व आहे.

आठव्या वर्षी राजवाडे यांनी धुळाक्षरे शिकण्यास आरंभ केला आणि पुढे तीन वर्षे मराठी चवथीपर्यंत त्यांचे शिक्षण दोन-चार खेडेगावातील व शहरातील शाळांत मिळून झाले. या तीन वर्षात थोडेफार मराठी व गणित यांच्यापलिकडे भूगोल, इतिहास, व्याकरण, व्युत्पत्ती, काव्य या विषयांचे कसलेही ज्ञान त्यांना झाले नाही. तीन वर्षांतील फक्त दीड वर्ष ते शाळेत गेले. बाकीची वर्षे धांगडधिंग्यात, विटीदांडूत, पोहण्यात, उड्या मारण्यात आणि मारामाऱ्या करण्यात गेली 'तेवढ्या अवधीत मला एकही पंतोजी शास्त्रीय रीत्या शिक्षण देणारा भेटला नाही. येथून तेथून सर्व पंतोजी आडमुठे, पोटभरू, इकडची पाटी तिकडे उचलून टाकणाऱ्यांपैकी होते.' असल्या या मराठी शाळेतून सुदैवाने चौथ्या इयत्तेनंतर राजवाड्यांची सुटका झाली आणि घरच्या मंडळींनी त्यांना बाबा गोखले यांच्या इंग्रजी

शाळेत घातले.

एके काळी बाबांच्या शाळेचे नाव बरे होते. पण अलिकडे ती कीर्ती बरीच खालावली होती. कारण, बाबांचे लक्ष शाळेवरून उडून वकिलीकडे लागले होते. त्यामुळे शाळा आपली रे रे करीत कशी-बशी चालली होती इतकेच. 'मास्तरांना इतर धंदे करता यावेत म्हणून शाळा सकाळी सहा वाजल्यापासून दहा वाजेपर्यंत भरत असे. शाळेत तीन-चारशे मुले होती पण त्यांची बसण्याची व्यवस्था अगदी भिकार होती.' राजवाड्यांची स्थापना ज्या वर्गात केली होती, तो ओलसर, दमट, अंधुक, घाणेरडा होता. वर्गात इंग्रजी मातृकांपासून हॉवर्डच्या दुसऱ्या पुस्तकापर्यंत शिकणाऱ्या मुलांच्या चार तुकड्या आणि पन्नास-साठ मुले होती व त्यांना शिकवणारा एकच मास्तर होता. 'त्यामुळे प्रत्येक तासातील चार-पाच मिनिटे माझ्या तुक-डीच्या वाट्यास व त्यापैकी अर्धे मिनिट माझ्या वाट्यास येई, सहा-पासून दहापर्यंतच्या चार तासातील पाच विषय मिळून माझ्या वाट्यास मास्तरच्या वाणीचा स्पर्श दोन-अडीच मिनिटे येई. तेव-ढ्यात जे काही ज्ञान संपादन करता येईल तेवढे करण्यात मी पाच-सात महिने लोटले ! तेवढ्यात बाबांच्या शाळेतील त्यांच्यासारखेच वकील आणि फावल्या वेळी मास्तर असलेले काशिनाथपंत नातू यांनी बाबांच्या शाळेतले काही मास्तर व मुले फितवून नवी शाळा काढली. त्या शाळेत राजवाड्यांच्या वर्गातील काही पुढारी मुले गेली म्हणून राजवाडेही गेले. येथे त्यांना दुसऱ्या इयत्तेत बसविण्यात आले. तीन-चार महिने गेले आणि वामनराव भावे व इंदापूरकर यांनी नवी शाळा काढली व त्या शाळेत नातूच्या शाळेतली काही मुले फितवून नेली. त्या मुलांबरोबर राजवाडेही भाव्यांच्या शाळेत दाखल झाले आणि त्याबद्दल त्यांना तिसऱ्या इयत्तेत बढती मिळाली. भाव्यांच्या शाळेत तीन वर्षे काढून १८८० त सातव्या इयत्तेत राजवाडे जातात, तो इंदापूरकर व गोखले हे मास्तर शाळा सोडून मिशन स्कूलमध्ये गेले. शिकवणारा कोणीच नसल्यामुळे राजवाडे यांनी भाव्यांची शाळा सोडली व रेव्हरंड बोमंटच्या मिशनस्कूलात ते लेगे.

दोन-तीन महिन्यांनी तीही शाळा सोडून स्वस्थ घरी बसले आणि एक वर्षाने विष्णुशास्त्री चिपळूणकरांच्या शाळेत दहा-पंधरा दिवस जाऊन, प्रवेश परीक्षेचा घरीच अभ्यास करून १८८२ च्या जाने-वारीत ती परीक्षा ते खाजगी रीतीने पास झाले.

अशा प्रकारे सहा वर्षांत पाच खासगी शाळांचा अनुभव राजवाडे यांनी घेतला. त्या अनुभवाचा निष्कर्ष एवढाच की, 'ज्यांनी शाळा काढल्या, त्यांच्यापैकी बहुतेकांची शाळा काढण्याच्या दृष्टीने चारित्र्य आणि विद्वत्ता या दृष्टीने पात्रता शून्य होती ! शाळा काढण्यात क्षूद्र मत्सर व उदरपूर्तीचा तात्पुरता उपाय ह्याखेरीज (काशिनाथपंत नातू) ह्या नीच मनोवृत्तीच्या व त्याहून नीच नीतिमत्तेच्या इसमाचा काही जास्त हेतु नव्हता. (शाळा चालविण्यास) उदरपूर्तीचा धंदा पत्करण्यापलीकडे बाबा गोखले यांचा काही इतर हेतू होता, असे दिसत नाही. गुरुजीच्या पेशाला अवश्य लागणारी जी कडकडीत नीतिमत्ता तिचा बाबांच्या ठायी पूर्ण अभाव होता, हे पुण्यातील आबालवृद्धांस मशहूर होते. सीतारामपंत चिपळोणकरादि बाबांचे सहाय्यकारी लोक सुरादेवीचे कट्टे उपासक म्हणून प्रसिद्ध होते. अशा लोकांच्या हाती दहा-पाच वर्षांत शाळेचे बारा न वाजते तर मोठेच आश्चर्य घडले असते ! व्यवसायाशी निष्ठा व नीतिमत्ता या दृष्टीने भावे आणि इंदापूरकर बरेच श्रेष्ठ होते. बाकी सरकारी आणि खासगी हायस्कूले संस्कारकेन्द्रे म्हणून सारख्याच किमतीची होती. खासगी शाळांतून जसे कित्येक अनीतिमान मास्तर असत, तसेच हायस्कुलातही अपेयपान, अभक्ष्यभक्षण, चार्गटपणा, बाहेरख्यालीपणा वगैरे दुर्गुणांनी मंडित असे गुरुजी थोडेफार होते. अशा स्थितीत नीतिमत्तेचा धडा मुलांच्या मनावर ठसविण्याचे काम सरकारी व खासगी शाळांतील मास्तरांच्या हातून फारच गचाळपणाने यत्किंचितही साधले न जावे हे साहजिकच आहे.' या सर्वदूर दुरवस्थेला एकच अपवाद होता तो म्हणजे विष्णुशास्त्री चिपळूणकर होय.

१८८२ च्या जानेवारीत राजवाडे कॉलेजात पुढील शिक्षणासाठी गेले आणि १८९१ च्या जानेवारीत बी. ए. झाले. सामान्य माणसाला

बी. ए. व्हायला चार वर्षे लागली असती. राजवाडे मॅट्रिकपासून बी. ए. पर्यंत एकदाही नापास झाले नव्हते. पण त्यांना बी. ए. होण्याला मात्र सामान्य विद्यार्थ्यापेक्षा दुप्पट काळ लागला. या विलंबाला काही प्रमाणात सुरुवातीला त्यांची आर्थिक दुरवस्था जबाबदार होती. १८८२ च्या जानेवारीत मुंबईच्या एलफिन्स्टन कॉलेजात त्यांनी पहिली टर्म भरली. पण पैशाच्या व इतर कारणामुळे दुसऱ्या टर्मला ते कॉलेजात गेले नाहीत; व पुढली दोन वर्षे म्हणजे १८८२ ते १८८४ त्यांनी पोटासाठी एक जुजबी धंदा काढला. तो म्हणजे पब्लिक सर्व्हिस सेकंड ग्रेड परीक्षेकरिता उमेदवार तयार करण्याचा वर्ग होय. या वर्गात दीड दोन तासांच्या वटवटीने महिना तीस पस्तीस रुपये प्राप्ती दरमहा होई. १८८४ मध्ये त्यांच्या वडील बंधूंना डेक्कन कॉलेजात फेलोशिप मिळाल्यामुळे त्या वर्षीच्या जूनपासून डेक्कन कॉलेजात ते पी. ई. दुसरी टर्म भरू लागले आणि ती परीक्षा ते पासही झाले. १८८५ साली दोनही टर्म भरून ते परीक्षेला गेले नाहीत. १८८६ व १८८७ दोन्ही वर्षात ते कॉलेजात राहत होते. १८८७ च्या शेवटी परीक्षा न देताच ते कॉलेज सोडून गेले. मग १८८८ साली बाहेरचा विद्यार्थी म्हणून फर्स्ट बी. ए. च्या परीक्षेला ते एकदम गेले व पास झाले. पुढे वर्षभर १८८९ साली भाव्यांच्या शाळेत ते वनस्पतीशास्त्र शिकवीत होते. १८९० साली ते डेक्कन कॉलेजात राहण्यास गेले व महिनाभर अभ्यास करून १८९१ च्या जानेवारीत दुसऱ्या बी. ए. ची परीक्षा इतिहास हा ऐच्छिक विषय घेऊन पास झाले.

राजवाडे यांच्या या दीर्घसूत्री आणि खंडित शिक्षणाचे कारण म्हणजे त्यांच्या वेळी प्रचलित असलेल्या परीक्षापद्धतींशी त्यांचा प्रामाणिक मतभेद होता हे होय. पी. ई. नंतर बी. ए. पर्यंत तीन वर्षात मिळून दरवर्षी सहामाही, उपान्त्य आणि वार्षिक मिळून नऊ परीक्षा होत होत्या. या परीक्षांना लावलेली पुस्तके म्हणजे इंग्रजी कविता, संस्कृत नाटके, निबंध, तर्कसंग्रह, बेकनचे ॲडव्हान्समेंट ऑफ लर्निंग ही सारी राजवाड्यांच्या मते दरिद्री आणि कालबाह्य झालेली होती. परीक्षेकरिता ती तीन तीन वेळा घोकायची व पुढे जास्त ज्ञान

झाल्यावर विसरायची हा साराच प्रकार राजवाड्यांना विचित्र वाटे. ते म्हणतात, ' प्रत्येक वेळेस तीच ती क्षुल्लक व दरिद्री पुस्तके तोंड-पाठ करून नीट ध्यानात ठेविली पाहिजेत. तशात बी. ए. पर्यंत शिकविल्या जाणाऱ्या पुस्तकातील बरीच पुस्तके अशी आहेत की, जी अथपासून इतिपर्यंत ध्यानात ठेवण्यात अर्थ नाही. ही खुळसट माहिती तीनतीनदा परीक्षा देण्याकरिता सूक्ष्मपणे ध्यानात ठेवायला लावणे म्हणजे विद्यार्थ्यांना व्यर्थ शीण देणे आहे. एकच परीक्षा तीन तीन वेळा देण्याची ही अजब सरकारी पद्धती मला बिलकूल पसंत नव्हती. त्याचकरिता सहामाही, प्रिलिमिनरी वगैरे परीक्षांस मी बसत नसे. अर्थात दोन-तीन वर्षे मला कोणत्याच परीक्षेला जाता आले नाही १८८४ साली प्रथम मी डेक्कन कॉलेजला गेलो. त्या वेळी दर दोन महिन्यांनी एक एक परीक्षा जर घेतली असती तर ह्या तिन्ही परीक्षा पहिल्या सहामाहीतच मी पास झालो असतो. परंतु सहा टर्म, सहामाही व उपान्त्य परीक्षा आणि मुंबईच्या फेऱ्या अशा नाना प्रकारच्या खुळांत सापडल्यामुळे, १८८४ पासून १८९० पर्यंत मला व्यर्थ रखडत रहावे लागले. ह्या रखडण्यात इतके मात्र झाले की, माझ्या मनाला जे योग्य वाटले तेच मी केले आणि कॉलेजातील खुळ-चट शिस्तीला बळी न पडता आणि मन व मेंदू यांना शैथिल्य व शीण न येऊ देता जगात जास्त उत्साहाने काम करण्यास मी सिद्ध झालो.

मुंबईला विलसन आणि पुण्याला डेक्कन अशा दोन कॉलेजात कमी - जास्त मिळून नऊ वर्षे राजवाड्यांनी काढली. राजवाडे तसे मोठे परखड निरीक्षक होते. ते निरनिराळ्या प्रोफेसरांच्या वर्गांत शिकण्यापेक्षा प्रोफेसर शिकवतो कसा हेच पाहण्यासाठी जाऊन बसत. पहिल्या वर्षी वर्गातील दहा–पाच व्याख्यानांना ते हजर होते आणि १८८४ ते १८८८ या चार वर्षात मिळून दहा–वीस वेळा ते वर्गात उपस्थित होते. एवढ्या अवधीत विलसन कॉलेजातील मॅकमिलन व हॅथॉर्नवेट आणि डेक्कन कॉलेजातील भांडारकर व सेल्बी हे सोडले तर बाकी कोणत्याही प्रोफेसराबद्दल राजवाड्यांना आदर वाटला नाही. हॅथॉर्नवेट आणि मॅकमिलन म्हणजे तरी काय, बरे होते म्हणजे

वाईट नव्हते इतकेच. त्यांचा मुख्य गुण म्हणजे वर्गात वेळेवर येणे आणि मन लावून शिकविणे, बाकी ते शिकविणे म्हणजे मोठे नामांकित होते असे नाही. मॅकमिलन तर्कशास्त्रातील सोपी माहिती अडखळत अडखळत नीट करून सांगे. सेल्बीचा मोठा गुण हाच होता की तो रोजचे धडे काळजीने घरी पाहून येऊन त्यांची परीक्षेपुरती संक्षिप्त टाचणे विद्यार्थ्यांना उतरून देई. त्याने तो शिकवत असलेल्या पुस्तकांवर विद्यार्थ्यांकरिता परीक्षोपयोगी टीपा छापून काढल्या होत्या. असल्या पुस्तकात मार्मिक विवेचनाची किंवा सखोल पंडित्याची अपेक्षा करेल तो फसेल. 'तथापि इतर असल्याच कॉलेजातील शिक्षक आपापल्या विषयावरील ग्रंथासंबंधाने एक ओळही छापून काढण्याचे धैर्य करीत नाहीत. त्यापेक्षा मि. सेल्बी यांचा टाचणेच छापून काढण्याचा क्रम का होईना बराच प्रशंसनीय आहे.' भांडारकर मात्र खरे प्रोफेसर. हौ, बुल्हर, कीलहॉर्न इत्यादी जर्मन पंडितांच्या तोडीची प्राचीन लेख, संशोधनाची ऐपत त्यांच्या ठायी होती. आणि त्यांच्यापेक्षा संस्कृत सारस्वतात आणि तर्क, न्यायवेदान्तादि शास्त्रांत त्यांची गती विशेष होती. त्यांची चिकित्सक व विवेचक बुद्धीही वरच्या दर्जाची होती. पण विद्यार्थ्यांना परीक्षेपुरते शिकवायचे असल्यामुळे आणि तेही भाषांतर पद्धतीने असल्यामुळे भांडारकरांचे पांडित्य विद्यार्थ्यांच्या दृष्टीने असून नसल्यातच जमा होते.

त्यातल्या त्यात बरे म्हणण्यासारखे हे प्रोफेसर सोडले, म्हणजे बाकीची मंडळी म्हणजे एकापेक्षा एक नग होती. ऑलिव्हर नावाचा प्रोफेसर इतका लाजाळू होता, की मुलांनी वर्गात कितीही गोंधळ घातला तरी पायाच्या नखाकडे वळविलेली मान वर करून पोरांकडे पाहायची त्याची छाती म्हणून होत नसे. पियर्सन संस्कृत शिकवी पण संस्कृतपेक्षा संस्कृतचे इंग्रजी भाषांतर करण्यात तो पटाईत होता. बॅरेट इंग्रजी कादंबरी शिकवी म्हणजे शब्दाचे अर्थ सांगे. ऑक्सनहॅमचे शिकविणे म्हणजे वर्गात पंधरा मिनिटे उशीरा यावे व पंधरा मिनिटे आधी जावे. आणि पुस्तकांची पाने चाळीत मध्येच दहा-पाच ओळी वाचाव्या व थट्टामस्करी करून विद्यार्थ्यांना खूष करून सोडावे. कर-

करे यांची कागदोपत्री गुणवत्ता उत्तम होती. ते केम्ब्रिजचे सीनियर ऑप्टिम झाले होते पण जरी ते काम बिनबोभाट करीत तरी त्यांच्या शिकवण्यातून एकही गाढा गणितज्ञ निपजला नाही. तेच अपयश भांडारकरांचे होते. त्यांच्यासारखा पंडित ते निर्माण करू शकले नाहीत. पण हा दोष एखाद दुसऱ्या व्यक्तीचा नसून, जिचे विलसन किंवा डेक्कन कॉलेज हे एक अंग होते, त्या परकीय सरकारने सुरू केलेल्या कनिष्ठ, मध्यम व उच्च शिक्षण पद्धतीचा होता. सरकारी नोकरीकरिता परीक्षा घेऊन विद्यार्थी तयार करणे हे तिचे ध्येय होते. त्यामुळे विद्यार्थ्यांचे ठायी विवेकबुद्धी, बहुश्रुतपणा किंवा शास्त्र प्रवणता निर्माण करण्याचा प्रयत्न करणे हे मुदलातच तिच्या उद्दिष्टात बसत नव्हते. गुलामांना स्वतंत्र नागरिकांचे शिक्षण कोठे दिले आहे ? त्याचमुळे विषयांचा व्यासंग आणि विषय शिकविण्याची क्षमता या दोन्ही दृष्टींनी ज्यांची पात्रता अगदी सुमार होती, अशा वशिल्याच्या तट्टांची या प्रोफेसरच्या जागेवर वर्णी लागली होती. अशा खोट्या प्रोफेसरांची बेन नावाच्या खऱ्या म्हणजेच विद्वान प्रोफेसरने एकदा व्याख्या केली होती, 'A Professor is one who proffeses to know what he does not know' खरोखरीच जे आपणास काही येत नसते ते येत आहे अशा घमेंडीने दर्शविणारा तो प्रोफेसर. राजवाडे यांच्या नशिबी आलेले बरेचसे प्रोफेसर असल्याच जातीचे होते.

एकंदर शिक्षणपद्धतीतच जो बौद्धिक अप्रामाणिकपणा ओतप्रोत भरलेला होता, त्यामुळे राजवाडे यांना त्या शिक्षणपद्धतीचेच एक प्रतीक असलेल्या डेक्कन कॉलेजबद्दल काडीचेही प्रेम राहिले नाही. मोठमोठे युरोपियन व एतद्देशीय पुढारी, आणि युनिव्हर्सिटीचे चॅन्सेलर वगैरे लोक वार्षिक पदवीदान समारंभाचे वेळी विद्यार्थ्यांना कंठरवाने उपदेश करीत की विद्या करून नोकरी मिळवणे हा मोक्ष नव्हे, विद्या केवळ ज्ञानार्जनाकरिता शिकायची आणि डेक्कन कॉलेज व त्यातले शिक्षक प्रत्यक्षात काय करीत असत तर नोकरी. बारा आणि बारा वर्षे शिक्षण द्यावयाचे नोकरीचे आणि युनिव्हर्सिटीच्या पदवी-

दान समारंभाच्या वेळी परीक्षा पास झालेल्या सेवार्थी उमेदवारांना उपदेश करायचा स्वतंत्र धंदा करण्याचा किंवा सरस्वतीच्या एकान्त उपासनेचा, ह्या मानभावीपणाचा मला बहुत तिटकारा आला आणि नोकर तयार करणाऱ्या डेक्कन कॉलेजबद्दल आणि त्यातील शिक्षकां-बद्दल माझ्या मनात तिरस्कार उत्पन्न झाला. ज्ञानोपासनेच्या या उपदेशाचा परिणाम राजवाड्यांवर मात्र फार झाला, आणि विष्णु-शास्त्र्यांनी सरकारी नोकरी म्हणजे गुलामगिरी आहे असे जे प्रति-पादन केले होते व त्याप्रमाणे आचरणही केले होते, त्यामुळे सरकारी नोकरी म्हणून करावयाची नाही असा त्यांनी पक्का निश्चय केला होता, ' केवळ विद्यार्जन करण्याचा हेतू बाळगणारा मी, नोकर तयार करण्याच्या गिरणीत जाऊन पडलो! ' अर्थात शिक्षकांशी व विद्यार्थ्यांशी त्यांचे गोत्र जमले नाही यात नवल नाही. कारण, शिक्षक हे 'शिक्षक' नव्हते आणि विद्यार्थी हे ' विद्यार्थी ' नव्हते. ते सरकारी नोकरीसाठी उमेदवार होऊ पाहणारे परीक्षार्थी होते. ज्यामुळे कॉलेजात असताना विजापूरकर, रावजी श्रीधर भिडे यांच्यासारखे चारदोन लोक सोडता राजवाडे यांना कोणी ' समानशीले व्यसनेषुसख्य ' असा मित्र मिळ नये हे साहजिकच म्हटले पाहिजे.

डेक्कन कॉलेजबद्दल राजवाडे यांना जी ही अप्रीति होती, तिच्यात त्या कॉलेजच्या भौगोलिक पार्श्वभूमीने जास्त भर घातली होती. ' ज्या स्थळावर डेक्कन कॉलेज बांधलेले आहे त्या स्थळाचे माहात्म्यच असे आहे की, त्या स्थळी येणाऱ्या प्रत्येक मराठ्याला एक प्रकारचे औदा-सिन्यच प्राप्त व्हावे ! १८१७ त मराठ्यांचे राज्य जाण्याच्या सुमा-रास खडकीची जी लढाई झाली म्हणून म्हणतात ती ह्याच स्थळी झाली. होळकरांचा पूल, खंडोबाचा माळ व पलीकडील टेकाड, ही ह्या लढाईची मुख्य स्थळे होत. कॉलेजभोवताली माळावर अद्यापी मनुष्याची हाडे कधीमधी सापडतात म्हणून म्हणतात. ह्या ठिकाणी मराठ्यांचा मोड झाला आणि मराठी राष्ट्राचा अंत झाला ! अशा ह्या अपशकुनी जागेवर बांधलेल्या इमारतीत कोण्या मराठ्याचे मन रमेल ? तशात ह्या इमारतीतही काही गोंडसपणा किंवा मराठपणा

होता असेही नाही. डेक्कन कॉलेजचे ते कलंडलेले शिखर व त्यावरील पत्र्याची थापटलेली टोपी, पहिल्यांदा जेव्हा १८८४ त मी कॉलेजात आलो तेव्हा. पाहून एक तासभर खदखदा हसलो. भोवताली तो रख-रखीत व ओसाड माळ पाहिला म्हणजे तर माझे मन फारच खट्टू होत असे, डेक्कन कॉलेजशेजारील एक नदी काय ती मला रम्य वाटे. बाकी तेथील सर्व वास्तू माझ्या मराठी डोळ्यांना विषाद देत.'

मराठी राज्याच्या स्मशानभूमीवर बांधल्या गेलेल्या डेक्कन कॉले-जबद्दल ही विषादाची भावना फक्त राजवाड्यांचीच होती असे नाही. त्यांच्या वेळी डेक्कन कॉलजात काळकर्ते शिवरामपंत परांजपे होते, ह्या पूर्वस्मृतींनी तेही नेहमी उदास दिसत. ती त्यांची भावना शेवट-पर्यंत कायम होती. मरणापूर्वी एक वर्ष त्यांनी ' मराठ्यांच्या लढायांचा इतिहास ' म्हणून ग्रंथ लिहिला. त्या ग्रंथात ' खडकीची लढाई ' या प्रकरणात या मैदानाचे वर्णन करताना ते म्हणतात, ' हे मैदान फार मोठे आहे व त्या मैदानातील एखाद्या उंच ठिकाणी उभे राहून हे ते त्या खडकीच्या लढाईचे रणक्षेत्र अशा दृष्टीने त्याच्याकडे पाहिले म्हणजे आपल्या मनामध्ये काय भावना उचंबळतात याचे वर्णन करणे शक्य नाही. त्या भावनांचा ज्यांना अनुभव घ्यावयाचा असेल, त्यांनी त्या मैदानावर समक्ष जाऊनच त्या स्थळाचे आपल्या अश्रुपूर्ण नेत्रांनी निरीक्षण केले पाहिजे. फार कशाला डेक्कन कॉलेजात बेन म्हणून इतिहासाचा प्रसिद्ध आणि नामांकित प्रोफेसर होऊन गेला. तो इंग्रज नव्हता. स्कॉटिश होता. त्याला हिंदुस्थानबद्दल व हिंदूंच्या चालीरीतीबद्दल मोठा आदर वाटे. या देशातील हवापाण्याला धोतर अंगरख्यासारखा पोषाख किती योग्य आहे हे तो मोठ्या कौतुकाने सांगे. मला करता आला असता तर मी येथे असाच पोषाख केला असता असे सांगे. प्रत्येक हिंदु विद्यार्थ्याने टोपी घालून वावरले पाहिजे असा त्याचा कटाक्ष होता. एकदा एक नखशिखांत साहेबी पोषाख केलेला विद्यार्थी वर्गात बोडकाच आला व बसला, तेव्हा तू हिंदू आहेस की ख्रिस्ती आहेस असे बेनने त्याला विचारले व तो हिंदू आहे असे कळल्यावर त्याला टोपी घालायला लावली. शिवाजी

दरोडेखोर होता असे सरकारी मत अधिकृतरीत्या प्रचलित असता शिवाजी-अफझलखान प्रश्नात बेनने शिवाजीचे समर्थन केले होते की शिवाजीसारखे राष्ट्र निर्माण करणारे जे राष्ट्रपुरुष असतात, त्यांची कृत्ये सामान्य कायदेशास्त्राच्या दृष्टीने पाहण्याची नसतात. त्यांना ज्या मार्गाने आपले ध्येय साधेल त्या मार्गाचा अवलंब करावा लागतो. ही राजनीति आहे. त्या नीतीप्रमाणे शिवाजीने अफझल-खानाला कपटाने मारले का न्यायाने मारले हा प्रश्नच अवास्तव ठरतो. ज्या मार्गाने त्याला आपल्या शत्रूचा निःपात करता आला त्या मार्गाने त्याने जे केले ते न्याय्यच आहे. त्याच्या या भाषणाबद्दल त्याला सरकारातून समजसुद्धा मिळाली. पण सरकारला तो फारसा मोजून नसे. तर असा हा बेन इतिहास शिकविताना भर वर्गात एकदा म्हणाला की, ' तुम्ही मराठ्यांनी खडकीची लढाई कधीच गमवायला नको होती. त्याचे ते वाक्य बंदुकीच्या गोळीप्रमाणे विद्यार्थ्यांच्या मनाला लागले. बेनसारख्या जेत्या युरोपियनाची डेक्कन कॉले-जचे अधिष्ठान असलेल्या खडकीच्या रणभूमीबद्दल जर ही भावना होती, तर राजवाडे यांच्यासारख्या जातिवंत मराठ्याला त्या जागे-बद्दल काय वाटले असेल, हे बोलायलाच नको.

कॉलेज असे, प्रोफेसर तसे आणि बरोबरचे विद्यार्थी हे असल्या प्रकारचे; त्यामुळे राजवाडे यांचे मत साहजिकच कॉलेजातल्या वाता-वरणापासून पराङ्मुख झाले आणि कॉलेजचे ग्रंथ हेच त्यांचे सोबती झाले आणि साहेब राजकारण करण्यात कितीही उलटया काळजाचा असला तरी, विद्येच्या बाबतीत खरोखरच ' साहब दिल ' म्हणजे मोठ्या मनाचा असल्यामुळे नाना तऱ्हेच्या ग्रंथांनी खचलेले डेक्कन कॉलेजचे भव्य आणि समृद्ध ग्रंथालय म्हणजे राजवाड्यांसारख्या ज्ञानोपासकाला केवळ वरदान होते. A collection of good books is the true university in these days. असे कार्लाईल म्हणतो ते खरे आहे. या नऊ वर्षात युरोपियन इतिहास, अर्थशास्त्र, तत्त्वज्ञान, तर्कशास्त्र, मानसशास्त्र या विषयांवरील बरेच अस्सल व भाषांतरित ग्रंथ त्यांनी मननपूर्वक वाचले. ते फारशी व फ्रेंच भाषाही

कामापुरती शिकले. प्लेटोच्या ' रिपब्लिक ' चे त्यांनी भाषांतर केले. त्यांचे वाचन जितके विस्तृत तितकेच चिकित्सक होते. हिंदुस्थानच्या व विशेषतः महाराष्ट्राच्या इतिहासावर इंग्रज लोकांनी लिहिलेले ग्रंथ त्यांनी जेव्हा बारकाईने वाचले, तेव्हा या देशाचा इतिहास लिहिण्यास हे लोक किती नालायक आहेत हे त्यांच्या मनात पूर्ण भरले आणि काव्येतिहास सग्रहाशी ताडून पाहिला, तेव्हा त्यावेळी प्रामाण्य पावलेला मराठ्यांचा आद्य इतिहासकार गँट जणू शेकडो नव्हे तर हजारो ठिकाणी चुकला आहे हे त्यांच्या लक्षात आले. त्याच्या चुकांची ' ही शुद्धी करण्याची कल्पना प्रथम १८८८ च्या सुमारास माझ्या मनात आली.' राजवाडे यांनी पुढे जे इतिहास संशोधन केले त्याचे पहिले बीजारोपण करण्याचे श्रेय अशा प्रकारे डेक्कन कॉलेजच्या ग्रंथालयाचे आहे. राजवाड्यांचा अभ्यास जसा चिकित्सक होता, तसाच प्रत्यक्ष करून पाहणारा होता. असे करताना मागचा पुढचा विचार त्यांना फारसा राहत नसे. वनस्पती शास्त्राचा अभ्यास करताना त्यांना त्याची इतकी गोडी लागली की, एकदा बरोबर चाकू, कात्री वगैरे साहित्य घेऊन कात्रजच्या जंगलांत ते गेले आणि निरनिराळ्या वनस्पतींची तपासणी करू लागले. होता होता एका वनस्पतीचा तुकडा कापून त्यांनी जिभेवर ठेवला. त्याबरोबर इतकी सपाटून लाळ वाहू लागली की ती कशानेही थांबेना. त्यांची घाबरगुंडी उडाली आणि त्यांनी धूम ठोकली ते पुण्यात डॉक्टरकडे आले तेव्हाच थांबले.

वय वाढले तरी त्यांचा लहानपणचा हूडपणा काही कमी झाला नव्हता. प्रवेश परीक्षेच्या वेळी त्यांना तीन-चार महिने ताप येत होता. त्यावेळी त्यांनी कोयनेल इतके खाल्ले की त्यांच्या जीवाला धोका उत्पन्न झाला. त्यांच्या बंधूंनी डॉक्टरला आणले आणि उपचार केले तेव्हा ते कसेबसे बचावले. या ज्वराचा परिणाम त्यांच्यावर इतका झाला की आधीच रागीट, संशयी असलेला त्यांचा स्वभाव अधिक रागीट आणि संशयी झाला. डेक्कन कॉलेजच्या टॉवरच्या पोकळीत घुबडे येत. राजवाडे त्यांची अंडी खात व ती फार चांगली लागतात असे मित्रांना सांगत. जशास तसे आणि ठोशास ठोसा हा बालपणचा

बाणा अजून कायम होता. कॉलेजातला एक मुलगा त्यांची कुचेष्टा करीत असे. त्याची खोड मोडण्यासाठी राजवाडे यांनी त्या विद्यार्थ्या-ला 'बोटिंग' करण्यासाठी आपल्याबरोबर नदीवर नेले आणि नाव नदीच्या मध्यावर आल्यावर 'तू माझी कुचेष्टा करतोस सबब मी तुला आता नदीत बुडवतो' म्हणून आपला रुद्रावतार दाखविला. त्या विद्यार्थ्याची पाचावर धारण बसली आणि 'मला नदीत टाकू नका मी यापुढे तुमची कधीही कुचेष्टा करणार नाही' अशी त्याने राज-वाड्यांच्या हातीपायी पडून कबुली दिली तेव्हा त्यांनी त्याला तीरा-वर सुखरूप आणून पोचविले. कॉलेजात असताना ते व विजापूरकर एका खोलीत राहत होते. एके दिवशी राजवाडे यांची वामकुक्षी ऐन रंगात आली असता, त्यांना उठविण्याचे विजापूरकरांनी धाडस केले. राजवाडे जे उठले ते तिरिमिरीसरशी त्यांनी विजापूरकरांच्या खाडकन तोंडात मारली. विजापूरकर राजवाड्यांना 'दुर्वास' असे म्हणत असत, ते त्यांच्या या तामसी वृत्तीमुळेच.

या आडदांड व लढाऊ स्वभावाला शोभेल असे पोलादी शरीर त्यांनी या काळात डेक्कन कॉलेजात कमाविले, किंबहुना, डेक्कन कॉलेजच्या वसतिगृहात राहण्यामागे त्यांचा तोच मुख्य उद्देश होता 'निव्वळ कॉलेजातील खोलीचा, हवेचा व जवळील नदीचा उपयोग करून घेण्याकरिता मी ८० रु. फी भरली. कॉलेजात राहून तंदुरुस्ती करावी, हा माझा तेथे राहण्यात उद्देश होता. त्या उद्देशाला पोषक अशीच त्यांची कॉलेजातील दिनचर्या होती. नियमाने पहाटेस पाच वाजता मी उठत असे व तालमीत जाऊन दोन तास उत्तम मेहनत करीत असे. बैठक, जोर, जोडी, मलखांब व कुस्ती. सुमारे दीड-दोन हजार मेहनत रोजची होई, तो सात वाजत. नंतर शेर दीडशेर दूध पिऊन अर्धा तास कॉलेजभोवतीच मैदानात व झाडाखाली सहल व विश्रांती होई. आठपासून नऊपर्यंतचा वेळ वर्तमानपत्रे वाचण्यात जाई. पुढे एक तास नदीवर पोहणे होत असे. परत येऊन भोजन आटो-पून खोलीकडे यावे, तो नेमके साडेअकरा वाजत. नंतर अर्धा तास

....२

समानशील अशा दोन-चार सद्‌गृहस्थांच्या समागमात धूम्रपान आटो-पून, कॉलेजातील पुस्तकालयातून आणलेले एकादे पुस्तक हिंडून फिरून निजून व बसून मी चांगले वाचून मनन करीत असे. वर्गातील शिक्ष-कांच्या व्याख्यानांना मी प्राय: कधी जात नसे.इतर परीक्षार्थी विद्यार्थी चार तास वर्गात घालवीत, ते मी स्वतंत्र पुस्तके वाचण्यात घालवी. वाचण्याचे ४–४।। ला बंद होई. मग शादिल जेवाजवळील होडी-खान्यात एकांडचा होडग्यात सात वाजेतो नदीवर पाच सात मैलांचे वल्हवणे करी. तेथून परत येऊन संध्याभोजन जो आटपावे तो साडे-आठ वाजत. नंतर दहा साडेदहा वाजेतो अनेक स्वभावाच्या विद्यार्थ्यां-शी सामाजिक, राजकीय, धार्मिक व पाठशालीन विषयांवर पाचपन्नास विडचा खलास होई तोपर्यंत नाना प्रकारच्या गप्पा चालत. साडेदहा पासून पहाटेच्या पाचपर्यंत खोलीतील दोन टेबलांवर घोंगडी पसरून तीवर ताठ उताणे निजले म्हणजे मला गाढ झोप येई. मेहनतीने अंग इतके कठीण होऊन जाई की मऊ बिछान्यावर मला कधी झोपच येत नसे. १८८४ पासून १९९० पर्यंतच्या सात वर्षात मी एकही दिवस कधी आजारी पडलो नव्हतो.' जेवायला ते सर्वांच्या शेवटी जात,कारण त्यांचा आहार दांडगा होता आणि जेवण स्वस्थपणे होई दूध नेहमी शेळीचे पीत. क्रिकेट आणि टेनिस ते कधी खेळले नाहीत. पोहायला पाण्यात पडले की तास तास पाण्यात डुंबत असत. नावेची वल्ही इतक्या जोरात मारीत की युरोपियन बोटक्लबमधले इंग्रज आश्चर्याने तोंडात बोट घालीत. वर्षांनुवर्षे अशी सक्त मेहेनत करून त्यांनी असे शरीर कमाविले की वाटावे ' ऋग्वेदा ' तला आदर्शच जणु त्यांच्या रूपाने साकार झाला आहे. ' अशिष्ठो दृढिष्ठो बलिष्ठो युवास्यात ।

हे सर्व ठीक होते. पण पाश्चात्य भाषा, पाश्चात्य संस्कृती व पाश्चात्य रीतिभाषा यांचा वर्चष्मा असलेले डेक्कन कॉलेजचे वाता-वरण भारतीयत्वाला अत्यंत मारक होते.

अदमानच्या हवेत हत्तीसारखी शरीरे क्षयाने झिजावीत, त्या-प्रमाणे ह्या परक्या वातावरणात भारतीय विद्यार्थ्यांचा स्वत्वक्षय अटळ होता. राजवाडे हे याविषयीही साहेब सापडले. त्यातून त्यांचा

मोक्ष कसा झाला. आणि सांस्कृतिक अपमृत्यु कसा टळला. हे त्यांच्याच शब्दात वाचण्यासारखे आहे– 'एका दुष्ट खोडीने मात्र मला अतोनात ग्रासिले ती खोड म्हणजे दुसरी तिसरी काही नाही. इंग्रजी बोलण्याची व इंग्रजीत विचार करण्याची. १२ व्या वर्षापासून २६ व्या वर्षापर्यंतच्या पंधरा वर्षांत वाचणे, लिहिणे, विचार करणे वगैरे सर्व मानसिक क्रिया मी इंग्रजीत करू लागलो. शाळेत व कॉलेजात प्राचीन व अर्वाचीन मराठी ग्रंथांशी शिक्षकांनी व परीक्षकांनी माझी क्षणभरही ओळख करून दिली नाही. त्यामुळे स्वभाषेत काही प्रास्ताविक व नामांकित ग्रंथच नाहीत, असे इतर परीक्षार्थ्यांप्रमाणे माझेही मन व्हावयाला कोणतीच हरकत नव्हती. तशात, कुंटे, रानडे वगैरे लोकही मोठमोठी व्याख्याने इंग्रजीत झोडीत. कॉलेजात तर बहुतेक सर्व व्यवहार इंग्रजीतच करू लागलो. बंधूंना व मित्रांना पत्रे लिहावयाची ती इंग्रजीत, आचाऱ्याशी व गडी माणसांशी बोलावयाचे तेही मराठीमिश्रित इंग्रजीत, डिबेटिंग सोसायटीत मोठमोठी अद्वातद्वा व्याख्याने द्यावयाची ती इंग्रजीत, देशी कपडे वापरणारी मंडळी कॉलेजात वाढली तिचे सर्व काम इंग्रजीत; सारांश, सतत पंधरा वर्षे बारा आणि बारा चोवीस तास सर्व कामे मी इंग्रजीत करू लागलो. या एवढ्या अवधीत मी मराठी बहुतेक विसरून जावयाचा. परंतु दोघा–तिघा गृहस्थांनी या विपत्तीपासून मला वाचविले. विष्णुशास्त्री चिपळोणकरांच्या टीकात्मक निबंधांनी इंग्रजीच्या या खग्रासापासून माझा बचाव केला; काव्येतिहास संग्रहकारांच्या ऐतिहासिक पत्रांनी स्वदेश म्हणून काही आहे हे मला कळले; परशुराम पंत तात्या गोडबोले ह्यांनी छापलेल्या काव्यांनी महाराष्ट्र सारस्वताचा मला अभिमान वाटू लागला. हे तीन ग्रंथ जर माझ्या दृष्टीस न पडते, तर आज मी कुंट्यांसारखी इंग्रजीत व्याख्याने देण्यास, सुरेंद्रनाथांप्रमाणे बूट पाटलोण घालून देशाभिमानाची पत्रे काढण्यास, किंवा सुधारकांप्रमाणे बायकांना झगे नेसविण्याच्या ईर्ष्येस खचित लागलो असतो. सुदैवाने ह्या देशाभिमान्यांच्या प्रयत्नाने माझी असली विपत्ती झाली नाही. नाहीतर असले काही चमत्कार माझ्या

हातून निःसंशय घडते ! दारू पिणारे, मांस खाणारे, स्वदेशाला, स्वभाषेला व स्वधर्माला तुच्छ मानणारे गावठी साहेब त्यावेळी कॉलेजच्या परीक्षार्थ्यांत अगदीच नव्हते असे नाही. परंतु त्यांचा संसर्ग उपरीनिर्दिष्ट ग्रंथकारांच्या ग्रंथातील मतलबाने मला घडला नाही. विद्यार्थी धर्मलंड होतो की दुराचारी होतो इकडे कॉलेजातील शिक्षकांचे मुळीच लक्ष नसे. कॉलेजातील युरोपीय शिक्षकांच्या मते माफक दारू पिणे, बूट पाटलोण घालणे, स्वधर्माप्रमाणे न चालणे, स्वभाषा विसरणे ही काही पापे गणिली जात नसत. तेव्हा ते ह्या गोष्टीत लक्ष घालीत नसत हे स्वाभाविकच होते. गुरूंचा धाक नाही, पुढाऱ्यांचा कित्ता नाही, धर्माचा प्रतिबंध नाही, अशा स्थितीत मी पंधरा वर्षे काढली. तेथून मी सुरक्षित पार पडलो, त्याचे सर्व श्रेय वरील तीन ग्रंथकारांकडे आहे.'

'नष्टो मोहः स्मृतिर्लब्धा त्वत्प्रसादान्मयाच्युत' असे कृतज्ञतेने राजवाडे जर कोणाला म्हणू शकले असते, तर ते या तीन ग्रंथकारांना होय. त्यांच्या कृपेने त्यांना आत्मविस्मृतीच्या दारुण सकटातून वाचविले व त्यांना सांस्कृतिक आत्मसाक्षात्कार होऊ दिला. विष्णुशास्त्री चिपळूणकर हे एकच पुरुषोत्तम असे होते की ज्यांचा उल्लेख राजवाडे यांनी 'महात्मा' या उपपदाने केलेला आहे. त्यांच्या मृत्यूने राजवाडे यांना अत्यंत दुःख झाले. 'पहिल्या वर्षांत मुंबईस असताना विष्णुशास्त्री चिपळोणकर वारल्याची बातमी ऐकिली, त्यावेळी दुःख झाले. मरण ही मनुष्याची प्रकृती आहे, ही गोष्ट तोपर्यंत माझ्या अनुभवास आली नव्हती. तारुण्याच्या मुशीत जगताच्या या तीरावर स्वैर व निभ्रांत हिंडत असता जेथून कधी कोणी परत आला नाही त्या तीराची मला कल्पनाच नव्हती. सर्व मनुष्ये व प्राणी अमर आहेत, अशी माझी अस्पष्ट भावना होती. ह्या भावनेला शास्त्रीबुवांच्या मृत्यूने जबर धक्का बसला. शाळेतून जाताना व येताना, आणि शहराच्या पश्चिम भागात हिंडताना शास्त्रीबुवाच्या सभ्य, भारदस्त व प्रौढ मूर्तीला मी अनेकवार पाहिले होते. शास्त्रीबुवा परम देशभक्त आहेत असे ज्याच्या त्याच्या तोंडून ऐकत होतो. त्यांनी

लिहिलेले निबंध वाचलेले माझ्या कानावरून गेले होते. ह्या पुरुषा-संबंधाने अशा अनेक गोष्टींचा माझ्या मनावर संस्कार झाला असल्यामुळे त्यांच्या मरणाने मला थोर दुःख झाले.' 'निबंधमाला' लिहिणारे विष्णुशास्त्री, 'नवनीत' संपादन करणारे परशुरामपंत तात्या गोडबोले आणि 'काव्येतिहाससंग्रह' संपादणारे काशिनाथ नारायण साने हे तीन ग्रंथकार म्हणजे राजवाड्यांचे तीन मोक्षदाते गुरू होते. परिसाच्या स्पर्शाने लोखंडाचे सोने व्हावे, त्याप्रमाणे या ग्रंथकारांच्या ग्रंथांच्या किमयेने राजवाडे याचा जळून झालेला सांस्कृतिक पुनर्जन्म पहिला, म्हणजे, राजसत्ता, लोकसत्ता, धर्मसत्ता यांच्याप्रमाणे किंबहुना यांच्याहूनही वरिष्ठ अशी 'ग्रंथसत्ता' म्हणून वस्तु आहे याची प्रचिती आल्याशिवाय राहत नाही.

परंतु, राजवाडे यांचे जे हे सांस्कृतिक परिवर्तन झाले किंवा इतिहास–संशोधक आणि विचारवंत म्हणून राजवाडे यांनी पुढील जीवनांत जे कार्य केले किंवा त्याचे त्यांच्या व्यक्तिमत्त्वाची जडण–घडण करण्याचे 'श्रेय गुरूंचा धाक नाही, पुढाऱ्यांचा कित्ता नाही, धर्माचा प्रतिबंध नाही' असले नैतिक अराजक माजलेल्या किंबहुना त्याला त्याच्याकडे डोळेझाक करून प्रच्छन्न पाठिंबा देणाऱ्या डेक्कन कॉलेजला अर्थातच काही नव्हते. राजवाडे जे तसे झाले ते डेक्कन कॉलेजमुळे झाले नाहीत तर डेक्कन कॉलेजमध्ये असूनसुद्धा झाले. त्यामुळे जेथे आपण शिकलो त्या वास्तूबद्दल कृतज्ञता वाटण्याची जी स्वाभाविक भावना आहे, तिला ते पारखे झाले. राजवाडे यांची डेक्कन कॉलेजबद्दलची ही वृत्ती पाहिली, म्हणजे, प्रसिद्ध इतिहासकार गिबन याने ऑक्सफर्ड विद्यापीठाबद्दल काढलेल्या उद्‌गाराची आठवण होते. तो असाच मोठ्या अपेक्षा बाळगून ऑक्सफर्ड विद्यापीठात गेला आणि 'नाव मोठे पण लक्षण खोटे' असलेल्या त्या विद्यापीठात त्याचा क्रूर भ्रमनिरास झाला तो म्हणतो– 'ऑक्सफर्ड विद्यापीठाचे ऋण म्हणून मी काही लागत नाही आणि जितक्या सहजतेने मुलगा म्हणून मी तिचा संबंध नाकारायला तयार आहे तितक्याच तत्परतेने आई म्हणून माझी शाळा–माता होईल. मॅग्डेलन कॉलेजात

मी चौदा महिने काढले. माझ्या सगळ्या आयुष्यातला निष्क्रिय आणि फुकट गेलेला तो काळ होता. यात दोषी कोण शाळा की विद्यार्थी याचा निर्णय वाचकांनीच करावा.' जवळजवळ अगदी असेच उद्‌गार राजवाडे यांनी काढले आहेत. '१८९० त जेव्हा मी कॉलेज सोडले, तेव्हा त्या कॉलेजविषयी माझ्या मनात प्रेमबुद्धी बिल्कूल राहिली नाही. एकाही शिक्षकाने मला तेथे काहीच शिकविले नसल्यामुळे त्या शिक्षकांबद्दल किंवा त्या शिक्षणपद्धतीबद्दलही मला फारसा प्रेमभाव उत्पन्न झाला नाही. मी बी. ए. ची परीक्षा पास झालो त्यावेळीही मोठा काही अभिमान उत्पन्न झाला नाही. एक क्षुद्र परीक्षा सहजासहजी पास झालो असे मला वाटले. नोकरीकरिता मी परीक्षा दिली नव्हती व तिच्या हवाल्यावर मला कोठे भिकार अर्जही करावयाचे नव्हते. तेव्हा द्रव्यदृष्टीनेही मला ह्या पदवीचे काडीमात्र कौतुक वाटले नाही. सारांश, द्रव्याच्या, किंवा विद्येच्या किंवा गुरु-शिष्य संबंधाच्या नात्याने ह्या कॉलेजविषयी माझ्या मनात आदरबुद्धी किंवा प्रेमबुद्धी लवमात्रही जागृत झाली नाही. उलट एक प्रकारची तिरस्कारबुद्धी मात्र प्रकट झाली.

बी. ए. होण्यापूर्वीच राजवाडे यांचे लग्न झाले होते. ते त्यांनी स्वतःच घडवून आणले होते. १८८७ च्या सुमारास कराचीस प्रोफेसर असलेले त्यांचे वडील बंधू वैजनाथपंत यांच्याकडे 'माझे लग्न करून द्या' असे सांगण्यासाठी गेले होते. त्यांच्या इच्छेप्रमाणे त्यांच्या बंधूंनी १८८८ साली पुण्यास राजवाड्यांचे लग्न केले. राजवाड्यांची सासुरवाडी सुखवस्तू होती. त्यांचे सासरे विष्णु नारायण गोडबोले यांचे पुण्याच्या बुधवार पेठेत पुस्तकविक्रीचे दुकान होते व स्वतःच्या मालकीचा छापखाना होता. गोडबोले यांनी दोनशे रुपये हुंडा दिला आणि वैजनाथपंतांनी हजार बाराशे रुपये खर्च केले. राजवाड्यांच्या बायकोचे माहेरचे नाव मथूताई आणि सासरचे नाव अन्नपूर्णा.

लग्न करून संसार थाटल्यामुळे राजवाडे यांना निर्वाहाचा काही उद्योग करणे जरूर झाले. त्यांची खरी इच्छा म्हटली म्हणजे विद्यार्जन करून स्वतंत्र धंदा करण्याची होती. पण ते काही जमले नाही.

तेव्हा त्यांनी नोकरी धरली. ती अर्थात सरकारी नोकरी नव्हतीच. विष्णुशास्त्री चिपळूणकरांच्या न्यू इंग्लिश स्कूलमध्ये ते शिक्षक झाले.

त्यांचा रागीट आणि कडक स्वभाव त्याही धंद्यात प्रगट होई. वाईचे काका पंडीत हे या काळात त्याचे विद्यार्थी होते. ते लिहितात, राजवाडे यांच्याकडे 'Lambs Tales' हा विषय शिकविण्याचा होता. राजवाड्यांची शिकविण्याची पद्धत काही विशेषच होती. कोणत्याही विद्यार्थ्याने आपणास न येणारे शब्द वेब्स्टरच्या कोशातूनच काढले पाहिजेत असा त्यांचा कटाक्ष असे. शिकविताना प्रत्येक वाक्य प्रथमतः इंग्रजीत बोलून नंतर त्यांचे बरोबर मराठी भाषांतर उच्चारावयाचे असा त्यांचा नियम असे. त्यांची ती करडी नजर, रोडकी पण कणखर शरीरयष्टी, पांढरा स्वच्छ पोषाख आणि नेहमीच असलेली रागीट पण करारी मुद्रा पाहून विद्यार्थ्यांचे मनात त्यांचेविषयी प्रेमापेक्षा भयाचाच पगडा जास्त बसलेला दिसे. शिक्षक म्हणून त्यांनी नाव मिळविले, पण त्यांची ती नोकरी फार दिवस टिकली नाही. १८९३ च्या ऑगस्टमध्ये वरिष्ठांचे व शाळेतल्या दहा–बारा शिक्षकांचे मतभेद झाले आणि त्यांनी राजीनामे दिले. त्या शिक्षकांत राजवाडे होते.

सुदैवाने म्हणा की दुर्दैवाने म्हणा, त्या नोकरीची त्यांना आता तशी जरूरही राहिली नव्हती. कारण, राजवाड्यांची बायको १८९२ सालीच मृत्यू पावली होती. राजवाड्यांच्या नशिबात संसारसुख काही नव्हते. १८९१ मध्ये त्यांना एक मुलगा झाला पण तो दोन महिन्यांचा होऊन गेला. १८९२ मध्ये त्यांच्या बायकोचे दुसरे बाळंतपण अपुऱ्या दिवसांचे झाले आणि प्रसूतीनंतर बायको आणि तिला झालेली मुलगी दोघीही गेल्या. बायको मेली त्यावेळी राजवाड्यांचे वय अठ्ठावीस वर्षांचे होते. ते तारुण्याच्या ऐन भरात होते. मनात आणते, तर त्यांना दुसरे लग्न करता आले नसते असे नाही. नव्हे, त्या वेळी तो शिरस्ताच होता. न्यायमूर्ती, रानडे, हरिभाऊ आपटे अशा त्यावेळच्या मान्य पुरुषांनी अशी लग्ने केली होती. राजवाड्यांच्या दुप्पट वयाचे

असलेले त्यांचे स्नेही वाईचे भाऊशास्त्री लेले यांनी पहिली बायको मेल्यानंतर पन्नाशीनंतर चौदा वर्षांच्या मुलीशी लग्न केले होते, पण संसाराचा एकदा अनुभव आला तो पुरे, म्हणून राजवाडे यांनी त्या मार्गाला पुन्हा वळण्याच्या विचाराला आपल्या मनात थारा दिला नाही. ते म्हणाले, 'पुरुष असो अगर स्त्री असो, त्यास दुसरे लग्न नाही. पहिल्या लग्नाचा भागीदार नाहीसा झाला की, शेष भागीदाराने संन्यस्त वृत्तीने देव व देश यांची शक्त्यनुसार सेवा करावी. ते हे बोलूनच राहिले नाहीत. विरक्त वृत्ती त्यांच्या अंगात मूळचीच होती. त्यांचे वडील वकील होते व त्यांच्या वेळचे देण्याघेण्याचे कागद होते, ते त्यांनी सगळे फाडून टाकले होते. आता बायको मेल्यावर तिने संसारासाठी जमविलेले सामान त्यांनी त्यांच्या ओळखीच्या एका लग्नेच्छु भिक्षुकाला दिले, इतकेच नव्हे तर त्याला पैशाची मदतसुद्धा करून त्याचा संसार थाटून दिला. पण संसार जसा राजवाड्यांच्या नशिबात नव्हता, तसा त्या भटजीच्याही नशिबात नव्हता असे म्हटले पाहिजे. कारण त्या भटजीचे लग्न होऊन एक–दोन वर्षे होतात तोच पुण्यात प्लेगची साथ आली आणि तिच्यात भटजी मजकूर दगावले. राजवाड्यांच्या संसाराचा शून्याकार झाल्यामुळे ते त्यांचे इतिहास संशोधनाचे कार्य करण्यास मोकळे झाले. याचा अर्थ असा नव्हे की, संसाअसता तर त्यांनी संशोधन केले नसते. एकदा त्यांचे स्नेही भट त्यांनर म्हणाले, 'तुम्ही जर संसारी असता तर तुमचे हातून इतिहास संशोधनाचे जे कार्य झाले ते झाले नसते' तेव्हा राजवाडे म्हणाले, 'मी जरी संसारी असतो तरी इतिहास संशोधनाचे माझ्या आवडीचे काम मी केलेच असते.' आता झाले ते इतकेच की बायको व मुले मरूनच गेल्यामुळे प्रपंचाचा पाश निःशेष तुटला आणि ते व्याधपाशातून सुटलेल्या विहंगाप्रमाणे मन मानेल तिकडे मुक्त संचार करण्यास मोकळे झाले. एकाला जी आपत्ती ती दुसऱ्याला इष्टापत्ती असते ती अशी. प्रिय व्यक्तीचा नाश म्हणजे वेड्या माणसाला जिव्हारी खुपसलेला काटा वाटतो, तोच शहाण्या माणसाला हलक्या हाताने काढून टाकलेले शल्य असे वाटते. 'अधिगच्छति मूढ चेतनः। प्रियनाशं हृदि शल्य-

र्पितम् । स्थिरधीस्तु तदेव मन्यते । कुशलद्वारतया समुद्धृतम् ।' असे कालिदासाने म्हटले आहे, त्याचे मर्म राजवाड्यांच्या वर्तनावरून मनावर चांगले ठसते.

या मोठ्या गोष्टी होत्या आणि फार पुढच्या होत्या. आज बायको मेल्यामुळे राजवाड्यांच्या तोंडाशी आलेला प्रश्न म्हणजे दोन वेळा दिवसातून हातातोंडाची गाठ पडण्याचा होता. त्या दिवसात बुधवारात ढमढेरे यांच्या वाड्यात राजवाड्याचे स्नेही विसूभाऊ साळवेकर यांनी एक भोजनगृह चालविले होते. न. चिं केळकर, शिवरामपंत परांजपे असे पुण्यातले त्यावेळचे प्रतिष्ठित नागरिक त्या भोजनालयात प्रसंगोपात्त जेवायला जात असत. राजवाड्यांनी या भोजनालयाचा आश्रय केला. योगायोगाने या खाणावळीचे नाव ' अन्नपूर्णागृह ' असेच होते. राजवाड्यांच्या स्वतःच्या 'अन्नपूर्णा 'गृहाचा संबंध त्यांची बायको अन्नपूर्णा हिच्या मृत्यूने संपला, आणि ते दुसऱ्या 'अन्नपूर्णागृहात ' जाऊ लागले. राजवाडे त्या दिवसांत नोकरीच्या पाशातून मुक्त झालेच होते. तेव्हा उरलेला वेळ ते वामन मोरेश्वर पोतदार यांच्याकडे घालवीत. पोतदार व राजवाडे डेक्कन कॉलेजपासूनचे सहाध्यायी होते. पोतदार वकिली करीत होते व सध्या जेथे किर्लोस्कर थिएटर म्हणजे वसंत टॉकीज आहे, त्या जागी दुसऱ्या मजल्यावर राहत असत. राजवाडे त्यांच्याकडे येत ते बहुतेक वेळ त्यांच्या घरावरील तिसऱ्या मजल्याच्या माळ्यावर वाचन करण्यासाठी होय. कधीकधी तेथे विजापूरकर येत आणि मग राजवाडे, पोतदार आणि विजापूरकर यांच्या गप्पा तासन्तास चालत. त्या गप्पातले अक्षरसुद्धा कळत नसताना, त्यावेळी पाच–सहा वर्षांचे असलेले दत्तोपंत पोतदार त्या गप्पा ऐकत असत. अंगात निळसर काळा कोट डोक्याला पांढरा फेटा, आखूड धोतर, पायात जोडा आणि एका हातात काठी असा पोषाख केलेल्या राजवाड्यांच्या तेजःपुंज, गोऱ्यापान आणि रेखीव नाका–डोळ्याच्या मूर्तीचा जो आदरमिश्रित कुतुहलाचा ठसा दत्तोपंतांच्या बालमनावर त्या वेळी उठला, तो जन्मभर कायम राहिला. या काळात म्हणजे १८९४ च्या जानेवारीपासून त्यांनी 'भाषांतर'

मासिक सुरू केले. ते सुरू करताना त्यांनी जो ' उपोद्घात ' लिहिलेला आहे, त्यावरून त्यांनी हा उद्योग का सुरू केला, विशेषत: या उद्योगात फायदा काही न होता नुकसान मात्र सोसावे लागेल असा त्यांच्या हित-चिंतकांचा सल्ला असताही, का सुरू केला, या गोष्टीवर उत्तम प्रकाश पडतो. त्या ' उपोद्घाता 'त ते म्हणतात, ' आपला देश, आपला धर्म, आपली भाषा व आपले आचार, ह्यांना सर्वांनीच सोडले आहे. ज्या बंधाच्या योगाने राष्ट्रता प्राप्त होते त्यांचा आम्ही अव्हेर करतो व ज्याच्या योगाने ते नष्ट होते त्या कर्माचा आम्ही स्वीकार करतो. तेव्हा त्यांचा प्रतिबंध करण्यास योग्य उपायांची योजना केली पाहिजे ती वेळी न झाल्यास यहुदी राष्ट्राप्रमाणे आपण कदाचित या भूतला-वरून नष्ट होऊ. सर्व क्रियांचे मूळ मन हे आहे. भाषा ही त्याचे एक स्वरूप होय. देशाचा, धर्माचा आणि आचाराचा खरा अभिमान जागृत राहण्यास बोलणे, चालणे, लिहिणे, शिकणे व विचार करणे मराठीत झाले पाहिजे.त्याशिवाय कर्तव्याचा पक्का आणि कायमचा ठसा आपल्या मनावर उमटावयाचा नाही. भिन्न देशात भिन्न भाषी, ज्या भिन्न ग्रंथांच्या वाचनाने समाजाच्या मनावर महत्कार्ये घडलेली असतात, ते ग्रंथ जसेच्या तसे भाषांतर केले असता स्वदेशातील समाजावर तशी किंवा त्यासारखी कार्ये घडून येण्याच्या साक्षात किंवा परंपरा संबंध असतो. ही भाषांतरे कोणाकरिता आहेत या प्रश्नाचे उत्तर 'भाषांतर' या शब्दानेच काही अंशी दिले जाते. विशेष करून ज्यांना केवळ स्वभाषेचेच ज्ञान आहे, ज्यांना अन्य भाषेतील रसास्वाद घेण्याची इच्छा असून तशी साधने नाहीत त्यांच्याकरिता ही साधने आम्ही तयार करीत आहोत.'

' भाषांतर ' मासिकात राजवाडे यांनी आपले साहाय्यक आणि सहकारी याच्या मदतीने अनेक नामांकित पौर्वात्य आणि पाश्चात्य ग्रंथांची भाषांतरे प्रसिद्ध केली, उदा. शिवरामपंत परांजपे यांनी केशवमिश्र विरचित ' तर्कभाषा ' या ग्रंथाचे भाषांतर केले, काशीनाथ खंडेराव गर्दे यांनी बिशप बट्लर याची ' नीतिव्याख्याने ' चे भाषांतर

केले. टॉमस पेनचा 'सारासार विचार' मिलचा 'जनपदहितवाद' 'कीर्ती अथवा कर्तव्यकर्म' माधवाचा 'सर्वदर्शन संग्रह' स्सॉक्रेटिसाचा अंतकाल', प्लेटोचे 'रिपब्लिक अथवा सुराज्य' झेनोफनचे 'हीरो अथवा राजांची दैन्यावस्था' हे यांपैकी काही ठळक भाषांतरीत ग्रंथ होत. भाषांतर मासिक सदतीस महिने चालले व पुढे ज्या श्री विठ्ठल छापखान्यात ते छापले जात होते, त्या छापखान्याला आग लागल्यामुळे आणि त्या वेळी प्लेगची साथही जोरात असल्यामुळे १८९७ च्या फेब्रुवारीपासून बंद झाले.

राजवाडे यांचे मासिक बुडाले यात काही विशेष नव्हते. उपजले ते नाशे या सृष्टीच्या नियमाला आज निघणारी आणि उद्या बुडणारी मासिके काही अपवाद आहेत असे नाही. पण, मासिक बुडाले, तरी बुडाला नाही तो राजवाडे यांचा उद्देश होय. जुने शरीर आणि जुनी साधने नष्ट झाली तरी नवे शरीर व नवी साधने स्वीकारून आपले उद्दिष्ट साध्य करणाऱ्या आत्म्याप्रमाणे, राजवाडे यांचा मूळ उद्देश एक मासिक बंद पडले म्हणून थांबला नाही. तो दुसरे मार्ग शोधू लागला. भाषांतर मासिकाला एक वर्ष पूर्ण झाल्यानंतर राजवाडे यांनी त्या वर्षाचे समालोचन करणारा 'गतवर्ष' नावाचा एक लेख लिहिला आहे. त्यात, त्यांच्या सबंध जीवनाची मूलभूत प्रेरणा असलेल्या या उद्देशाचा आविष्कार त्यांनी इतक्या जिवंत कळकळीने आणि अनुकरणीय व ठसठशीत शब्दांत केला आहे, की त्यातील महत्त्वाचा भाग त्यांच्याच शब्दात देणे योग्य आहे.

'परंतु सरकारच्या मानभावी कळकळीवर विशेष भिस्त न ठेविता व महाराष्ट्रातील उच्च मंडळीच्या पूर्ववसातील अनास्थेकडे दुर्लक्ष न करता, आपल्याला आपले कर्तव्य यथाशक्ति बजाविले पाहिजे. त्याची हलगर्जीपणाने आपण हेळसांड केली तर पुढील पिढ्यांचे अभिशाप घ्यावे लागतील आणि आपल्या कर्तव्यशून्यतेबद्दल व मनाच्या दुबळेपणाबद्दल इहलोकी आपला विशेष बोज न राहाता परलोकी आपल्याला झाडा द्यावा लागेल. दुनिया आबादीआबाद असतानाही मनुष्याला आपल्या कर्तव्याला जपावे लागते. मग सर्व बाजूने कालचक्र

फिरले असता, राष्ट्रातील एकोनएक लोक देशोधडीला लागले असता, उलटया काळजाच्या शत्रूने सर्वतोपरी नागविले असता, मतलबी लोकांच्या गोड बोलण्याला उच्च मंडळी भुलून गेली असता, परकीय मंडळींनी सुचविलेल्या अश्रुतपूर्व विषयांची निष्फळ वाटचाल करण्यात सर्व लोक गुंग होऊन गेले असता, निष्काम बुद्धीने व एकतानतेने कर्तव्य बजाविण्याची आवश्यकता विशेषच असते हे निर्विवाद आहे. अशा वेळी लहानसहान संकटांना भिऊन जाऊन किंवा जुजबी व अल्प-कालीन फायद्याकडे नजर देऊन, जो मनुष्य कर्तव्याला विसरेल, त्याने आत्मघात केला, एवढेच नव्हे तर देशघात केला असेही होईल.

'त्यावर कोणी असा प्रश्न विचारील की, हे असे खडतर कर्तव्य तरी कोणते ? तर ते स्वत्वरक्षण हे होय असे आम्ही उत्तर करतो हे स्वत्व म्हणजे काय ? तर ते फार मिश्र स्वरूपी आहे त्यात देशाचा, भाषेचा, धर्माचा, आचाराचा, विचाराचा, विकाराचा, गोत्राचा,हवेचा, पूर्ववृत्ताचा, सुधारणेचा व कोटीचा अंतर्भाव होतो. ह्या सर्व गोष्टी हजारो वर्षांच्या अनुभवाचे फल होते. ह्या आपल्या राष्ट्राच्या शरी-रात इतक्या काही खिळून गेल्या आहेत की,ह्यांपैकी कोणत्याही एकीचे स्वरूप बदलू म्हटले तर ते मोठे अपायकारक होईल. आपल्याला जे काय करावयाचे असेल ते ह्या गोष्टींच्या अनुसंधाने करून घेतले पाहिजे. भाषा ही समाजाचे बंधन आहे, भाषा ही विचाराचे वाहन आहे, भाषा ही धर्माचे पुरस्करण आहे. ह्या देवतेची मनोभावेकरून आराधना केली असता सर्व काही प्राप्त होते व वर सांगितलेले जे बहुरूपी स्वत्व त्याचेही रक्षण हिच्याच साहाय्याने होते.'

नेहमी अष्टौप्रहर गजबजलेल्या पुणे शहराची स्थिती या वेळी ओळखू येणार नाही इतकी पालटली होती. प्लेगच्या साथीचा झपाटा इतका विलक्षण होता की उंदराप्रमाणे माणसे पटापट मरत होती आणि उरलेले लोक जीव बचावण्यासाठी मिळेल त्या मार्गाने शहर सोडून वाट फुटेल तिकडे पळत होते. टिळकांनी म्हटल्याप्रमाणे 'परवापर्यंत गावाबाहेर जितके लोक गेले इतके होळकराच्या दंग्याच्या वेळीही गेले नसतील असे आम्हास वाटते. मग हा वाढत चाललेल्या

हतवीर्यतेचा प्रभाव म्हणा, अगर अज्ञानाचा किंवा गैरसमजाचा म्हणा, सगळया पुण्यात अगदी शुष्क होऊन गेले. बोलायला माणूस मिळणे कठीण होते. जगणेच जेथे संशयात पडले होते, तेथे इतर कामाचा विचारसुद्धा सुचणे शक्य नव्हते. पण, आयुष्यात अनेकदा असे होते, की सर्व संपले असे वाटते,त्याच वेळी नेमकी नवी पहाट उमलते. अंधाऱ्या भुयारात चाचपडणाऱ्या माणसाच्या हातून अकस्मात गुप्त कळ फिरविली जाते आणि त्याबरोबर एवढा वेळ बंद असलेला दरवाजा खाडकन उघडतो आणि पलीकडे पसरलेला प्रकाशाने उजळलेला अफाट आणि विस्तीर्ण प्रदेश पाहून त्याच्या डोळ्यांचे पारणे फिटते. असाच प्रकार राजवाड्यांच्या बाबतीत या वेळी झाला अकल्पित योगायोगाने त्यांची व डेक्कन कॉलेजातील प्रोफेसर आबाजी विष्णु काथवते यांची गाठ पडली. काथवते नुकतेच वाईहून जाऊन पुण्यास आले होते. वाई हे त्यांचे गाव. वाईला काकाराव पंडित यांना त्यांच्या राहत्या वाड्याच्या तिसऱ्या मजल्यावरच्या एका भिंतीच्या पेटाऱ्यात पानिपतच्या मोहिमेबद्दलची अस्सल पत्रे सापडली आहेत, अशी बातमी काथवते यांनी राजवाडे यांना सांगितली गेली. सहा-सात वर्षे राजवाडे हे मराठ्यांच्या इतिहासाच्या अशा अस्सल आणि विश्वसनीय साधनांच्या शोधातच होते. काथवटे यांनी सांगितलेली नवलवार्ता ऐकल्यावर राजवाडे क्षणभरही थांबले नाहीत. त्या प्रसंगाने त्यांच्या आयुष्याला कायमची कलाटणी मिळाली. इतिहास संशोधनांचे आजपर्यंत जवळ जवळ अज्ञात आणि अक्षुण्ण राहिलेले, अफाट आणि अमर्याद दालन त्यांच्यापुढे खुले झाले. काथवते यांची भेट म्हणजे त्यांच्या भवितव्यतेचे त्यांच्यापुढे किलकिले झालेले दारच होते.असल्या भवितव्यांना द्वाराणी भवानी सर्वत्र असे कालिदासाने म्हटले आहे ते किती खरे आहे बरे! त्याच रात्री ते पुण्याहून वाईस येण्यास निघाले. वाईस आल्याबरोबर दुसरे दिवशी सकाळी त्यांनी काकाराव पंडितांची गाठ घेतली.

बाबाराव पंडित हे राजवाड्यांचे विद्यार्थीच होते. ते पुण्याला वकिलीचा अभ्यास करीत असता रा. ब काशीनाथ नारायण साने यांचे 'महाराष्ट्र इतिहासाचे महत्त्व' या विषयावर एक मोठे विचार-

प्रवर्तक व्याख्यान झाले. त्या व्याख्यानाचा काकाराव पंडितांवर फार परिणाम झाला आणि आपणही काही इतिहाससंशोधनाचे काम करावे असे त्यांना व त्यांचे स्नेही रंगो वासुदेव बोपर्डीकर यांना वाटू लागले. त्या इच्छेने त्यांच्या राहत्या वाड्यात शोध होत असता ही पत्रे त्यांना सापडली. त्यांनी व बोपर्डीकरांनी ती तपासली. तो पहिलेच पत्र पानिपतच्या लढाईतील महत्त्वाचा माणूस गोविंदपंत बुंदेले यांचे स्वदस्तूरचे निघाले. ते पाहून त्यांना अतिशय आनंद झाला. त्यांनी सर्व पत्रे व्यवस्थित लावली. ती एका पुस्तकाचा ऐवज होईल इतकी भरली. योगायोगाने त्याच वेळी काथवते वाईस आले होते. त्यांना त्यांनी ती गोष्ट सांगितली. काथवते तावडतोब पंडिताच्या घरी आले. व त्यांनी ते सर्व कागद वाचून पाहिले. आणि रा. ब. साने किंवा राजवाडे यांजकडे ते कागद पाठविण्याची शिफारस केली. इतकेच नव्हे तर पुण्यास गेल्यावरही काथवटे यांनी ते कागदपत्र नीट जपून ठेवण्यास पंडितांना लिहिले व राजवाड्यांनाही ती हकीकत सांगितली.

ती पत्रे राजवाडे यांनी पाहिली आणि त्यांचे देहभान हरपले. जेवण आणि झोप, तहान आणि भूक, यांचा त्यांना विसर पडला. रात्री दिवसा, सकाळी दुपारी, पहावे तेव्हा ते त्या पत्राच्या वाचनात गढून गेलेले दिसत. भूक लागली म्हणजे तसेच ते चार घास पोटात ढकलीत आणि झोप लागली म्हणजे बसल्या बसल्या दहा–पंधरा मिनिटे डुलकी घेत. त्या निर्जीव पत्रांतून राजवाडे यांच्या अन्तर्भेदी कल्पनाशक्तीला त्यांचे जिवंत पूर्वज दिसत होते. माटे यांनी एके ठिकणी ऐतिहासिक पत्रांच्याबद्दल म्हटले आहे, 'अशी पुस्तके वाचू लागलो की आपण जिवंत माणसांच्या संगतीत आणि खरे खरे जे काय सांगावयाचे होते ते सांगणाऱ्या माणसांच्या संगतीत वागत आहो असे मला वाटू लागते ! ती पानपतची पत्रे वाचीन असता राजवाडे अशा दोनशे वर्षीपूर्वी मेलेल्या पण आता पुन्हा जिवंत झालेल्या माणसांच्या संगतीत वागत होते. त्यांचे असे अमानुष श्रम पाहून एक माणूस त्यांना म्हणाला, 'अहो असे काम करून लौकर मरून जाल !' तेव्हा ते

संतापून म्हणाले, 'काम करून मनुष्य मरत नाही. आळसाने लौकर मरतो. माझ्या आधी मीच तुम्हास पोचवीन.'

राजवाडे यांनी दोन महिने त्या पत्रांचा नीट अभ्यास केला. त्या मोडी पत्राचे बालबोधीत रूपांतर केले. त्या कामी पंडित आणि बोपर्डीकर यांनी त्यांना फार मदत केली. आणि मग ती पत्रे घेऊन ते पुण्याला गेले. तेथे 'श्री. विठ्ठल छापखान्या'त ती छापण्यास सुरुवात केली. तोच छापखान्याला आग लागून ती सर्व पत्रे 'अग्नये स्वाहा' झाली. ते तणतणत वाईला आले. पुन्हा पत्राचे बालबोधीत रूपांतर केले. आणि पुन्हा एकदा सापकरांच्या छापखान्यात छापन्यास सुरुवात झाली पण प्रत फार अशुद्ध निघू लागली. म्हणून ती रद्दीच्या भावाने विकली. अखेर भाऊशास्त्री लेले यांच्या मोदवृत्त छापखान्यात तिसरी प्रत छापली. आणि १८९८ साली 'मराठ्यांच्या इतिहासाची साधने' या नावाने ती प्रसिद्ध झाली.

पानपतच्या पत्रांचे हे काम हातावेगळे झाल्यानंतर काकाराव पंडिताच्या मदतीने वाई प्रांतातील अनेक इतिहासप्रसिद्ध घराण्याची दप्तरे राजवाडे यांनी तपासली. पंत राजाज्ञा यांच्या दप्तरात दोन तीनशे वर्षांची हिशेबी कागदपत्रे व निवाडापत्रे, करिणे, इनामपत्रे, तहपत्रे त्यांना आढळली. पंडितांच्या वाड्यातले दप्तर तपासले ते बुंदेलखंडातील पेशव्यांचे हरखदत्त येरंडे यांचे होते. त्या दप्तरात पानपतास असता सदाशिवराव भाऊ यांनी गोविंदपंत बुंदेल्यास लिहिलेली पाचचारशे पत्रे होती. तिसरे दप्तर दुसऱ्या बाजीरावांचे सासरे सरदार रास्ते यांचे होय. चौथे दप्तर विस्तीर्ण अती प्रचंड असून 'इतिहासाच्या भोक्त्यांची मनःकामना तृप्त करण्यासारखे होते.' हे दप्तर म्हणजे मेणवली येथील नाना फडणिसांचे होय. या दप्तरात शंभर रुमाल होते. त्यातील निम्म्याहून अधिक जाबसाली पत्रांचे व उरलेले हिशेबी होते. जाबसाली पत्रांची संख्या सुमारे वीसपासून पंचवीस हजारापर्यंत होती. व 'त्या पैकी प्रायः प्रत्येक पत्र अत्यंत महत्त्वाचे आहे.' हे रुमाल सोडून पाहून आत काय आहे हे नुसते वरवर पाहण्यास राजवाड्यांना एक आठवडा लागला. या दप्तरात

नकाशांचा एक रुमाल होता. इंग्लिश नेव्हीचेही काही नकाशे होते. सवाई माधवरावांच्या नानाच्या कारकुनाने लिहिलेली एक डायरी होती. त्यात त्यांच्या मरणापासून जन्मापर्यंतच्या दैनंदिन व्यवहाराचा इतिहास होता. 'एकंदरीत हे दप्तर बिनमोल आहे. नानांचा खरा मोठेपणा हे दप्तर सबंध प्रसिद्ध केल्याविना कळणार नाही. या प्रचंड बुद्धीच्या व कर्तृत्वाच्या पुरुषासंबंधी अजूनही फार कोत्या कल्पना आहेत. युरोपातील अलिकडील प्रसिद्ध मुत्सद्यात माझ्या मते नानाच्या बरोबरीचा ह्या चारशे वर्षात एकच मुत्सद्दी झालेला दिसतो. तो स्पेनचा एंपस पाचवा चार्लस याचा गुरू कार्डिनल झिमिनस हा होय.'

पण नाना फडणीसाचे हे बिनमोल दप्तर राजवाड्यांचे हातून प्रसिद्ध व्हावे असा योग नव्हता. आधी त्यांना हे दप्तर पाहायलाच मुळी परवानगी मिळेना. ते मेणवलीला प्रथम एकटेच गेले. त्यांना हरकत घेतली. तेव्हा ते रागाने लाल होऊन वाईला परत आले. तेव्हा वाईचे रामकृष्णपंत लेले यांच्या मध्यस्थीने त्यांना एकदाची परवानगी मिळाली. ते दप्तर तपासताना राजवाडे यांनी उद्योगाची पराकाष्ठा केली. 'दररोज दहा तासप्रमाणे मी काम करीत असे.' पंडित आणि गोपाळराव रास्ते त्यांना मदत करीत असत. त्या दप्तरातील प्रसिद्ध व्यक्तींच्या बद्दलचे कागद निरनिराळे बांधण्यास त्यांनी ऐंशी रुपयांचे कापड विकत घेतले व सर्व रुमालांवर निरनिराळ्या व्यक्तींची नावे घालून ते कागद व्यवस्थित लावून ठेविले. नानांचे नकाशे निराळ्या रुमालात बांधून ठेवले. मेणवली दप्तराचे काय चालू असताना राजवाडे म्हणत, 'मी शंभर वर्षे जगलो आणि हे मेणवली दप्तर प्रकाशनाचे काय सुरू केले, तर माझे सर्व आयुष्य खर्च झाले तरी हे कार्य तडीस जाणार नाही.' अशा प्रकारे पदरमोड करून राजवाडे काय करीत असता, एकदा असे झाले, की नकाशाच्या रुमालातले एक-दोन नकाशे हरवल्याचा राजवाड्यांना संशय आला, म्हणून त्यांनी चौकशी चालविली, तेव्हा मालकानेच त्याच्यावर तोहमत घेतली. त्याबरोबर संतापून राजवाड्यांनी त्या दप्तराचे काम सोडून दिले. त्यात पुन्हा असे झाले की, टिळकाच्यामार्फत हे दप्तर हस्तगत करून ते प्रसिद्ध

करण्याची तजवीज करण्याचे राजवाड्यांच्या मनात होते. आपला हा मनोदय त्यांनी साताराचे प्रसिद्ध वकील दादासाहेब करंदीकर यांस सांगितला. करंदीकरांचा ओढा साताऱ्च्या पारसनीसांकडे होता. त्यांनी ती गोष्ट पारसनिसांना सांगितली. त्याबरोबर पारसनिसांनी श्रीमंत मावजीशेट यांच्यामार्फत ते दप्तर हस्तगत केले. करंदीकरांच्या या विश्वासघातामुळे तेव्हापासून राजवाड्यांच्या मनात त्यांच्याविषयी अत्यंत तिरस्कार उत्पन्न झाला. जेव्हा जेव्हा मेणवली दप्तराची त्यांना आठवण होई, तेव्हा तेव्हा त्याचे मन उद्वेगाने भरून जात असे.

असाच थोडासा प्रकार वाई प्रातांतील ओझर्डे गावच्या पिसाळ देशमुखांच्या दप्तराच्या बाबतीत झाला. दप्तर सूर्याजी पिसाळाचे होते म्हणून महत्त्वाचे होते, कारण औरंगजेबाचा व सूर्याजीचा झालेला पत्रव्यवहार त्यांत होता, व त्यामुळे औरंगजेबने महाराष्ट्रावर स्वारी केली त्यावर बराच प्रकाश पडू शकला असता. दप्तराच्या मालकाची अनुकूलता मिळाली, त्यातली पत्रेही राजवाडे ग्रंथमाला मासिकात प्रसिद्ध करू लागले, पण एका पत्रात सूर्याजीने मराठ्यांना 'गनीम' असा शब्द लावल्याने राजवाडे रागावले व पत्रे प्रसिद्ध करताना 'सूर्याजी हा राजद्रोही होता' अशी टीप त्यांनी जोडली. ही गोष्ट दप्तराचे मालक जे सूर्याजीचे वंशज त्यांच्या नजरेस आल्याबरोबर त्यांनी राजवाडे यांना दप्तर दाखवण्याचे सपशेल नाकारले. त्याचे म्हणणे होते की, 'इट्टीचे गायकवाड, शिंदे, होळकर हे इंग्रजाशी सलोख्याने वागून त्याच्या हिताशी समरस होतात, तरी ते राजद्रोही ठरत नाहीत. मग त्यावेळी सार्वभौम असलेल्या सत्तेशी सूर्याजी पिसाळ समरस झाला त्यामुळे तो राष्ट्रद्रोही कसा ?' पण राजवाड्यांना ते म्हणणे काही पटले नाही. काका पंडितांनीसुद्धा त्यांची समजूत घालण्याचा प्रयत्न केला पण राजवाडे त्यांच्यावरच संतापले. परिणामी त्यांना पिसाळ दप्तराला मुकावे लागले.

याशिवाय वाई, सातारा प्रांतातील शिंदे, भिताडे, शेखमिरे इत्यादी इतिहासप्रसिद्ध घराण्याची दप्तरे त्यांनी पाहिली. पिंपरी येथील भाग-

वतांच्या दप्तरात त्यांना ब्रह्मेंद्रस्वामींचा पत्रव्यवहार मिळाला. गगनबावडा येथे पंतअमात्यांचे दप्तर त्यांनी पाहिले. कायगाव टोक्याचे दीक्षित, खासगीवाले, रायरीकर, बारामतीचे गोविंदराव काळे यांची दप्तरे तपासली. मावळ भागात जेधे, सिळीमकर, गुप्ते, देशपांडे, पुरंदरे, हिंगणे, जाधव, बानखोऱ्यातील मरळ देशमुख, सातारा येथील राजोपाध्ये इत्यादी प्रसिद्ध घराण्यातले कागदपत्र त्यांनी जमा केले. तंजावरच्या बृहदेश्वराच्या देवालयावरील सर्फोजीचा प्रसिद्ध शिलालेख पाहिला. प्रभानवल्लीचे सरदेसाई, देवरूखचे देसाई, कऱ्हाडचे गिजरे इत्यादी घराण्यातील कागदपत्र पाहिले. १८९८ पासून १९१८ पर्यंत अखंड वीस वर्षे त्यांनी हा उद्योग केला व मराठ्याच्या इतिहासाची साधने या नावाखाली एकवीस खंडात ही पत्रे प्रसिद्ध केली. या सर्व खंडात मिळून ४४१७ अस्सल ऐतिहासिक पत्रे प्रसिद्ध झाली आहेत.

त्यांनी जमा केलेल्या पत्रसंपत्तीच्या मानाने ही प्रसिद्ध झालेली पत्रे म्हणजे कुठल्या झाडाचा पाला म्हणावी लागतील कारण एवढी पत्रे प्रसिद्ध करूनही त्यांच्यापाशी पन्नास हजार पत्रे शिल्लक राहिली होती. त्याखेरीज जुनी मराठी गद्यपद्य बाडे त्यांना मिळत. तीही त्यांनी प्रसिद्ध केली. दासोपंताची बाराशे पदे, ज्ञानेश्वरीची एकनाथपूर्व प्रत, राधामाधवविलासचंपू ही काही उदाहरणे. राजवाड्यांच्या पूर्वी तर राहोच, पण त्यांच्या नंतरही एका माणसाने मराठ्यांच्या इतिहासाची इतकी अफाट आणि पर्वतप्राय साधनसंपत्ती जमविल्याचे उदाहरण नाही. त्यांचा हा 'न भूतो न भविष्यती' असा पराक्रम पाहिला म्हणजे ज्याप्रमाणे काव्यात कालिदासाबद्दल त्याप्रमाणे इतिहासात साधनसंपत्ती मिळवण्याच्या बाबतीत राजवाड्यांबद्दल अनामिका सार्थवती बभूव' असे उद्‌गार काढल्याशिवाय गत्यंतर नाही.

ज्या परिस्थितीत राजवाडे यांनी ही ऐतिहासिक पत्रे, पोथ्या लेख जमविले तिचा विचार केला, तर राजवाडे याच्या लोकोत्तर योग्यतेची यथार्थ कल्पना येईल. त्यांच्या पुढील परिस्थिती प्रत्येक बाबतीत कठीण होती. इतिहासाची आस्था त्यांनीच म्हटल्याप्रमाणे, गेल्या तीस

पस्तीस वर्षांत आणि तीही थोड्या लोकांत निर्माण झाली होती. त्यामुळे दप्तरांचे महत्त्व राजवाड्यांना कळले तरी त्या दप्तरांच्या मालकांना कळलेले असेलच असा संभव नव्हता. त्यांच्या मनावर अज्ञान, पूर्वग्रह, संशय, अनास्था यांचा जबरदस्त पगडा होता. पुन्हा राजवाडे काही प्रसिद्ध पुरुष नव्हते की श्रीमंत नव्हते. की लोकहित-वादीसारखे इनाम कमिशनचे सरकारी अधिकारी नव्हते की, त्यांना इनामदार, सरदार, जहागिरदार, पाटील, कुलकर्णी यांच्या दप्तरांत मुक्तद्वार असावे. जेथे जात तेथे ते बहुधा अनोळखी असत आणि ओळखीचा संभावित मध्यस्थ बरोबर नसेल तर ‘ अज्ञात कुलशीलस्य वासो देसो न कस्यचित् ’ अशा मालकांच्या वृत्तीमुळे त्याच्या कामात अडथळे निर्माण होत. जेथे काम होई तेथे राजवाड्यांना आपल्या मनस्वी व संतापी स्वभावाला आणि खाणेपिणे, हवापाणी, स्वच्छता, शुद्धता या बाबतीतील चिकित्सेला मुरड घालावी लागे, की मैलच्या मैल उन्हा-पावसातून चालण्याचे किंवा इतर कष्ट याची गोष्टच सोडा. इतकेही कष्ट सोसून कधी काम होई, कधी होत नसे, कधी झाले तर अगदीच क्षुल्लक होई. राजवाड्यांच्या इतिहास संशोध-नाचा इतिहास ज्या मराठ्यांच्या इतिहासाचे ज्यांनी संशोधन केले, त्या इतिहासाप्रमाणेच उदात्त, करुण, वीर, हास्य अशा रसानी व प्रसंगांनी भरलेला आहे. त्यांच्या आयुष्यातले ते ‘ तितिक्षापर्व ’ आहे, ‘ उद्योगपर्व आहे, ‘ युद्धपर्व ’ आहे.

एकदा राजवाडे खानदेशातील सिंदखेडा येथे गेले होते. तेथील राऊळ घराण्याचे ऐतिहासिक कागद त्यांना तपासायचे होते. कागद मिळाले पण ते एक बळदात धुराळ्यात टाकून दिले होते. धूळ आणि धुराळा यांना राजवाडे मनस्वी भीत. कारण त्यात रोगजंतु असतात असा त्याचा ठाम सिद्धांत होता. पण या वेळी त्यांनी आपल्या भीतीला आणि सिद्धांताला रजा दिली आणि ते दप्तर तपासताना धुराळा त्यांच्या नाकात आणि घशात जाऊन ते शिकांनी आणि खोकल्याने हैराण झाले, तरी त्याची पर्वा न करता त्यांनी शांतपणे ते दप्तर अथ-पासून इतिपर्यंत तपासले.

भोर तालुक्यातील आंबडखिंडीपासून आठ मैलांवर असलेल्या कण्हेरी येथील रामदासी मठात राजवाडे एकदा गेले होते. ते गेले त्यावेळी तेथे पाण्याचा अत्यंत दुष्काळ होता व होते ते पाणी बिघडलेले होते. गावात नारूची साथ जोरात होती. हा मठ रामदासाचे प्रसिद्ध शिष्य वासुदेव पंडित यांचा होता. पण आज त्यांची सगळी पडझड झाली होती. मठपती व त्यांचे कुटुंबीय सारे अस्वस्थ दिसत होते. मठपतीची गाठ पडल्यावर राजवाड्यांनी कागदपत्रांची गोष्ट काढली. तेव्हा मठपती म्हणाले, 'आपत्ती इत्यादी कारणामुळे मठातील कागदपत्र नष्ट झाले असून महत्त्वाचे असे जुने कागदपत्र आपणास देण्यासारखे काही शिल्लक नाहीत.' तेव्हा राजवाडे म्हणाले, 'मठ फार प्राचीन आहे व महत्त्वाचा आहे. तेव्हा जे काय कागदपत्र असतील ते मला दाखवा म्हणजे त्यातून आमच्या उपयोगाचे काही निघतात की काय ते कळेल. उपयोगाच्या दृष्टि व गर्भ अनेक आहेत त्यांची आपणाला पूर्ण कल्पना असेलच असे नाही.' अखेर मोठ्या कष्टाने मठपती असलेले कागद व पोथ्या दाखवण्यास तयार झाले पण त्यांनी अशी अट घातली की, 'प्रथम आपण स्नान करून भोजन ऊर्फ प्रसाद ग्रहण करावा आणि मग कागद पहात बसावे.' त्या ओंगळ मठातल्या त्या ओंगळ मठपतीचे ते जेवणाचे आमंत्रण म्हणजे चोखंदळ राजवाड्यांना प्राणसंकट होते. पण त्यांच्या आमंत्रणाचा अनादर केल्यास तो कागद दाखविणार नाहीत, हे लक्षात येऊन, इच्छा नसतानाही ते जेवायला बसले. अस्वच्छ ताटवाटी, तसेच अस्वच्छ पाणी, लठ्ठ तांदळांचा भात व जाड भाकर व तिखटजाळ आमटी असा जेवणाचा एकंदर थाट होता. राजवाड्यांनी चारदोन घास खाल्ल्यासारखे केले व पाण्याचा एकही घोट पोटात जाऊ न देता जेवण आटपले व मालकाला दप्तरे काढण्यास सांगितले मिळालेले काही कागदपत्र बरोबर घेऊन ऐन उन्हात ते परत निघाले. बरोबर त्यांचे स्नेही मुंडले होते. गावची शीव ओलांडल्याबरोबर इतका वेळ त्या मठपतीबद्दल दाबून ठेवलेला राजवाड्यांचा संताप ज्वालामुखीप्रमाणे उसळला आणि 'कोठे रामदास आणि कोठे त्यांच्या शिष्यांचे

करंटे वशंज ' अशा शब्दांनी त्या मठाच्या दुरवस्थेचा व त्या मठ-पतीचा उद्धार करण्यास त्यांनी सुरुवात केली. अर्धा तास अत्यंत ग्राम्य शब्दात ते त्यांना शिव्या देत होते तेथून चार मैलांवर एका झऱ्यावर त्या दिवशी ते पाणी प्याले. मुंडले यांना ते म्हणाले, ' हा तुम्हाला पहिलाच प्रसंग आहे. पण असे शेकडो प्रसंग मला नित्य अनुभवावे लागतात यावरून माझे कार्य किती बिकट आहे याची तुम्हास थोडी कल्पना येईल. '

एकदा राजवाडे कऱ्हाडला गेले होते. कऱ्हाडपासून चारपाच मैलां-वर विंग नावाचे खेडे आहे. तेथे एका गृहस्थाजवळ काही ऐतिहासिक कागदपत्र आहेत असे राजवाड्यांना समजले. तडक ते कऱ्हाडहून पहाटे पायीच निघाले ते १०–११ च्या सुमारास विंगास येऊन त्या गृहस्थास भेटले पण तो माणूस राजवाड्यांस ओळखत नव्हता. त्या-मुळे माझ्या विरुद्ध माझ्या भाऊबंदांस माझ्या कागदाचा उपयोग तुम्ही करून देणार नाही कशावरून ' अशी शंका काढून त्याने दाखवण्यास काढलेले कागद पुन्हा दप्तरांत बांधून ठेवले. माझा तुमच्या भाऊ-बंदांशी काही संबंध नाही. मला त्यांची माहितीही नाही. ऐतिहासिक तेवढे कागद पाहून त्यांच्या नकला मी करून घेतो.' असे राज-वाडे यांनी त्याला परोपरीने सांगितले. पण त्यांची समजूत म्हणून पटेना. राजवाड्यांचे काम काही झाले नाही. ते निराश झाले व व संतापले आणि त्याला अद्वातद्वा बोलून भर उन्हात स्वारी तडक कऱ्हाडवरून निघाली ती दुपारी एक वाजता येऊन पोचली. त्या उन्हामुळे व लांबच्या प्रवासामुळे त्यांना फार त्रास झाला व तळ-पायास मोठा फोडही आला. गुंजवण मावळातील एका खेड्यात शिवकालीन देशमुखांचे घरी शिवकालाशी संबंधित असे कागद पाह-ण्यास राजवाडे गेले होते, तेव्हा तर अशाच कारणांवरून भांडण विकोपास गेले आणि गोष्ट बोलता बोलता मुद्यावरून गुद्यावर आली. राजवाडे देशमुखांकडे गेले. त्यांनी त्या भागातील एका प्रतिष्ठित प्रस्थापिताचा मध्यस्थ किंवा जामीन म्हणून संदर्भ दिला व मोठ्या गोड भाषेत कागद दाखवावेत म्हणून देशमुखांची प्रार्थना केली. पण

देशमुखांचा नकार आधीच ठरलेला होता. कारण त्या काळात सर्व-सामान्य कागदाच्या मालकांना जी भीती होती, की आपल्या कागदाचा आपल्याविरुद्ध आपल्या भाऊबंदांसाठी दुरुपयोग केला जाईल, तिने त्यांनाही पछाडले होते. त्यामुळे राजवाडे जो जो मऊ बोलू लागले तो तो देशमुख मजकूर उर्मट बोलू लागले. तेव्हा राजवाडे यांचाही मूळचा रुद्रावतार जागा झाला व देशमुखाला अगदी ग्राम्य भाषेत इरसाल शिव्या देत ते त्याच्या घरातून निघाले व परत निघाले. परतीच्या वाटेवरही तोंडाने तोफखाना चालूच होता. त्यांच्या मागोमाग देशमुखही काही मंडळींसह तसल्याच शिव्या देत त्यांच्या मागे येत होते– 'सभ्य घरचे नाव सांगून हा आला म्हणून याला जिवंत ठेवला, नाहीतर केव्हाच याचे टकोरे कुऱ्हाडीने फोडून टाकले असते, अन् बेपत्ता करून टाकला असता.' पुढे राजवाडे आणि मागे देशमुख मंडळी अशीही वरात राजवाडे उतरले होते त्या मुक्कामी आली. सुदैवाने त्याच वेळी ज्याचे नाव राजवाड्यांनी देशमुखाला सांगितले होते, तो संभावित गृहस्थ तेथे राजवाड्यांची चौकशी करीत आला. त्याने एकंदर प्रकार ताडला व देशमुखांची समजूत घातली. त्याने राजवाड्यांचे कार्य, त्यांची योग्यता, लोकांतली मानमान्यता त्याला सांगितली व म्हटले की, 'त्यांच्यातून तुमच्या कागदाचा, प्राण गेला तरी दुरुपयोग होणार नाही अशी मी हमी देतो. कागदांसाठी रानोमाळ उपाशी–तापाशी उन्हा-पावसात हिंडणारा व वारंवार हिरमोडीशी गाठ पडणारा पुरुष थोडाफार संतापी स्वभावाचा बनणारच. पण हा पाहुणा जेथे आपला स्वार्थ तेथे शिव्यांनी बोलायला सुरुवात करील असे वाटत नाही.' इत्यादी बोलून त्याने देशमुखाला शांत केले व चहाचाही नैवद्य दाखविला, तेव्हा देशमुख थोडे प्रसन्न होऊन बोलले,

'तुम्ही म्हणता ते खरं. आधी फार गोड बोलत होता, पण काही वेळाने जणू अंगात वारं शिरल्यागत नाही नाही त्या शिव्या देऊ लागला. तुमचा पाहुणा म्हणून आम्ही सबूर केली.' अखेर पाहुण्याला उद्या कागद दाखवू असे देशमुखांनी आश्वासन दिले. देशमुखाने

राजवाड्यांना कागद तर पाहू दिलेच पण नकला करून घेण्यासाठी ते घरी आणण्याला सुद्धा आडकाठी केली नाही. शिराळा जिल्ह्यात चरणबिळाशी या गावी तेथील मुतालिकांचे कागदपत्र पाहण्यास राजवाडे, मुंडले यांच्या बरोबर गेले होते. मुतालिकाने त्यांचे आतिथ्य उत्तम केले पण ज्यासाठी राजवाडे झाले होते ते कागद काही केल्या तो दाखवीना. मुंडले म्हणतात, 'ज्या वेळी राजवाड्यांची चिकाटी व मनधरणी करण्याची भाषा अवर्णनीय होती. त्यांना आपल्या मूळ स्वभावावर ताबा ठेवणे किती जड जात होते व तसे करताना त्यांना किती वेदना होत होत्या हे पाहून मलाही अजब वाटल्यावाचून राहिले नाही.' अखेरीस त्या गृहस्थाने काही पोथ्या व चार-पाच दप्तरे पुढे टाकली. त्यांत चार-पाच कागदांशिवाय महत्त्वाचे असे काही नव्हते. तेवढ्याचीच टिपणे घेऊन राजवाडे बाहेर पडले आणि मुंडल्यांना म्हणाले, 'पहा, ब्राह्मण असूनही हा किती अडाणी व मूर्ख आहे !'

अशा अनुभवांनी विटून जाऊनच राजवाडे एकदा इंदूरचे मोकाशी यांना म्हणाले– 'तुला काय सांगू, देशावर असे काही जिद आहेत की, कसरीने कागदपत्र फडशा केले तरी ह्याचे चालतील पण आमच्यासारख्यांच्या हातात द्यायचे म्हणजे यांचे बाप मरतील ! काय म्हणे कागदपत्र छापल्यास आमच्या घराण्यांची बिंगे बाहेर पडतील ! हे बघ मागे एकदा असाच वऱ्हाडात गेलो होतो. एका वाण्याचे दुकानी, माल घेत असता एक-दोन दौलताबादी कागदपत्र मिळाले. हेच कागद आणखी दोन पाच पाहिजे होते तो काही देईना. ढळढळ रडलो, शेवटी रुपया फेकल्यावर त्या वाणगटाला दया आली. मग ती सर्व रद्दी पाठीवर घेऊन असा वाकत वाकत घरी आलो !' एकदा ग्वाल्हेरास एका भिक्षुकाजवळ ते एक जुनी महत्त्वाची पोथी मागत होते. तो काही देईना तेव्हा राजवाडे संतापून त्याला म्हणाले, 'तुझ्या विधवा बायकोपासून मी सर्व पोथ्या घेऊन जाईन.

पण, सर्वच ठिकाणी अशी नकारघंटा वाजे असे नाही. काही ठिकाणी अपेक्षा नसताना चांगले अनुभव येत. चिकुर्ड्याच्या इनाम-

दाराकडे राजवाडे गेले होते. तो फार आस्थेवाईक आणि स्वत:च्या घराण्याचा इतिहास बाहेर यावा अशी इच्छा असणारा दिसला. त्याने राजवाडे यांचा चांगला आदरसत्कार केला. त्यांच्याकडे काही महत्त्वाचे कागदपत्र तर मिळालेच पण मराठी भाषेचा 'आदि' फार मागे नेणारा एक ताम्रपट तेथील एका धनगराजवळ होता तोही त्या इनामदाराच्या कृपेने राजवाड्यांना पाहाता आला व तो ताम्रपट उतरूनही घेता आला. तो इनामदार स्वत: लिंगायत असल्यामुळे त्याने राजवाडे यांची राहण्याची सोय तेथील विठोबाच्या देवळात केली व जेवण्याची सोय ब्राह्मण शाळामास्तराकडे केली. कोकणात प्रवास करीत असता राजवाडे सरदेसाई यांच्या मूळ मावळण गावी गेले. गावात ओळखीचे कोणी नाही, म्हणून ते अयाचित वृत्तीने कोणाकडे तरी उतरावयाचे म्हणून सरदेसाई यांचेकडे उतरले. 'आपण काय उद्देशाने आला' विचारले, तेव्हा राजवाडे म्हणाले, 'पुरातन ऐतिहासिक कागदपत्रांचे शोधार्थ आलो आहे, आपल्याकडे काही कागदपत्र असल्यास दाखवावे.' तेव्हा सरदेसाई यांनी जेवण झाल्यानंतर जुन्या कागदपत्रांची दप्तरे राजवाड्यांपुढे आणून ठेविली. ती त्यांनी तपासून आतून कितीक कागद निवडून घेतले. लासगाव टोके येथील दीक्षित घराण्याचे कागदपत्र पाहण्यास राजवाडे गेले होते. लासगावी गेल्यावर त्यांनी दीक्षित घराण्याचे प्रमुख श्रीमंत मार्तंड सदाशिव दीक्षित यांस म्हटले की, 'मी आपल्या दप्तरातील कागदपत्र पहाण्यास आलो आहे.' तेव्हा दीक्षितांनी त्यांना विचारले. 'पेशवे घराण्यापैकी कोणत्या पेशव्यांचा पत्रव्यवहार आपणास पाहावयाचा आहे?' व त्यांनी राजवाड्यांपुढे ऐतिहासिक कागदपत्रांची व्यवस्थित बांधलेली दप्तरे आणून ठेवली. तेव्हा राजवाडे संतुष्ट होऊन म्हणाले की, 'आतापर्यंत मी अनेक ऐतिहासिक घराण्याची दप्तरे पाहिली. परंतु आपल्या दप्तराइतकी सुसंगत आणि व्यवस्थितपणे पत्ते लावलेली दप्तरे मी अजूनपर्यंत पाहिली नव्हती.' राजवाड्यांनी ती दप्तरे तपासून त्यातली महत्त्वाची अशी ७६६ पत्रे प्रसिद्ध करण्यासाठी परत बोलीच्या कराराने दीक्षिताकडून मागून घेतली. या काळात त्याचा

मुक्काम दीक्षिताकडेच होता.

पण असे अनुभव थोडे. तांदळात तांदूळ थोडे आणि खडेच फार असावे त्याप्रमाणे अशा गोड अनुभवापेक्षा कडू अनुभवांचीच पुनरावृत्ती फार होत असे.

इतका मनस्ताप व कष्ट सोसून जी दप्तरे हाती येत, ती दीक्षितासारखे काही अपवाद वगळता, माणसाची परीक्षा पाहणारी असत. त्यांची अवस्था खरी म्हणजे दुरवस्थाच असे. कधी ती दप्तरे उकिरड्यात तर कधी उकिरड्याची कळा आलेल्या जुन्या वाड्याच्या तळघरात तर कधी कधीही वापरात नसलेल्या तिसऱ्या–चवथ्या मजल्याच्या माळ्यावर पडलेली असत. उन्हाचे, पावसाचे, थंडीचे तडाखे खाऊन ती जर्जर झालेली असत आणि वाळवीने खाल्लेली असत. कधी कधी वाळवीने खाण्याची सीमा इतकी झालेली असे की वाळवीच्या किड्यांच्या मृत शरीराची माती त्या दप्तरात भिनून एकंदर दप्तराची कठीण माती किंवा पाटी बनलेली असे. अशा दप्तरांना प्रथम वाफारा द्यावा लागे. म्हणजे दगडासारखी झालेली ती दप्तरे काहीशी सुटी होत. मग अगदी हलक्या हाताने त्या दप्तराचे एकेक पान सुटे करावे लागे; ती सोडविलेली पाने पुन्हा चिकटू नयेत म्हणून त्यांच्यामधे एकेक टीपकागदाचे किंवा साध्या कागदाचे पान घालून ठेवावे लागे. इतकेही करून सर्व कागदातील सर्व अक्षरे लागतीलच असा संभव नसे. राजवाड्यांची एक-दोन आत्मचरित्रपर टिपणे आहेत, त्यात त्यांनी काही पोथ्या व कागद कोठून मिळविले व ते काय अवस्थेत होते याचा उल्लेख केला आहे तो पाहण्यासारखा आहे. 'अमरावतीकर काळे यांचे दप्तर परत नेण्यात हेतु असा होता की काळ्यांची मालकी दप्तरावर शाबीत व्हावी. पोथ्या प्रथम नेल्या त्या वेळी काळ्यांशी परत देण्याचा करार नव्हता. कुजत पडलेल्या पोथ्या त्या सोडवून व छापून जतन करून मी ठेवल्या तेव्हा मालकी कोणाची? मी अनेक ठिकाणाहून पोथ्या कुजत पडलेल्या मिळविल्या. त्यांच्यावरी मालकी माझी व मला वाटेल ते करण्याचा मला हक्क आहे. सातारकर महाराजांचे तबेल्यात लिदीत रुमाल पडले होते. त्यातून

काही कागद मी आणले आणि निवडले.'

अशा दप्तरातल्या पत्रांच्या आणि पोथ्यांच्या छापण्यासाठी बाळबोधीत नकला करणे हे पुढचे काम मागच्याला बरे म्हणवील असे असे. ही पत्रे मोठी असत आणि तेथे कोणी मदतनीस घेण्याची सोय नसे. कारण बहुतेकांना पत्रातले मोडी प्रयोग, शब्दांची रूपे वगैरे काही समजत नसे. जुन्या मराठी पोथ्यांतील जुने शब्द, जुने शुद्धलेखन, जुनी रूपे, जुनी भाषा व जुनी अक्षरे दप्तरात नसल्यामुळे होतकरू प्रतिलेखक नवे शुद्धलेखन आणि पदरची अक्षरे घालून मूळ पोथीचे सर्व स्वारस्य घालवून टाकीत. म्हणून ' एकवार जुन्या संस्कृत पोथ्या लेखकाला उतरावयाला सांगितल्यास चालेल, परंतु जुन्या मराठी पोथ्या लेखकाकडे देणे निव्वळ पाप होय.' योग्य व तज्ज्ञ प्रतिलेखकांची उणीव फार मोठी होती.' आता सर्व लेख स्वतःच लिहू जावें तर तेही अशक्य आहे. कितीही उत्साह असला तरी मानवी बोटांनी काम करण्याची काही तरी मर्यादा आहेच आहे.' १९१६ साली भारत इतिहास संशोधक मंडळात ते म्हणाले की, ' दर वर्षीचा माझा असा अनुभव आहे की शेकडो पोथ्या व कागदपत्रे, नकला करून घेण्यापुरते मनुष्यबळ नसल्यामुळे, हस्तगत करण्याचा हव्यास निरुपायाने सोडून द्यावा लागतो. ह्या सोडून दिलेल्या पोथ्यात व पत्रात शेकडो पुर्जे असे सांगतात की, त्यांच्या संग्रहाविना इतिहास रचनेस मोठमोठे खंड पडतात. गेल्या वीस-पंचवीस वर्षांच्या अनुभवावरून असे निश्चित विधान करता येते की, मला एकट्यालाच कमीत कमी सतत वर्षानुवर्षे लिहिणारे चार लेखक हवे.'

राजवाड्यांच्या चिकित्सक व एक प्रकारे ' Diffcult to please and too nice of taste ' अशा वृत्तीमुळे त्यांना मदत करायची म्हटले तरी ते कठीण होते. राजवाड्यांना न. चिं. केळकर यांनी, प्रतिलेखक ठेवण्यासाठी म्हणून दरमहा पंधरा रुपये काही काळ देण्याचा क्रम ठेवला होता. काही दिवसांनी राजवाडे यांनी त्यांना लिहिले की, ' आपण गेल्या जानेवारीपासून ऐतिहासिक पत्रे लिहून काढणाऱ्या कारकुनाचा पगार म्हणून दरमहिना पंधरा रुपये पाठविता

त्याबद्दल अमुक काम झालेच पाहिजे अशाबद्दल मी आपल्याला जबाबदार आहे किंवा काय ? ते कळवावे. आज माझ्या वयाला चाळीस वर्षे झाली मी कोणाला जबाबदार नाही व पुढे होऊ इच्छीत नाही. तेव्हा आपल्याला एवढीच विनंती की, पंधरा रुपयांचे काय केले असा जबाब वर्षाअंती आपण मला विचारणार असल्यास मला आपले पंधरा रुपये नकोत. असा जबाब विचारण्याचा संकल्प नसल्यास पंधरा रुपयांचे काम काय झाले ते ऐतिहासिक पत्रांच्या प्रकाशनावरून कळून येईल.

'मी वारंवार दोन-दोन चार-चार महिने फिरतीवर असतो. त्यामुळे लेखक बंद ठेवावा लागतो. कारण लेखकाला मोडी ,शुद्ध व खरे वाचता येत नाही. स्वतः लेखकाकडून पत्रे वाचून घेऊन किंवा स्वतः वाचून लेखकाकडून लिहून घ्यावी लागतात. तेव्हा माझी स्वतःची हजेरी लेखकापाशी असावी लागते. सबब लिहावयाचे काम वेळोवेळी तहकूब राहील असा अनुभव येत आहे. तेव्हा आपली मर्जी असल्यास पंधरा रुपये चालू ठेवावे, नसल्यास बंद करावे. म्हणजे तुमच्या आमच्या मधला गोडपणा कायम राहील. पत्रोत्तर जलद व निश्चित यावे. भीड बिलकूल धरू नये. माझ्या स्वतः खेरीज इतर कोणाला मी जबाबदार होऊ इच्छित नाही. काम करावयाचे हा निश्चय आहे. ते काम स्वतःच्या सोयीने उत्तम होते असा अनुभव आहे दुसऱ्याची सोय बघून भागत नाही म्हणून लिहिले आहे. आपण मदत करण्यास तयार झाला हे आपणास योग्य आहे. परंतु ती मदत माझ्या सोईला जुळेल अशी असल्यास घेता येईल हे वरील माहितीवरून ध्यानात येईल.' केळकरांच्या म्हणण्याप्रमाणे हे पंधरा रुपये 'महाराष्ट्र इतिहासा'कडे पाठविण्याचे ठरले. राजवाड्यांकडे केळकरांनी पाठविलेल्या रकमेपैकी पंधरावीस रुपये शिल्लक होते, तेही त्या मासिकाकडे त्यांनी पाठविले व केळकरांना पुन्हा लिहिले की, 'यापुढे मला मदत करण्याच्या भानगडीत आपण बिलकूल पडू नये. मी अव्यवस्थित एककल्ली माणूस आहे, व इतर माणसे निभावून घेण्याचे माझ्या हातून होत नाही. ऐतिहासिक पत्रे १५ नाही १५०० रुपये पगार देऊन

ही शुद्ध लिहिणारा मनुष्य मिळणे अशक्य आहे अशी माझी खात्री झाली आहे. आपली कळकळ निःसंशय मनापासूनची आहे परंतु त्या कळकळीचा उपयोग करून घेण्याचे माझ्यात नाही हे मला मान्य आहे.'

अशा प्रकारे पत्रांच्या व लेखांच्या बालबोधीत नकला होऊन मुद्रण प्रत तयार झाली तर या सर्वांपेक्षा मोठी अडचण पुढे उभी राहिली म्हणजे त्यांच्या प्रकाशनाची 'सर्वारम्भास्तण्डुला प्रस्थमूला' या न्यायाने तो सगळा पैशाचा मामला होता आणि त्याबाबतीत तर राजवाडे निष्कांचन होते. त्यांनी इनामदार, मुत्सद्दी, संस्थानिक यांचे ऐतिहासिक कागद प्रसिद्ध केले पण मिरजेचे बाळासाहेब पटवर्धन आणि बडोद्याचे सयाजीराव गायकवाड सोडले तर बाकी कोणी त्यांना मदत केली नाही. बाळासाहेब मिरजकर यांनी पहिल्या खंडाच्या छापणावळीस चारशे रुपयांची देणगी दिली व सयाजीरावांनी त्यांच्या ग्रथाच्या प्रत्येकी दहा प्रती विकत घेण्याचा हुकूम केला. पण खर्चांच्या मानाने हे दातृत्व म्हणजे 'शाकाय वास्याल्लदणास स्यात' असल्याच कोटीतले होते. केवळ राजवाडे यांच्याबद्दलच नव्हे तर त्या वेळच्या सर्व इतिहास संशोधकांबद्दल संस्थानिक, जहागिरदार वगैरेंची ही वृत्ती होती. या उपेक्षेचे दुःख राजवाड्यांना फार होई. अकराव्या खंडाच्या प्रस्तावनेत त्यांनी उद्गार काढले की, साधने प्रकाशण्या-संबंधाने एक चमत्कार आज कित्येक वर्षे मी निमूटपणे पाहात आहे. तो असा की, शिंदे, होळकर, गायकवाड, आंग्रे, पटवर्धन, विंचूरकर, पवार, राजेबहादुर, कोल्हापूरकर, तंजावरकर, फडणीस, प्रतिनिधी, फलटणकर, भोरकर, जतकर, हैद्राबादकर, जयपूरकर, जोधपूरकर सागरकर व इतर लहान मोठे संस्थानिक, जहागिरदार, इनामदार, देवस्थानवाले व मुत्सद्दी हे अद्यापपर्यंत काय करीत आहोत ? त्यांची दप्तरे किंवा त्यांच्यासंबंधींची कागदपत्रे आमच्यासारख्या भिकारड्यांनी शोधण्याचा व छापण्याचा प्रयत्न करावा आणि त्यांच्यासारख्या श्रीमंतांनी अगदीच उदासीन व निद्रिस्त असावे हा कोठला न्याय ? काय त्यांचे पूर्वज त्यांचे कोणीच नव्हते ? पूर्वजांनी संपादिलेल्या

जहागिरी व राज्ये भोगण्यास राजी आणि त्यांचे पराक्रम व इतिहास जाणण्यास गैरराजी, हा न्याय पृथ्वीवर इतर कोठेही पाहावयास मिळावयाचा नाही. वासुदेवशास्त्री खऱ्यांनी आपले घरदार विकून पटवर्धन दप्तर छापावे, आणि मिरजकर, सांगलीकर, जमखिंडीकर यांनी खुशाल झोपा काढाव्या? शिवाजीमहाराज, दमाजी गायकवाड, परशुरामभाऊ पटवर्धन हे आम्हा संशोधकांचे आजेपणजे आहेत आणि संस्थानिकांचे कोणी नाहीत असेच म्हणण्याची पाळी आली! संस्थानिकाची आणि इनामदारांची आपल्या प्रत्यक्ष पूर्वजांसंबंधाने केवढी ही विस्मृती! केवढा हा अपराध? ही भरतभूमी पितृपूजे-विषयी प्रख्यात आहे, तीत प्रस्तुत काळी पितरांची वोळवण व्हावी ना?'

पण राजवाड्यांच्या या कळकळीच्या आवाहनाचा परिणाम काही झाला नाही. त्यांचे इतिहाससाधनांचे खंड, त्यांच्या इतक्या दरिद्री नसले तरी श्रीमंत नसलेल्या मध्यमस्थितीतल्या त्यांच्या स्नेह्यांच्या मार्फत त्यांना प्रसिद्ध करावे लागले. विजापूरकर यांनी त्यांच्या 'ग्रंथमाला' मासिकातून स्वतःच्या खर्चाने खंड २, ३, ५, ६, ८, हे प्रसिद्ध केले. वासुकाका जोशी यांनी खंड ५ व 'राधा माधव विलास चंपू' व 'महिकावतीची बखर' प्रसिद्ध केली. ७ वा खंड 'महाराष्ट्र इतिहास' मासिकाच्या विद्यमाने प्रसिद्ध झाला. ९ वा खंड चांदोर-करांच्या 'प्रभात' मासिकात प्रसिद्ध झाला. १० वा खंड महाराष्ट्र साहित्य परिषदेने प्रसिद्ध केला. बारावा खंड भाइसं मंडळाने प्रसिद्ध केला. १३ व १४ अच्युतराव भटांनी केले. १६, १७, १८, १९ हे पारसनिसांच्या 'इतिहाससंग्रहात प्रसिद्ध झाले. २१ वा खंड 'इतिहास व ऐतिहासिक' मासिकात प्रसिद्ध झाला.

एवढे कष्ट करून अखेर त्यांची प्रकाशनाच्या बाबतीत अशी पर-वड व्हावी व असा परावलंबीपणा यावा, याचे राजवाडे यांना नेहमी वाईट वाटे. ते म्हणत, 'मी द्रव्य मिळविण्यास्तव काही धंदा केला नाही ही मोठी घोडचूक केली. व्हॉल्टेअरने ज्याप्रमाणे पुष्कळ द्रव्य मिळवून स्वतःचे लेख व ग्रंथ छापण्यास्तव स्वतःचा छापखाना व

स्वतःचे नोकर ठेवले होते, त्याप्रमाणे योजना मला करावयास पाहिजे होती. परंतु ही योजना मी न केल्यामुळे मला दुसऱ्याच्या तोंडाकडे पाहण्याचा प्रसंग येतो.' इतके करूनही ते पुस्तकांच्या प्रती शंभर दीडशेच काढीत व ते छापून झाले की तो विषय तेथेच संपवीत.कारण ते म्हणत की, या संबंधाने मी कोणाशी काय बोलू ? व कोण याचे समजून उत्तर देणार आहे ?'

अशा सर्वतोपरी प्रतिकूल व मनाला खिन्न करणाऱ्या परिस्थितीत केवळ अंगच्या उभारीच्या जोरावर एकटचा राजवाडे यांनी कामाचे पर्वत उठवले, हे पाहिले म्हणजे दुर्लंघ्य अडचणींवर केवळ हिमतीच्या जोरावर मात करणाऱ्या रामचंद्राचे वर्णन करणाऱ्या प्रसिद्ध श्लोकांचे स्मरण झाल्याशिवाय राहत नाही. विजेतव्या लंका चरणतरणीयो जलनिधिः विपक्षः पौलस्त्यः रणभुवि सहायाश्च कृपयाःतथाप्येकोरामः सकलसवधीत राक्षसकुलं: क्रियासिद्धी. सत्त्वे भवति महतां नोपकरणे.'

मराठ्यांच्या इतिहासाची साधने जमविण्याचे एवढे एकच काम कोणाही कर्तबगार कामकऱ्याच्या कर्तबगारीचा अंत पाहणारे आहे. तेवढेच काम करून राजवाडे थांबले असते तरी त्यांचे नाव मराठी वाङमयात कायम झाले असते. पण राजवाडे यांनी त्याहून मोठे आणि मूलगामी कार्य केले. ते म्हणजे मराठ्यांच्या इतिहासाचे तत्त्वज्ञान त्यांनी सिद्ध केले. त्यांच्या पूर्वी हे मराठ्यांच्या इतिहासाचे तात्त्विक किंवा आत्मिक स्वरूप महाराष्ट्रात फक्त न्यायमूर्ती रानडे यांनी त्यांच्या 'राइज ऑफ द मराठा पॉवर' या ग्रंथात व्यक्त केले होते. पण रानडे यांचेवेळी अस्सल ऐतिहासिक साधने फार तुटपुंजी होती आणि त्यांची बुद्धिमत्ता विशाल आणि व्यापक असली तरी त्यांच्यामागे इतर व्यापही पुष्कळ होते. राजवाडे यांनी या एकाच कामाला वाहून घेतले होते आणि त्यांच्या प्रयत्नाने अस्सल साधनांची उपलब्धीही मोठ्या प्रमाणात झाली होती, आणि सुदैवाने संग्रहशीलतेप्रमाणे त्यांच्या बुद्धीची ग्रहणक्षमताही अलौकिक होती. सातवळेकर म्हणतात– 'त्याची आकलनशक्ती इतकी विलक्षण असे की, ते काग-

यांच्या ढिगामधून हवा तो कागद काही मिनिटात शोधून काढीत व त्यात अमूक वाक्य अमूक महत्त्वाचे आहे असे तत्काळ दाखवीत. साधनांचे वैपुल्य आणि आकलनशक्तीची तीव्रता यामुळे ते सकृद्दर्शनी अस्ताव्यस्त वाटलेल्या ऐतिहासिक लेखातून व पत्रातून तत्त्वज्ञानाचे अखंड सूत्र निर्माण करू शकले. त्यांचे हे तत्त्वज्ञान स्वतंत्र ग्रंथरूपाने लिहिलेले नाही. त्यांच्या ऐतिहासिक खंडांपैकी खंड १, ३, ४, ६, ८ यांना व 'राधामाधवविलास चंपू' आणि 'महिकावतीची बखर' या ग्रंथांना ज्या प्रस्तावना आहेत, त्यात त्यांनी हे तत्त्वज्ञान विशद केले आहे. त्यांच्या प्रस्तावना प्रदीर्घ होत्या आणि ग्रंथातल्या लेखांचा व प्रस्तावनांचा तसा अर्थाअर्थी काही संबंध नसे असा त्यांच्या वर वर आक्षेप येई. त्या संदर्भात एकदा राजवाडे भट यांना म्हणाले, 'माझेवर घेण्यात आलेला हा आक्षेप खरा आहे. निरनिराळ्या विषयांवर कधी माझे सतत चिंतन व मनन चाललेले असते. या मननांचे अंती निरनिराळ्या विषयांसंबंधी मी लेख लिहितो. ते स्वतंत्रपणे छापण्याकरिता लागणारे द्रव्य माझेपाशी नाही. या कारणास्तव साधनांचा एखादा खंड छापताना हे लेख प्रस्तावना म्हणून मी छापतो.

ज्या प्रस्तावनेने इतिहासतत्त्व विवेचक म्हणून राजवाडे यांचे नाव सर्वतोमुखी झाले, ती म्हणजे पहिल्या खंडाला लिहिलेली एकशे सत्तावीस पृष्ठांची, पानिपतच्या मोहिमेची सर्वांगीण मीमांसा करणारी प्रस्तावना होय. पानिपतचा प्रसंग हा मराठ्यांच्या इतिहासातला एक प्रसंग जरी असला, तरी ज्यामुळे तो निर्माण झाला, ते कारण म्हणजे मराठ्यांच्या इतिहासाची मूलभूत प्रेरणा होते. ग्रॅन्ट डफ सारख्या परकीय इतिहासकारांनी भौतिक पद्धतीने मराठ्यांचा इतिहास लिहिल्यामुळे मराठ्यांच्या इतिहासाच्या या प्रेरणेकडे, या आत्म्याकडे त्यांचे सर्वस्वी दुर्लक्ष झालेले आहे व १६४६ पासून १७९६ पर्यंत हिंदुस्थानभर चाललेल्या मराठ्याच्या मोहिमेत कोणतेही सूत्र किंवा धोरण न दिसल्यामुळे मराठ्यांना दरोडेखोर किंवा लुटारू यांच्या पलीकडे त्यांच्या दृष्टीने किंमत नाही. हा अपसमज निर्मूल करून राजवाडे यांनी असे सप्रमाण सिद्ध केले आहे की मराठ्याच्या मोहि-

मांना काही एक समान सूत्र होते.

ते प्राणभूत सूत्र म्हणजे 'महाराष्ट्र धर्म' हे होय. हा महाराष्ट्र धर्म म्हणजे केवळ हिंदु धर्म नव्हे. मराठ्याच्या विशिष्ट स्वभावाने व पराक्रमामुळे सतराव्या शतकात सर्वत्र असलेल्या सहिष्णु हिंदु धर्माचे रूप पालटून त्याची जागा यवनाविषयी आत्यंतिक द्वेष व स्वधर्माच्या स्थापनेची ईर्ष्या भावनांनी घेतली. त्यासाठी स्वराज्याची स्थापना,त्याच्यासाठी लोकांची एकजूट व त्याचे पुढारपण या गोष्टींची आवश्यकता निर्माण झाली. रामदासाने महाराष्ट्र धर्माचा मराठा तितुका मेळवावा। महाराष्ट्र धर्म वाढवावा, अशा शब्दात उच्चार केला आणि या भूमंडळाचे ठायी। धर्मरक्षी ऐसा नाही। महाराष्ट्र धर्म उरला काही। तुम्हा करिता।।' अशा शब्दात ज्याचा गौरव केला त्या शिवाजीने त्याचा आचार केला व महाराष्ट्रात 'हिंदवी स्वराज्या'ची सिद्धी केली. म्हणून राजवाडे यांच्या मताप्रमाणे 'महाराष्ट्रातील हिंदुधर्म अधिक धर्मस्थापना अधिक गो ब्राह्मण प्रतिपाल अधिक स्वराज्य स्थापना अधिक एकीकरण अधिक धुरी धरण म्हणजे महाराष्ट्रातील हिंदुधर्म होतो अशी त्या काळी समजूत होती. ह्याच समजुतीला महाराष्ट्र धर्म म्हणून समर्थांनी संज्ञा दिली आणि ह्या धर्माची स्थापना आणि प्रसार करण्याकरिता शिवाजी महाराज व त्यांचे अनुयायी यांनी प्राणाचा व वित्ताचा अपरंपार व्यय केला... १६४६ पासून १७९३ पर्यंत या कल्पनेला मराठे साक्षात स्वरूप देत होते व १५० वर्षे ह्या कल्पनेच्या धोरणाने मराठे चालले होते. महाराष्ट्र धर्माची ही कल्पना मराठ्याच्या ह्या १५० वर्षांतील हालचालींचा केवळ प्राण आहे.' ह्या महाराष्ट्र धर्माचा हिंदुस्थानांत प्रसार करणे हेच मराठ्यांचे हिंदुस्थानात कार्य होय. हे कार्य करीत असता अहमदशहा अबदालीशी मराठ्याचा संघर्ष झाला व त्यातून पानिपतचा प्रसंग उद्भवला. पानिपतच्या अपयशाचे कारण अब्दालीच्या वरचढपणापेक्षाही मल्हारराव होळकर आणि गोविंदपंत बुंदेले यांची स्वार्थी कुचराई हे होय. शत्रूच्या युक्तीपेक्षा मराठे गोविंदपंताच्या व मल्हार रावांच्या कुचराईमुळे ही मोहीम हरले

हा सिद्धांत सर्वांस्वी मान्य व्हावा असा दिसतो पण हे कितीही महत्त्वाचे कारण असले तरी ते तात्कालिक होते. ते कारण म्हणजे सरदारांच्या ठिकाणी चारित्र्याचा अभाव होता, त्यामुळे स्वजन विरोधाचे व सरदारांच्या उच्छृंखलपणाचे बंड पेशव्यांना आवरता आले नाही. शिवाजीच्या वेळी, रामदासासारख्या विभूतीच्या सेवाधर्म, दासबोध इत्यादि ग्रंथांचा 'कुचर सेवकांस ताळ्यावर आणण्यास व सुचर सेवकांची भक्ति दृढ करण्यास अत्यंत उपयोग झाला. महाराष्ट्रात स्वराज्य स्थापण्याच्या कामी मराठ्यांच्या शौर्याचे व मराठ्यांच्या एकजुटीचे जितके सहाय्य झाले तितकेच, किंबहुना त्याहूनही जास्त, समर्थांच्या उपदेशाचे झाले.' असा उपदेश करणारा रामदास पेशव्यांच्या काळी कोणीच नव्हता. पानिपतच्या पराभवाचे कारण म्हणजे जिंकलेल्या प्रदेशातील लोकांची मने मराठ्यां-च्याकडे वळवून घेण्यास पेशव्यांनी काहीच व्यवस्था केली नव्हती.

'तरवारीच्या जोरावर व मुत्सद्यांच्या युक्तीवर भिस्त ठेवून पेशव्यांना आपली सत्ता हिंदुस्थानात चालवावी लागे. मुसलमानां-प्रमाणे पेशवेही परकीय आहेत असा दुष्ट भाव जिंकलेल्या प्रदेशात राही. त्यामुळे पेशव्यांची सत्ता सदैव अस्थिर होती. ह्याचेही कारण पेशव्यांचे वैचारिक व सांस्कृतिक जीवनाकडे दुर्लक्ष हेच होते. येणे-प्रमाणे मराठ्यांच्या राजकारणाला सरदारांची व प्रजेची मने उप-योगी पडण्यास योग्य जेणे करून होतील अशी ग्रंथ, व्याख्याने वगैरे साधनसंपत्ती पेशव्यांनी तयार न केल्यामुळे हिंदुस्थानातील मराठे सरदार व तद्देशीय संस्थानिक व सामान्यजन पानिपतच्या मोहिमेच्या अगोदर व नंतर मराठ्यांच्या विरुद्ध उठले, यात तिळमात्र संशय नाही. 'राज्यें मिळविण्यास जसा तोफांचा व शिपायांचा उपयोग होतो, तसा ती कायम राखण्यास व्याख्यानांचा व विचारी पुरुषांचा-ही होतो.' हे तत्त्व पेशव्यांच्या ध्यानात का आले नाही याचे कारण इतकेच की, 'अठराव्या शतकाच्या पूर्वार्धांत व उत्तरार्धात मरा-ठ्यांची संस्कृती युरोपातील प्रगत राष्ट्रांच्या संस्कृतीहून कमी दर्जाची.

मराठ्यांच्या संस्कृतीच्या स्वरूपाची ही चिकित्सा म्हणजे राजवाडे यांच्या इतिहासमीमांसेचे मध्यवर्ती सूत्र आहे. राष्ट्राचे भवितव्य एखादी व्यक्ती किंवा प्रसंग यांच्यापेक्षा राष्ट्राच्या संस्कृतीच्या दर्जाप्रमाणे ठरत असते. मराठ्यांच्या काळात भौतिक शास्त्रांचा उदय व उत्कर्ष झाला नाही याचे कारण त्यांची संस्कृती त्या पायरीपर्यंत पोचली नव्हती. संस्कृतीची ही कल्पना ऑगस्टस कॉम्प्ट आणि हेगेल या पाश्चात्य तत्त्ववेत्त्यांपासून राजवाडे यांनी घेतलेली आहे व ती महाराष्ट्राच्या संस्कृतीला लावून दाखवलेली आहे. कॉम्प्टने म्हटल्याप्रमाणे माणसांच्या विचारांच्या किंवा संस्कृतीच्या तीन अवस्था असतात, धार्मिक, तात्त्विक आणि शास्त्रीय. ज्ञानेश्वरापासून तुकारामापर्यंत तात्त्विक विचारांचा पगडा महाराष्ट्रांवर बेसुमार बसला होता. त्याचे परिणाम वर्णन करताना राजवाडे यांनी वारकरी पंथावर अत्यंत कठोर टीका केली आहे-जसे ज्याचे तत्त्वज्ञान तसा त्याचा प्रपंच हा सिद्धांत आहे. विवक्षित काळी कोणताही समाज आहे, त्यात कोणते तत्त्वज्ञान नांदत आहे, एवढे कळले म्हणजे त्यांचे चरित्र कोणत्या प्रकारचे आहे व कोणत्या स्वरूपाचे होईल ह्यांचे स्थूल अनुमान बांधता येते. 'यो यच्छ्रद्धः स एव सः !' ...सर्व चराचर सृष्टीशी सम बुद्धि ठेवून चालणारी भारत वर्षातील ऐतिहासिक निर्णायक पद्धतीची एक शाखा आहे. जन्म हे एक दुःख कल्पून व प्रपंचाचा म्हणजे समाजाचा स्पर्श अपरिहार्य मानून, देशाचा त्याग करून ब्रह्मांत विलीन होण्यांत पुरुषार्थ आहे, अशी या शाखेची समजूत आहे. ह्या मताचा कट्टा पुरस्कर्ता महाराष्ट्रात ज्ञानेश्वर झाला. अशांचे तत्त्वज्ञान जसे प्रपंचाला तसेच परमार्थालाही परम बाधक होय. ह्यांना प्रपंचही नाही व परमार्थही नाही. कारण आपण परमार्थाला जाऊन पोचलो व प्रपंचाला सोडून दिले अशी यांची भावना असते. ह्या शाखेच्या तत्त्वज्ञानाचा परिणाम महाराष्ट्रात दोन-चार वेळा झालेला आहे व जेव्हा जेव्हा झाला आहे तेव्हा तेव्हा राष्ट्रत्वाचा लोप होऊन गेलेला आहे. समाज किंवा राष्ट्राचा तिरस्कार करण्यास शिकविणे म्हणजे समाजाला किंवा राष्ट्राला नाशाच्या पंथालाच लावणे आहे.

ही ग्यान–तुकारामांची जोडी महाराष्ट्रातील समाजाच्या व राष्ट्राच्या प्रपंचाला बहुत घातक झालेली आहे. अखिल चराचर सृष्टीची समबुद्धि ठेवणारे महाराष्ट्रातील विश्वबंधुत्व महाराष्ट्राच्या नुसत्या राष्ट्रनाशासच तेवढी कारण झाले नाही तर ह्या राक्षसीच्या उपदेशाने तिची संपत्ती, संतति वगैरे सर्व संस्कृतीचा लोप झाला आणि मोक्षाची व परमार्थाची प्राप्ति एकीकडेच राहून, स्वतःच्या घरात गुलामाप्रमाणे राबून परक्यांच्या ओंजळीने पाणी पिण्याचा दुर्धट व लाजिरवाणा प्रसंग मात्र आला–' ह्या आपत्तीतून मराठ्यांचा प्रपंच सावरला व त्यांना स्वराज्य मिळाले ते भारतीय तत्त्वज्ञानाच्या दुसऱ्या शाखेमुळे होय. या शाखेचे तत्त्वज्ञान रामदासांच्या दासबोधात आणि भगवदगीतेत उत्तमोत्तम सांगितले आहे– ' अखिल कर्माचा किंवा समाजाचा त्याग करणे संन्याशाला किंवा मनुष्यमात्राला अशक्य असल्यामुळे ह्या अशक्य स्थितीचा निषेध ही शाखा कंठरवानें करते. ' नियतस्य तु संन्यासः कर्मणो नोपपद्यते। मोहात्तस्य परित्यागस्तामसः परिकीर्तितः ।। दुःखमित्येव्र यत्कर्म कार्यक्लेशाभयात्यजेत् । स कृत्वा राजसं त्यागं नैव त्यागं फलं लभेत् ।। ' वगैरे मते ह्या शाखेला मान्य आहेत. समाजात देह धारण करून प्रपंच नियत म्हणून यथास्थित केलाच पाहिजे. मोहाने त्याचा त्याग करणे तामस होय. संपत्तीपासून किंवा पोरांबाळापासून म्हणजे समाजापासून दुःख होते म्हणून तो टाकणे भयावह होय असे ही शाखा सांगते. ' ' प्रपंच साधुनी परमार्थाचा लाभ ज्याने केला तो नर भला ' असा उत्तमोत्तम सिद्धांत ह्या शाखेचा आहे. ...प्रपंच सुटावयाचा नाही व परमार्थ साधावयाचा नाही अशी दुरवस्था आर्य समाजाची अनेक वेळा झालेली आहे. तीतून सोडविण्याचा प्रयत्न भगवद्गीता व दासबोध या दोन ग्रंथांनी केला आहे. भगवद्गीतेत वेदांतापेक्षा इतिहासाचे म्हणजे प्रपंचाचे म्हणजे समाजाचे तत्त्वज्ञान दाखवण्याचा विशेष कटाक्ष आहे, हे बीज महाराष्ट्रातील लोकांच्या जितके जास्त ध्यानात येईल तितके जास्त हिताचे होईल. '

(ऐ. प्रस्तावना पृ. ३४२–३४४)

पुढे आठव्या खंडाच्या प्रस्तावनेत आणि 'महाराष्ट्रातील शिव-कालीन समाजरचना या निबंधात राजवाडे यांनी वारकरी संतां-वरील आपल्या टीकेची धार सौम्य केली आणि संतांच्या कार्याची सामाजिक फलश्रुति सांगताना, म्लेंच्छावत् झालेल्या हिंदु प्रजेला संतांनी परमकारुणिक बुद्धीने भक्तिमार्ग सुरू करून आर्य समाजात थोपवून धरले आणि मराठी भाषेत ग्रंथरचना करून मराठी भाषेचे फारशीच्या आक्रमणापासून संरक्षण केले, असे श्रेय संतांना मुक्त कंठाने दिले अशा रीतीने या भक्तिमार्गाचे द्वारी साधुसंतांनी वर्णा-श्रम धर्म लोकप्रधान अशी ही महाराष्ट्रातील दुर्दैवी प्रजा दोन अडीचशे वर्षे आर्य समाजांत मोठ्या शिताफीने थोपवून धरली, व आर्य संस्कृतीचे रक्षण केले, तेव्हा आपल्या या देशावर त्यांचे उप-कार बिनमोल झाले ह्यात काडीचाही संशय नाही. पण भक्तिमार्ग हा सशस्त्र तर नव्हेच पण अशस्त्र प्रतिकाराचाही मार्ग नसल्या-मुळे, त्याला जेव्हा शत्रू निर्दालन आणि राष्ट्रीभवन उत्तमोत्तम कर-णाऱ्या रामदासी पंथाची जोड मिळाली, तेव्हाच महाराष्ट्रात स्वराज्य स्थापना होऊ शकली.'

पण एवढ्या संकटातून स्थापन केलेले मराठ्यांचे स्वराज्य इंग्र-जांच्या आक्रमणापुढे काही टिकू शकले नाहीत. समुद्राच्या लाटांच्या तडाख्यापुढे वाळूचा किल्ला कोसळावा, तसे ते पहिल्या धडाक्याला कोसळले ही स्वातंत्र्यनाशाची राष्ट्रीय आपत्ती कोसळण्याचे कारण काय, हा तर राजवाड्यांच्या अखंड चिंतनिकेचा विषय होता. १९१८ साली मराठेशाहीचा अस्त झाल्याला शंभर वर्षे झाली. त्यावेळी न. चि. केळकर यांनी 'मराठे व इंग्रज' हा ग्रंथ लिहून मराठेशाहीचे शतसांवत्सरिक श्राद्ध केले. त्या ग्रंथात मराठ्यांच्या स्वराज्यनाशाची केळकरांनी मीमांसा केली व त्यांचे गुरू वासुदेवशास्त्री खरे यांनी त्या ग्रंथाला प्रस्तावना लिहिताना, 'देशाभिमानाचा अभाव, स्वार्थसाध-नाची बेसुमार हाव, समूहरूपाने कार्य करण्याची नालायकी, आळस' इत्यादि मराठ्यांच्या सामाजिक दुर्गुणांची अत्यंत विदारक चिकित्सा

करून त्या दोषांच्या पदरी स्वराज्यनाशाचा दोष बांधला. केळकर व खरेशास्त्री यांचे हे प्रतिपादन राजवाडे यांना फारसे पटले नाही व केळकरांच्या ग्रंथावर टीका करताना स्वराज्यनाशाचे आपल्या मते निर्णायक कारण त्यांनी दिले. 'पल्लेदार हत्यारांच्या जोरावर सद्‌गुणी, एकजूट व उद्योगी लोकांचा पराभव दुर्गुणी, रोगी, विभक्त व ऐदी लोकही करू शकतात. पल्लेदार हत्यारांपुढे सर्व सद्‌गुण फिके पडतात व नसतील ते दुर्गुण समाजात प्रादुर्भूत होतात. तात्पर्य, राष्ट्रांचे स्वातंत्र्य व राष्ट्रांचे पारतंत्र्य पल्लेदार हत्यारांवर अवलंबून असते. मराठ्यांचे स्वराज्य जाण्याचे एकच एक कारण पल्लेदार हत्यारांचा अभाव हे होय. आळस वगैरे सर्व कारणे गौण होत, किंबहुना ही कारणेच न होत. खरेशास्त्र्यांनी स्वराज्यनाशाचे एकच एक असाधारण कारण पल्लेदार हत्यारांचा अभाव म्हणून सांगितले असते म्हणजे त्यांचे लिहिणे शास्त्रशुद्ध झाले असते व त्यांचे शिष्य जे नरसोपंत केळकर त्यांची आपली केस सावरता सावरता तिरपीट उडाली नसती.'

पण ज्याप्रमाणे फळे आणि फुले ही वृक्षाच्या जीवनशक्तीचा आविष्कार असतात, त्याप्रमाणे इतर विद्या व कला यांच्याप्रमाणे शास्त्रविद्या आणि युद्धकला हाही राष्ट्राच्या संस्कृतीचा आविष्कार असतात. मराठ्यांची हत्यारे इंग्रजांच्या हत्यारापुढे हरली याचाच अर्थ हा की, मराठ्यांची संस्कृती इंग्रजाच्या संस्कृतीहून कमी दर्जाची होती. मराठ्यांची संस्कृती सात्त्विक किंवा कॉम्पटनच्या भाषेत मेटॅफिजिकल अवस्थेत होती आणि इंग्रजांची पॉझिटिव्ह किंवा शास्त्रीय अवस्थेत होती. शास्त्रीय संस्कृतीपुढे तात्त्विक संस्कृतीचा पाडाव होतो. इ. सिद्धांत आहे. पहिल्या खंडाच्या प्रस्तावनेत या दोन संस्कृतींच्या संघर्षाचा विचार राजवाडे यांनी १८९८ साली प्रथम मांडला त्याचा निर्णय सत्तावीस वर्षांनी १९२५ साली राधामाधवविलास चंपूच्या प्रस्तावनेत त्यांनी दिला– 'हत्यार हे राष्ट्राच्या एकंदर संस्कृतीचे मालक आहे. जशी ज्या राष्ट्राची संस्कृती तसे त्या राष्ट्राचे हत्यार. येथे एक आनुषंगिक प्रश्न असा निघतो की, टोपीवाल्याकडून कारी-

गार बंदुक, तोफा व दारूगोळा जो शहाजी घेई तो त्याने महाराष्ट्रात त्याबर हुकूम बनविण्याची व्यवस्था का केली नाही ? अथवा शहाजीचा मुलगा शिवाजी याने तरी का केली नाही ? अथवा बाजीराव बल्लाळ, बाळाजी बाजीराव व नाना फडणीस या गृहस्थांनी का केली नाही ? उत्तम हत्यारांकरिता दुसऱ्याचे मिंधे राहण्याची लज्जा यांना कशी वाटली नाही ? प्रश्नाला उत्तर एकच आहे व ते अगदी साधे आहे. ते हे की, उत्तम, रेखीव व नेमके हत्यार बनविण्याची कला पैदा होण्यास शास्त्रीय ज्ञानाची जी पूर्वतयारी राष्ट्रात व्हावी लागते ती त्या काळी महाराष्ट्रात नव्हती. शहाजीच्या हयातीत युरोपात डेकार्ट, बेकन इत्यादि विचारवंत सृष्टपदार्थ संशोधनकार्याचे वाली जारीने पंचभूतांचा शोध लावण्यास लोकांना प्रोत्साहित करीत होते. आणि आपल्या इकडे एकनाथ, तुकाराम, दासोपंत, निपटनिरंजन इत्यादी संत पंचभूतांना मारून हृचा साक्षात्कारात राष्ट्राला नेऊन मुक्त करण्याच्या खटपटीत हीते. अशांना स्क्रू, टाचणी, बंदूक व तोफ यांचा विचार वमनप्राय वाटल्यास त्यात नवल काय ? थोडक्यात ऑगस्ट कोम्प्ट याच्या भाषेत सांगावयाचे म्हणजे महाराष्ट्र त्याकाळी मेटॅफिजिकल अवस्थेत होते आणि पॉझिटिव्ह अवस्थेत येण्यास त्याला अद्याप पाचशे वर्षे अवकाश होता. ही हत्यारे म्हणजे युरोपियन संस्कृतीचा केवळ निष्कर्ष होता.

आत्यंतिक प्रपंचविन्मुखात आणि भौतिक विद्यांकडे दुर्लक्ष यामुळे मराठ्यांचा पराजय झाला हे मराठ्यांच्या समस्त चरित्राचे बीज आहे. हे समाजचरित्रातील रोगबीज इतिहासाच्या पर्यालोचनाने सिद्ध झाल्यावर इतिहास त्याच्या रोग परीक्षणार्थ उपाययोजना सुचवलेली अशी–'शके १२०० पासून शके १७७९ पर्यंत महाराष्ट्र समाजचरित्र पाहिले व मूलभूत शोध केला म्हणजे असे कळून येते की, ही ५७९ वर्षे महाराष्ट्रसमाज तात्त्विकस्थितीत आहे व त्याची गाठ परस्पराहरण करणाऱ्या पाश्चात्य शत्रूंशी पडली आहे. संन्यासप्रबल समाजास त्या तात्त्विक स्थितीत राष्ट्रीभवन व शत्रूनिर्दालन अशक्य होते. या दोन गोष्टी साधण्यास प्रपंचप्रश्न व समाज-

साधक अशा रामदासी तत्त्वज्ञानाचा उपयोग फार होतो, परंतु शास्त्रीय स्थितीत असलेल्या शत्रूंचे उच्चाटन करण्यास स्वतःच समाज शास्त्रीय स्थितीप्रत नेला पाहिजे.' ( म. इ. सा. खंड ६, परि. ६१ )

पण एवढेच नव्हे. मराठ्यांचे साम्राज्य चिरकालीन न होण्याचे आणखी एक महत्त्वाचे कारण म्हणजे देशातील बहुतम प्रजेचे सांस्कृतिक अल्पत्व होय. नीरा महाराष्ट्रीकोत्पन्न मराठा क्षत्रिय, मराठा कुणबी, शूद्र कुणबी व नागवंशी महार या जाती म्हणजे राजवाडे महाराष्ट्राचा गुरुत्वमध्य समजतात व त्या चार जाती म्हणतील ती पूर्वदिशा बहुतकालाने तरी झाल्याखेरीज राहत नाही असा निष्कर्ष काढतात. या जातींची वरच्या जातींनी उपेक्षा केली तर त्यांच्याबरोबर यांचाही अधःपात झाल्याशिवाय राहात नाही. ' उच्च ब्राह्मण व उच्च क्षत्रिय यांनी तत्कालीन इष्टानिष्टापत्तीप्रमाणे वर्ण व जाती निर्माण करून जातींना विशिष्ट व अनन्य सामान्य वृत्त्या लावून दिल्या. मराठा क्षत्रिय, मराठा कुणबी, शूद्र कुणबी व नागवंशी महार यांना साक्षर करण्याचा जारीने प्रयत्न न केल्यामुळे बुद्धिमान व कर्तबगार अशा उच्च ब्राह्मणांना व उच्च क्षत्रियांना त्यांच्याबरोबर अधोगतींत रखडत बसण्याची यथायोग्य शिक्षा मिळाली आहे.'

भौतिक विद्येतील मागासलेल्या आणि देशातील बहुतम प्रजेचे सांस्कृतिक वात्सल्य या मराठ्यांच्या संस्कृतीतील दोन मूलभूत उणींवा होत. त्या दूर झाल्याशिवाय स्वराज्याची उपलब्धी अशक्य होय, असा राजवाड्यांच्या इतिहासमीमांसेचा निष्कर्ष आहे.

त्यांच्या पूर्वी किंवा त्यांच्यानंतरही राजवाडे यांच्याइतका भौतिक शास्त्रांच्या उपासनेवर कटाक्ष ठेवणारे इतिहास-मीमांसक थोडेच झाले असतील. निवृत्तीमार्गी संतांच्या एकदेशी वेदांताचा तिटकारा त्यांच्या मनात कायम होता.

' संत म्हणजे अत्यंत पंगुपणाचा केवळ मूर्तिमंत पुतळाच होय. संताला खाणे नको, पिणे नको, वस्त्र नको, प्रावरण नको, काही नको. एक विठोबा मिळाला म्हणजे सर्व काही मिळाले. ऐहिक सुखदुःखे, ऐहिक उपभोग, ऐहिक व्यवहार, याच्यात मन घालणे संताचे काम

नव्हे. इहलोक हा संतांचा नव्हेच. राजा कोणी असा, सारा कोणी घेवो, संताला त्याचे काही नाही. असल्या या संतमंडळींच्या हाती विचाराची दिशा जाऊन महाराष्ट्र तीन शतके पंगू बनून राहिले.' परंतु याचा अर्थ असा नव्हे की आध्यात्मिक दृष्टी राजवाडे यांना संमत नव्हती, व पाश्चात्यांप्रमाणे ते जडवादी नास्तिक्याचा उपदेश करीत व आधी भौतिक सुखांपभोग हेच सर्व मानवी धडपडींचे ध्येय समजतात. 'रामदासा' वरील त्यांच्या प्रसिद्ध निबंधात राजकारण हेसुद्धा धर्मांशिवाय चालत नाही, राजकीय संस्था व प्रयत्न यांचीही उभारणी आध्यात्मिक ध्येयाप्रीत्यर्थच झाली पाहिजे, तसे न झाल्यास ते प्रयत्न फलप्रद होत नाहीत आणि अखिल मानव जातीची आध्यात्मिक मूलता किंवा स्वतंत्रता हेच सर्व मानवी प्रयत्नांचे ध्येय आहे असे त्यांचे ऐतिहासिक तत्वज्ञान त्यांनी सांगितले आहे. ऐतिहासिक घडामोडींकडे पाहण्याचा त्यांचा आध्यात्मिक दृष्टिकोन स्पष्ट करताना ते म्हणतात.

'सिद्ध बोलून चालून स्वतंत्र असतात. साधकही त्याच स्थितीला जाऊन पोहोचण्याच्या मार्गात असतात. मुमुक्षूंचो स्वतंत्र स्थितीला जाऊन पोचण्याची उत्कट इच्छा असते. अर्थात या तीन कोटीतील लोक मुक्तीच्या, मोक्षाच्या किंवा स्वतंत्रतेच्या स्थितीला जाऊन पोहोचलेले असतात किंवा पोहोचण्याच्या मार्गात असतात. आता राहिले वद्ध लोक. ह्यांना मुक्तीच्या मार्गाला आणण्याचा प्रयत्न सिद्धांना व साधकांना मुमुक्षूंच्या साहाय्याने करावयाचा असतो. हा प्रयत्न सफल झाला म्हणजे सर्वांना परमार्थ लाभ झाला व जन्माचे सार्थक्य झाले. अर्थात सर्वांना परमअर्थ मिळाल्यावर म्हणजे पूर्ण स्वातंत्र्य मिळाल्यावर कोणाला काहीच मिळावयाचे राहत नाही व अखिल मनुष्य जातीचा उद्धार होतो. उद्धार होताना जी धडपड होते, जी खळबळ चालते, जे प्रयत्न चालतात, त्यालाच मनुष्यजातीचा इतिहास म्हणतात. ही धडपड व हा इतिहास आज हजारो वर्षे सारखा चालत आला आहे व पुढेही परमार्थाची प्राप्ति यच्चयावत् मनुष्यांना होईपर्यंत असाच अव्याहत चालत राहील.'

१९२२ साली राजवाडे यांनी ' राधामाधव विलासचंपू ' हा ग्रंथ प्रसिद्ध केला. त्या प्रस्तावनेचे परीक्षण करताना भारताचार्य चिंतामणराव वैद्य यांनी लिहिले की, ' राजवाडे यांच्या हातून मराठ्यांचा उत्कृष्ट इतिहास लिहिला जावो.' वैद्यांची अपेक्षा रास्तच होती. आज जवळ जवळ दोन-अडीच तपे राजवाडे यांना अखंड अभ्यासाने इतिहासाची साधने ' करतलामलकवत् ' झाली होती. ती साधने जमविताना उत्तरेस काबूलपासून दक्षिणेस तंजावरपर्यंत आणि पूर्वेस कलकत्त्यापासून पश्चिमेस अहमदाबादपर्यंत शहरे व खेडी, नद्या व डोंगर, राजरस्ते आणि रानरस्ते असा मराठ्यांनी इतिहासकाळात संचार केलेला हिंदुस्थानचा हुबेहूब सारा मुलूख त्यांनी पायांखाली घातला होता व शोधक नजरेने पाहिला होता, सुट्या आणि विखुरलेल्या साधनातून, काचेच्या तुकड्यातून अखंड चित्र निर्माण करावे, त्याप्रमाणे व्यक्तींची, प्रसंगाची आणि स्थलांची चित्रे निर्माण करणारी ऐतिहासिक कल्पनाशक्ती त्यांना लाभली होती, या प्रसंगातून व काहींच्या जीवनातून समाजाचे सिद्ध होणारे ऐतिहासिक तत्त्वज्ञान आकलन करणारी प्रसरणशील प्रतिभा त्यांचेपाशी होती; आणि मराठ्यांच्या इतिहासाला अगदी योग्य अशी शुद्ध, ओजस्वी, ओघवती, आणि ' कृताभ्यंगस्नाना कनकमणिभूषाविरहिता । विराजे सिंदूरे धवल वसने भूपवनिता ।। ' या मोरोपंतांच्या उक्तीप्रमाणे कमालीच्या अनलंकृत तरीही मन मोहून टाकणारी प्रसन्न आणि निर्मळ मराठी शैली ते समर्थपणे वागवू शकत होते. ज्यांच्याबद्दल वैद्यांनी अपेक्षा व्यक्त केली होती, त्या राजवाडे यांचा मराठ्यांचा इतिहास लिहिण्याचा अधिकार हा असा होता, आणि ज्यांनी अपेक्षा व्यक्त केली, त्या चिंतामणराव वैद्यांचाही अधिकार त्याच दर्जाचा होता. महाभारताच्या अभ्यासाने त्यांनी स्वतःला ' भारताचार्य ' अशी पदवी प्राप्त करून घेतली होती. श्रीकृष्णचरित्र, ' श्रीराम चरित्र ' ' महाभारताचा उपसंहार.' Mahabharat a critiscim, the riddle of Ramayan ' हे त्यांचे ग्रंथ ज्याप्रमाणे त्यांच्या संस्कृत पांडित्याची

साक्ष देत होते, त्याप्रमाणे 'मध्ययुगीन भारता'च्या इतिहासाचे त्यांचे तीन खंड भारतीय इतिहासावर त्यांचा अधिकार सिद्ध करीत होते, तर 'दुर्दैवी रंगू' ही त्याची पानिपतच्या पार्श्वभूमीवरची ऐतिहासिक कादंबरी त्यांच्या प्रतिभेच्या लालित्याचा आविष्कार व्यक्त करीत होती. त्यांना कायदा येता होता, त्यांना ज्योतिष येत होते, त्यांना गणित येत होते, त्यांना संगीत येत होते. त्यांना व्याकरण येत होते, भाषाशास्त्र येत होते, राजवाडे यांच्या रामेश्वरीतील मराठीच्या व्याकरणावर समालोचनात्मक पाच लेख वैद्यांनी लिहिले, त्यांना स्वयंपाकसुद्धा नामांकित येत होता. एकदा ते म्हणाले, 'मी पाकपडितही आहे!' त्यांना काय येत नव्हते हेच सांगणे कठीण. एकदा स. प. कॉलेजात संस्कृत मंडळाच्या अध्यक्षपदावरून बोलताना ते म्हणाले, 'मला भारताचार्य म्हणतात, मला संस्कृत पंडित म्हणून समजतात. पण अहो, मी मुंबई विद्यापीठाच्या गणिताचा एम्. ए. आणि चॅन्सेलर्स मेडॅलिस्ट आहे!' अशा अष्टपैलू विद्वानाने ज्या विषयाच्या निदिध्यासात राजवाडे यांनी जन्म घालवला. त्याचा इतिहास त्यांच्या हातून लिहिला जावा अशी अपेक्षा व्यक्त केली तर ते योग्यच म्हणावे लागेल.

स्वत: राजवाडे यांनाही मराठ्यांचा इतिहास लिहावा असे वाटत असे. भारत इतिहास संशोधक मंडळाच्या पहिल्या संमेलनाचे वेळी तात्यासाहेब मेहेंदळे यांनी मराठ्यांचा इतिहास राजवाडे यांनी लिहावा, मी तो छापण्याची जबाबदारी घेतो, असे सुचविले त्यावेळी राजवाडे म्हणाले, 'पेशवाईचा इतिहास लिहिण्याजोगी सामग्री आता खरोखरीच झाली आहे. तरी मजपेक्षा दुसऱ्या कोणीतरी हे काम करावे. विद्यापीठातून शिकविणाऱ्या विद्वान लोकांनी आता आळस झाडून सर्व इतर अडचणींना न जुमानता हे काम अवश्य करावे असले प्रयत्न १०–१२ निरनिराळे झाले तरी दृष्टिभेदामुळे इष्टच आहेत. या बाबतीत सक्ती न करिता खुषीवरच सोपविणे बरे. असे जरी ते म्हणाले, तरी मराठ्याचा इतिहास लिहिण्याचा त्यांचा संकल्प होताच. त्यांच्या एका टिपणात (जुलै १९१४) ते म्हणतात, 'महा-

राष्ट्र इतिहास लिहिण्यास बागेत सोय जमते की काय पहाणे. समाज-रचना शास्त्र बागेत जमते की काय ते पहाणे. धुळ्यापासून तीन मैला-वर भुसावळचे दास्ताने यांच्या मालकीचा एक मळा होता त्या मळ्याला अण्णा नाईक यांची बाग म्हणत, या बागेत राहून महा-राष्ट्राचा इतिहास व समाजशास्त्राचा इतिहास हे दोन ग्रंथ रचण्याचा राजवाडे यांचा विचार होता. १९१० सालच्या टिपणात त्यांनी ज्या विषयांवर ग्रंथ लिहावयाचे आहेत त्यांचा उल्लेख केलेला आहे, इति-हास द थिंग टु बी कंप्लीटेड २. सारस्वतेइतिहास संख्या जाने. १९१० ३. राजनीति ४. धर्मशास्त्र. दुसऱ्या एका टिपणात हीच गोष्ट आहे, ‘ मराठ्यांचा इतिहास १) संक्षिप्त गोषवारा २) साद्यंत तप-शील, प्रत्यक्षात ‘ मराठ्याचा अतिसंक्षिप्त इतिहास ’ या ग्रंथाचे फक्त चार अध्याय लिहून झाले आणि ‘ महाराष्ट्र सारस्वताचा इतिहास ’ या ग्रंथाची फक्त दोन पाने लिहिली गेली. तळेगावी असता ‘ मरा-ठ्यांच्या इतिहासाची त्यांनी तीन-चारशे पाने लिहिली होती, पण ती पाने त्यांनी फाडून टाकली. संकल्प होता, साधने होती, सामर्थ्य होते, पण सिद्धी काही सिद्ध झाली नाही. मराठ्यांचा इतिहास, संक्षिप्त साद्यंत, राजवाडे यांचे हातून निर्माण होण्याचा योग नियतीला मंजूर नव्हता.

नियती हेच खरे. Character is Destiny असे म्हणतात. या बाबतीत राजवाडे यांचा स्वभाव हीच त्याची नियति होती. राज-वाड्यांच्या स्वभावांत इतिहासरचनेला अनुकूल जशा गोष्टी होत्या तितक्याच प्रतिकूल गोष्टीही होत्या. राजवाड्यांना अभिप्रेत असलेला इतिहास लिहिण्यासाठी मुंबई किंवा कलकत्ता अशासारख्या ग्रंथांची उपलब्धी सहज शक्य असलेल्या महानगरात प्रदीर्घ काळ वास्तव कर-ण्याची गरज होती. मुंबईला रॉयल एशियाटिक सोसायटीची लाय-ब्ररी होती आणि कलकत्त्याला इम्पीरियल लायब्ररी होती. पण या मोठ्या शहराचा बकालपणा आणि एकाग्रतेचा भंग करणारा कोला-हल राजवाडे यांच्या स्वभावाशी मुळीच जुळणारा नसे. त्यांना वाच-ण्याला आणि लिहिण्याला जागा फार शांत लागे. मुंबईला ते कधी

आले तर कोणास भेटण्यासाठी किंवा संदर्भ ग्रंथ पाहण्यासाठी आणि कलकत्याला १९०५ साली दोन महिने ते राहिले होते ते केवळ इतिहास संशोधनाच्या कामासाठी. पण अशा शहरी कायम वास्तव्य करणे म्हणजे मोकळ्या जंगलात मुक्त संचार करणाऱ्या वनराजाला सापळ्यात कोंडावे तसे त्यांना प्राणसंकट वाटे, पुन्हा कोणत्याही ठिकाणी महिन्या दोन महिन्यापेक्षा राहाणे त्याच्या जिवावर येई. त्यांना कंटाळा येई व लगेच ते दूरच्या प्रवासास निघत. त्यांच्या पायाला चक्र बांधले होते व प्रवासाची आवड त्यांच्या कुंडलीतच लिहिली होती. 'नित्य नूतन हिंडावे' उदंड देशाटन करावे अशी ज्यांची वृत्ती त्यांच्या हातून वर्षानुवर्षे एके ठिकाणी ठाण मांडून बसावे व ग्रंथ लिहिला जावा ही स्वभावतःच अशक्य गोष्ट होती. पण इतिहास लिहायचा तर हे जरूर होते. गिबनने Decline and ffall of Roman Empire लिहिला तेव्हा दहा वर्षात लॅसेन सोडून तो पाच मैल काही बाहेर गेला नाही. सरदेसायांनी रियासतीचे बारा खंड लिहिले, त्यानी जवळ जवळ पन्नास वर्षे प्रथम बडोद्याला आणि नंतर कामशेतला एक प्रकारे क्षेत्रसंन्यासच घेतला अशा प्रकारचा क्षेत्रसंयम राजवाड्यांना अनुकूल नव्हता. पण त्याहीपेक्षा प्रतिकूल गोष्ट म्हणजे त्यांच्या एकाकी, अनिकेत, निष्कांचन जीवनक्रमामुळे अन्न, घर, पैसा याबाबतीत जन्मभर ते मोठ्या अडचणीत राहिले, ग्रंथ लेखनाला जरूर असलेले किमान प्राथमिक स्वास्थ्य काही त्यांना मिळू शकले नाही. एका टिपणात ते म्हणतात, 'मला काय पाहिजे? निवांत घर १) द्रव्य २), अन्न ३) म्हणजे समाजशास्त्र व इतिहास हे ग्रंथ लिहिता येतील. या देशात अशा सोयीच नाहीत. या टिपणात राजवाडे यांनी त्यांच्या पुढील अडचणीवर नेमके बोट ठेवले आहे. 'पराधीन देश आणि त्यातही बहुसंख्य प्रजा विद्येबद्दल उदासीन ही प्रतिकूल परिस्थिती, कमलाला हिमवर्षाव त्याप्रमाणे त्यांच्या ग्रंथकर्तृत्वाला अत्यंत मारक झाली.' राजवाड्याचे हे विधान अतिरंजित समजण्याचे कारण नाही. सारस्वताची झाडे श्रोत्याच्याच हातून लावली जातात व त्यांच्याच अवधानामृतानी वाढ होतात असा ज्ञानेश्वरांचा

पुरावा आहे. माणूस ज्या देशात व ज्या परिस्थितीत जन्माला येतो, त्याने ग्रंथकार म्हणून त्याचे दैव घडत असते किंवा मोडत असते. गिबनच्या इतिहासाची सारे स्तुती करतात व ती योग्यच आहे, पण त्याला कारणीभूत असणाऱ्या सुविद्य आणि स्वतंत्र देशात जन्माला येण्याच्या त्याच्या सुकृत योगाचे महत्त्व फारसे कोणी जाणले नाही ते त्याने स्वत: मात्र जाणले आहे व तो प्रांजलपणे म्हणतो की, लाखात एखाद्याच्या वाट्याला असे सुदैव येते. ' The double fortune of my birth in a free and enlightened country in an honourable and wealthy family, is the lucky chance of an unit against millions. '

मराठ्यांच्या इतिहासाची साधने असावी तितकी पुरेशी उपलब्ध झालेली नाहीत असे राजवाडे यांचे मत होते. वासुदेवशास्त्री खरे यांना ते लिहितात ' तुमच्या मताप्रमाणेच माझे मत आहे, ते असे की १) ऐतिहासिक साधने प्रसिद्ध करणे. २) उपलब्ध झालेल्या साधनांवरून इतिहास तयार करून ती प्रसिद्ध करणे ह्यांपैकी प्रस्तुतच्या स्थितीकडे लक्ष देता पहिलाच मार्ग चांगला. साधनांचे वैपुल्य प्राप्त झाल्यावर इतिहास लिहिणे योग्य होईल. अजून कशास काही ठिकाण नाही, तोच चार सतरफतर पत्रे मिळाली तेवढ्यावरच लिहिलेला इतिहास काय उपयोगी ? पटवर्धनांचे दप्तर म्हणजे ऐतिहासिक साधनाची बरीच मोठी महत्त्वाची एक बाजू झाली. परंतु जितकी साधने उपलब्ध होणे इष्ट आहे तितकी झाली आहेत असे एवढ्यावरून मानावयाचे नाही. बुंदेलखंड, रोहिलखंड, गुजराथ, माळवा, कर्नाटक, कोकणपट्टी किंबहुना बंगाल, पंजाब येथीलसुद्धा मराठ्याच्या इतिहासाचे मिळावयाजोगे कागदपत्र प्रसिद्धीस येतील तेव्हाच फक्त पेशवाईच्या इतिहासांची साधने मिळाली म्हणायची. तेव्हा खटपट व्हावयाची ती आधी याच दिशेने झाली पाहिजे, इतिहास लिहिण्याचे मागाहून पाहता येईल, ' सरदेसाई यांनाही त्यांनी लिहिले, शिवाजी संभाजी, व राजाराम यांच्या इतिहासाचा शोध सध्या आपण करीत आहात हे वाचून बहुत आनंद झाला. शिवाजीसंबंधी पत्रे महाराष्ट्रात

पुष्कळ ठिकाणी आहेत. त्यापैकी बरीच फारशीत आहेत. ती सर्व मिळाल्यावाचून व त्याजवरून शिवाजीच्या चरित्राचा कार्यक्रम कळल्यावाचून शिवाजी इतिहास लिहू जाणे बरेच धोक्याचे आहे, किंबहुना निरर्थक आहे. राजवाडे यांनी हे लिहिणे लिहिल्यानंतर वीस वर्षे गेली. तेवढ्या काळात राजवाडे यांच्याप्रमाणे अनेकांच्या प्रयत्नाने मराठ्यांच्या इतिहासाच्या संशोधनाची स्थिती बरीच सुधारली, तरी ती राजवाडे यांना असावी तितकी समाधानकारक वाटली नाही. १९१८ साली 'संशोधनाची सद्य:स्थिती' हा लेख त्यांनी लिहिला, त्यात मराठ्यांच्या सर्वांगीण इतिहासाची त्यांची कल्पना त्यांनी मांडली आहे. राजकीय, लष्करी, आरमारी, आर्थिक, वाङ्मय, धार्मिक सामाजिक, शास्त्रीय व कलिक म्हणजे कलांचा असे इतिहासाचे नऊ भाग त्यांनी पाडलेले आहेत. त्यांच्याशी संबंधित असलेल्या दहा-वीस बाबींचे बरे संशोधन झाले आहे, बाकी पन्नास पाऊणशे सदरे कोरी ठणठणीत आहेत, बहुतेक सर्वत्र नकार येत आहे, असा अभिप्राय त्यांनी व्यक्त केला आहे. आता या सर्व बाबींचे पुरे संशोधन होणार व मग राजवाडे इतिहास लिहिणार म्हणजे नदीचे पाणी वाहून गेल्यानंतर नदी उतरण्यासारखे होते. तसा विचार अर्थातच राजवाड्यांचा नव्हता. त्यांना इतिहास लिहावयाचा होता. पण काही अंशी स्वभाव व बऱ्याच प्रमाणात परिस्थिती प्रतिकूल झाल्यामुळे त्यांचा इतिहास त्याच्या संकल्पसृष्टीतच राहिला. **Some must inglorious Mil'on here may rest** अशी ग्रे कवीने वर्णन केलेली प्रतिभावंताची शोकांतिका त्यांच्या वाट्याला आली.

त्यांच्या स्वतःच्या शब्दात आणि त्यांच्या परिस्थितीच्या संदर्भात मनात असूनसुद्धा राजवाडे हे मराठ्यांचा इतिहास का लिहू शकले नाहीत यांचे स्पष्टीकरण हे असे आहे. कोणाही सहृदय आणि विचारी माणसाला ते पटण्यासारखे आहे असे असता बंगालचे प्रसिद्ध इतिहासकार यदुनाथ सरकार यांनी निराळेच स्पष्टीकरण दिले आहे. त्यांच्या मते राजवाडे इतिहास लिहू शकले नाहीत कारण इतिहासकार होण्यास ते पात्रच नव्हते. त्यांचा जातीय पूर्वग्रह, त्यांचा संतापी स्वभाव,

त्यांचे अस्ताव्यस्त वाचन यामुळे समतोल निर्णयशक्तीला ते पारखे झाले होते, त्यांच्यापाशी गिबनची तर राहोच पण दुय्यम दर्जाच्या युरोपियन इतिहासकाराची सुद्धा समन्वय करणारी प्रतिभा आणि देशकालातीत असणारी स्थितप्रज्ञ वृत्ती नसल्यामुळे ते जन्मभर इतिहाससाधनांचे संकलक म्हणून राहिले आणि नाव घेण्यासारखा एकसुद्धा इतिहास रचू शकले नाहीत.'

जदुनाथ सरकार हे बंगाली तरीसुद्धा त्यांनी मराठी भाषा उत्तम प्रकारे हस्तगत करून घेतली होती. असे असले तरी, राजवाड्यां-बद्दलचा त्यांचा अभिप्राय पाहिला म्हणजे, राजवाडे यांचे समूळ ग्रंथ पाहिल्याविना ते त्यांना उगाच दूषण ठेवीत आहेत, असे वाटल्याशिवाय राहत नाही. मराठ्यांबद्दल व मराठ्यांच्या इतिहासा-बद्दल राजवाडे यांना अभिमान होता, म्हणून तर त्यांनी मरा-ठ्यांच्या इतिहासाची साधने जमा करण्यासाठी आपले उभे आयुष्य अर्पण केले. पण इतिहासाचा विचार करताना त्यांनी तो अभिमान कोठेही आड येऊ दिला नाही. इतिहासाची त्यांची व्याख्या आणि आणि कल्पनासुद्धा शास्त्रीय स्वरूपाची आहे– 'वर्तमान काळाच्या पाठीमागील गतकाळी पृथ्वीवरील नव्या व जुन्या घरावरून साम्रा-ज्यांच्या सर्व जातीच्या उलाढालींची जी साद्यंत व विश्वसनीय हकीकत तो इतिहास होय. सूक्ष्मतेने पाहता निर्भेळ इतिहास म्हणून ज्याला म्हणता येईल त्याचे काम फक्त झालेल्या प्रसंगाची विश्वस-नीय हकीकत देण्याचे आहे. काळाचे पौर्वापर्य लावून व प्रसंगाचे कार्यकारणत्व सिद्ध करून भूतगोष्टी अशा सातत्याने झाल्या इतके सांगितले म्हणजे इतिहासकाराची कामगिरी आटोपली.' ( खंड ६, प्रस्तावना ) इतिहासाचा उपयोग काय याचे उत्तर राजवाडे देतात– 'उच्च प्रतीची करमणूक हाच केवळ इतिहासाचा उपयोग नाही. स्वसमाजाचे सबीज व साधारण चरित्र कळले असता सामाजिक गुणदोष दृष्टोत्पत्तीस येतात आणि दोषांचा त्याग आणि गुणांचा परिपोष हा इतिहासज्ञानाचा मुख्य उद्देश आहे.' (उक्त) आता इतिहास करून लिहिला पाहिजे यांचे जे विवेचन राजवाडे यांनी

केले आहे, ते पाहिले म्हणजे जदुनाथ सरकारांनी त्यांच्यावर जो पूर्वग्रहाचा आरोप केला आहे त्याचे आपोआपच निरसन होते– 'वैयक्तिक मते एकीकडे सारून, स्वदेशाभिमानाचा दर्प बाजूला ठेवून, सर्व प्रकारचे अर्धवट ग्रह सोडून देऊन इतिहासलेखनाचे काम केले पाहिजे.' 'इतिहासाचे परिशीलन करताना बरे–वाईट, शुभ–अशुभ वगैरे नैतिक पूर्वग्रहांना बिलकूल रजा दिलीच पाहिजे.' 'इतिहासाचे काम आवडनिवड किंवा स्तुती निंदा न करता झाली गोष्ट जशीच्या तशी नमूद करून ठेवण्याचे आहे. इतिहास भूत वृत्तांचा विश्वसनीय सारांश देतो व नीतिशास्त्र त्याची उत्तम क्षमता ठरवते.' (खंड ६–प्रस्तावना) राजवाडे यांची ही इतिहासाची शास्त्रीय कल्पना आणि मराठ्यांच्या पाचशे वर्षांच्या इतिहासातील, 'जसे ज्याचे तत्त्वज्ञान तसा त्याचा प्रपंच' या तत्त्वान्वये त्यांनी सिद्ध केलेले तत्त्वज्ञान, त्याचप्रमाणे इंग्रज व मराठा ह्या दोन संस्कृतींच्या संघर्षात सांस्कृतिक व वैज्ञानिक कमतरतेमुळे मराठ्यांना आलेले अपयश ही मीमांसा विचारात घेतली म्हणजे राजवाडे यांची ऐतिहासिक प्रज्ञा किती व्यापक, भेदक आणि सखोल होती, यांची प्रचीती येते.

पृथक्करण आणि तत्त्वचिकित्सा हा प्रज्ञेचा धर्म आहे. ज्ञातावरून अज्ञाताचे अनुमान बांधणे आणि उपलब्ध पुराव्यावरून व्यक्ती किंवा प्रसंग याचे अखंड व यथार्थ चित्र निर्माण करणे हे प्रतिभेचे काम आहे. पण १८९० साली उपलब्ध झालेल्या तुरळक पुराव्यावरून त्यांनी पानिपतच्या घनघोर संग्रामाचे जे चित्र रेखाटले ते कवीच्या निरंकुश प्रतिभेचा कल्पनाविलास न ठरता, चाळीस वर्षांनंतर पेशवे दप्तरातल्या नव्या पुराव्याने यथार्थ आणि अव्यंग ठरले. १९२२ साली 'राधामाधवविलासचंपू' च्या प्रस्तावनेत शहाजीच्या कर्तृत्वाचे त्यांनी जे भव्य आणि उदात्त चित्र काढले, ते नंतरच्या पुराव्याने निर्दोष आणि वास्तव ठरले. १९२४ साली 'महिकावतीची बखर' च्या प्रस्तावनेत त्यांनी शिवाजी व औरंगजेब भेटीतील शिवाजीची दिल्लीन्द्राचे पद पटकाविण्याची ईर्षा रंगविली ती नंतर

उपलब्ध झालेल्या इंग्लिश फॅक्टरीच्या रेकॉर्डसनी ऐतिहासिक दृष्टया बरोबर ठरविली. ' रङे न वर्तते चित्र न भूमौनच भाजने।' अशा स्थितीत केवळ कल्पनेच्या पटावर रंगवलेली राजवाडयांची इतिहासचित्रे किती वास्तव ठरली, पाहिले म्हणजे त्यांची कल्पनाशक्ति सुद्धा ऐतिहासातील वास्तवाशी किती इमान राखत होती हे दिसून येते.

I am a rationalist and my method is historical ' हे राजवाडयाचे वाक्य प्रसिद्धच आहे. ' निर्लेप निरहंकारपणा इतिहासाचे खरे स्वरूप जाणण्याच्या मार्गाला लागण्याची पहिली पायरी आहे. ' वास्तवाच्या ह्या तीव्र जाणीवेमुळेच ब्रह्मेंद्र स्वामींना पारसनिसांनी रामदासाच्या उंचीस पोचवलेले त्यांना रुचले नाही. कोणत्याही ऐतिहासिक पुरुषाच्या गुणदोषाचे जे चित्र काढावयाचे असते ते दस्तऐवजी पुराव्यावरून काढावयाचे असते, आपले पूर्वज मोठे होते, शूर होते, कर्तृत्ववान होते, नीतिमान होते, अशी अभिमानाची प्रौढी मिरवण्यात मौज आहे खरी परंतु ते सर्व गुणसंपन्न होते, त्यांच्यात दोष बिलकूल नव्हते, ते नीतीचे केवळ पुतळे होते, वगैरे देवांना समजणाऱ्या गुणांचा आरोप त्यांजवर करणे म्हणजे मनुष्य स्वभावाची अट्टाहासाने थट्टा करण्यासारखेच आहे. वर्तमान व भावी पिढयांना आपल्या पूर्वजांचे गुणदोष कळावे, कोणत्या गुणांच्या जोरावर त्यांनी राष्ट्राची उन्नती केली व कोणत्या दोषांमुळे ते राष्ट्राच्या अवनतीला कारण झाले, हे ज्ञान त्यास व्हावे हा तर इतिहास लिहिण्यात प्रधान हेतू आहे तो एकीकडे सारून काल्पनिक वर्णने लिहिण्यात तात्पर्य काय ?' (प्रस्तावना खंड–३)

राजवाडे यांना इतिहासात नैतिक बळाचे (Moral factor) महत्त्व वाटत नव्हते असाही आरोप सरकार यांनी त्यांच्यावर केला आहे. हाही आरोप राजवाडे यांचे वाङमय काळजीपूर्वक न वाचल्यामुळे केलेला आहे. देशातील बहुतम प्रजेचे सांस्कृतिक दास्यत्व व भौतिक विद्येतील मागासलेपणा ही त्यांच्या मते मराठयाच्या



Scanned with CamScanner

राज्यनाशाची प्रमुख कारणे असली, तरी तितकेच महत्त्व त्यांनी मराठी राष्ट्रांच्या राष्ट्रीय नीतिमत्तेच्या ऱ्हासाला दिलेले आहे. पहिल्या खंडाच्या प्रस्तावनेत, व त्याहीपेक्षा तिसऱ्या खंडाच्या प्रस्तावनेत ब्रह्मेंद्रस्वामीचे सत्य स्वरूप उघड करताना राष्ट्राची नीतिमत्ता व राष्ट्राचे भवितव्य याचा संबंध त्यांनी निःसंदिग्ध शब्दात वर्णन केला आहे– ' राष्ट्रातील पुढाऱ्याची व श्रेष्ठ पुरुषाची दानत धुतल्या तांदळासारखी असली तरच इतर सामान्य पात्रांची नीतीमत्ता मर्यादेत राहते. भगवी वस्त्रे पांघरून कुकर्मे करण्याचा, परस्परात वैमनस्ये लावण्याचा, ज्यांनी विश्वास ठेवला त्यांचे गळे कापण्याचा धडा महाराष्ट्रास ब्रह्मेंद्र स्वामीने प्रथम घालून दिला व तो पुढील एकेका पिढीने जास्त जास्त गिरविला... औरंगजेबच्या वेळी ज्या राष्ट्रातील पुढाऱ्यांनी स्वातंत्र्यार्थ जिवापाड मेहनत घेतली, त्याच राष्ट्रातील मंडळी बाजीरावाच्या वेळी केवळ स्तब्ध उदासीन राहिली. रामदासी व भार्गवरानी धड्याचे हे असे निरनिराळे परिणाम झाले. १७९५त नाना फडणीसाच्या कारकिर्दीत जी टोलेजंग इमारत भक्कम असावी असे वाटले, ती त्याच्यानंतर १०/५ वर्षांत अशी एकाएकी डबघाईस कशी आली ह्याचे कित्येकांना आश्चर्य वाटते, परंतु ह्या राष्ट्राची राष्ट्रीय नीतिमत्ता ब्रह्मेंद्रस्वामीपासून २।३ पिढ्या बिघडत बिघडत बाजीरावाच्या कारकीर्दीत पूर्ण नासून गेली ही गोष्ट जर लक्षात घेतली तर आश्चर्य वाटण्याचे काही एक कारण राहणार नाही. '

आता राजवाडे झाले तरी अखेर माणूसच होते, आणि माणूस म्हटला म्हणजे पूर्वग्रहांपासून सर्वस्वी मुक्त असणे अशक्य होय. माणसाच्या मनाची कोरी करकरीत पाटी प्रायः कल्पनासृष्टीतच संभवनीय आहे. त्यामुळे अनेक ठिकाणी राजवाडे यांच्या शास्त्रीय वृत्तीला रागद्वेषाची व पूर्वग्रहाची बाधा झालेली दिसते. पानिपत प्रसंगाच्या विवेचनात त्यांनी गोविंदपंत बुंदेल्याला अगदी धारेवर धरले, इतकेच नव्हे, तर त्याच्या जातीचाही उद्धार केला. ही ऐतिहासिक वृत्ती नव्हे. डॉ. केतकर म्हणतात. ' सरदेसायांसदेखील मनातून असे वाटे

की, राजवाड्यांनी पानिपतच्या मोहिमेचे खापर गोविंदपंत बुंदेल्याच्या डोक्यावर फोडले आहे, तर कऱ्हाड्यांनी गोविंदपंताची बाजू घेतली पाहिजे.' वारकरी संतांना 'संताळे' असे तुच्छतेने संबोधून राजवाडे यांनी त्यांच्यावर कडक टीका केली व ही ग्यानबा-तुकारामांची जोडी महाराष्ट्राच्या बहुत नाशास कारण झाली असे म्हणण्यापर्यंत मजल गाठली पण, पुढे त्यांनीही त्यांची मते स्वतःच दुरुस्त केली हेही लक्षात घेणे जरूर आहे. राजवाडे यांनी स्वतःच प्रांजळपणाने म्हटले आहे की, 'झाडून सर्व पूर्वग्रह टाकून देणे मनुष्य स्वभावाला तर निसर्गतःच अशक्य आहे. निर्विकार दृष्टीचा उपयोग करू पाहणारी व्यक्ती स्वतः विकारवश असते व ज्या समाजदृष्टीचा उपयोग करावयाचा ते समाजही विकारवश असतात. ज्यातील दोन्ही पदे चल आहेत असे हे समीकरण सोडविणे अर्थातच फार दुर्घट आहे. स्वतःचे विकार अजिबात दाबून समाजाच्या विकाराचे व विचारांचे वर्णन व परीक्षण ताटस्थ्याने करणारा इतिहासकार केव्हा जन्मेल तो जन्मो.' अशी एकंदर साऱ्याच इतिहासकारांची स्थिती असल्यामुळे, पूर्वग्रहाची जी बाधा राजवाडे यांना झाली होती, तिने त्याच्यावर टीका करणाऱ्या सरकारांनाही पछाडले होते, इतकेच नव्हे, तर सरकारांचे दैवत असलेला गिबनसुद्धा त्या बाधेपासून मुक्त नव्हता. गिबनने आपल्या इतिहासात ख्रिश्चन चर्चवर जी टीका केली आहे ती ऐतिहासिक प्रामाणिकपणाला सोडून आहे असे कॉटर मॉरिसनने म्हटले आहे. आणि त्याच्या पूर्वग्रहाने त्याच्या ऐतिहासिक दृष्टीला बाधा आणली असा अभिप्राय व्यक्त केला आहे. मराठ्यांच्या बंगालवरील स्वाऱ्यांची हकीकत देताना व त्यांच्या खऱ्या-खोट्या अत्याचारांवर व नीतिभ्रष्टतेवर टीका करताना सरकारांमधल्या इतिहासकारावर त्यांच्यातल्या केवळ माणसानेच नव्हे तर बंगाली माणसाने मात केली आहे असे वाटते. गिबन ख्रिश्चन धर्मावर अशी टीका करतो की, जणु ख्रिश्चन धर्माने त्याचे काही घोडे मारले आहे' असे मेकॉले एकदा गिबनच्या ख्रिश्चन चर्चच्या टीकेबद्दल म्हणाला होता. 'said that Gibbon wrote of Christianity like a man who has

received a personal injury मेकॉलेचा गिबनबद्दलचा हा अभि-प्राय, बंगालवर स्वाऱ्या करणाऱ्या मराठ्यांवर टीका करणाऱ्या जदुनाथ सरकार यांना लागू करता येण्यासारखा आहे.

याचा अर्थ हाच की, निर्विकार बुद्धीने इतिहास लिहिणारा इतिहासकार या भूतलावर अद्याप जन्मावयाचा आहे. 'श्लाघ्यः स एव गुणवान रागद्वेषविवर्जितः। भूतार्थकथने यस्य स्थेयस्येव सरस्वती' या कोटीतला कल्हणाने गौरविलेला इतिहासकार हा आदर्श आहे, तो वास्तव नव्हे. अशी स्थिती असल्यामुळे राजवाडे यांच्या इतिहास-विषयक वाङ्मयाचा परामर्श घ्यावा तसा न घेता जदुनाथ सरकारनी त्यांनी इतिहास लिहिला नाही कारण ते इतिहासकार होऊच शकले नसते, हा जो अभिप्राय व्यक्त केला आहे, तो राजवाडे यांच्यावर अन्याय करणारा आहेच पण राजवाड्यांबद्दल त्यांचा प्रतिकूल पूर्व-ग्रह दाखवणाराही आहे. सरकारांबद्दल उदंड आदर बाळगूनही अगदी जपून बोलायचे झाले, तरी 'एका इतिहासकाराने दुसऱ्या इतिहास-काराबद्दल केलेले अनैतिहासिक विधान' याच शब्दात सरकार यांच्या राजवाडे यांच्याबद्दलच्या अभिप्रायाची संभावना करणे भाग आहे.

मुंडले यांना एकदा राजवाडे म्हणाले की 'युरोपियन स्कॉलर्स व थिंकर्स हे सर्व युरोपियन राष्ट्रवादाच्या विचाराने भारलेले आहेत व त्याच्यांशी टक्कर देऊन आपणाला जगावयाचे व आपला उद्धार करून घ्यावयाचा आहे. तेव्हा केवळ निरपेक्ष अशी तत्त्वचर्चा (अब्सोल्यूशन) एखाद्या वेदांत्याप्रमाणे करून चालणार नाही.' राजवाड्यांचा इतिहासा-कडे पाहण्याचा काय दृष्टिकोन होता आणि त्यांच्या हातून इतिहास का लिहिला गेला नाही याचे हे आणखी एक कारण आहे. ते इति-हासकार होते, पण केवळ इतिहासकार नव्हते. इतिहास हा त्यांच्या मनोविनोदाचा किंवा आनंदसेवनाचा भाग नव्हता. इतिहास हा त्यांच्या दृष्टीने व्यापक समाजशास्त्राचा भाग होता. म्हणूनच इतिहास ग्रंथाप्रमाणे समाजशास्त्रावरचाही ग्रंथ रचण्याचा त्यांचा संकल्प होता. इंग्रजीतील प्रसिद्ध शब्दात सांगायचे म्हणजे इतिहास हे त्यांच्या लेखी

लिबरल नॉलेज नव्हते तर युसफुल नॉलेज होते. समाजाचे सबीज व सकारण चरित्र कळणे व त्यापासून गुणस्थाने व दोषस्थाने कळणे व गुणांचा परिपोष व दोषाचा त्याग करणे हा त्यांच्या दृष्टीने इतिहासाचा उपयोग होता. त्यामुळे समकालीन व भूतकालीन समाजाच्या यच्चयावत हालचालींवर त्यांची दृष्टी खिळलेली होती आणि म्हणून राज्यशास्त्र, मानवशास्त्र, भाषा व व्याकरण, साहित्य आणि व राजकारण, चातुर्वर्ण्य व जातिसंस्था, इतिहास व पुराणवस्तुसंशोधन अशा अनेक विषयांचा त्यांनी आपल्या लेखातून परामर्श घेतलेला आहे. उदाहरणार्थ 'राष्ट्रीय सभा', 'वेदोक्त' 'अंत्यजोद्धार' 'स्वदेशी' हे समकालीन राजकारणावरील लेख आहेत, 'महाराष्ट्रातील बुद्धिमान, कर्त्या व प्रतिभावान पुरुषाची मोजदाद' 'बडोद्यातील सुधारणा' हे सामाजिक आहेत, 'हिंदु समाजात हिंद्वेतरांचा प्रवेश', 'भारतीय विवाहसंस्थेचा इतिहास' 'गागाभट्ट व कायस्थ धर्मदीप' 'महाराष्ट्राचा वसाहतकाल' हे ऐतिहासिक दृष्टीने सामाजिक उत्क्रांतीची मीमांसा करणारे लेख आहेत, 'रामदास' 'कादंबरी' 'बडोदे येथील ग्रंथकारांचे संमेलन' हे साहित्यविषयक आहेत, 'खड्गारात' 'नट व निच्छिवि' 'पाताणे प्रभू' 'मगध या व्युत्पत्त्या आहेत, 'पाणिनी कालनिर्णय', 'श्रीगजानन' 'सप्तशती' हे इतिहासनिर्णय करणारे लेख आहेत, 'विकृत विचार' 'दामल्याचे शास्त्रीय व्याकरण' 'राष्ट्रीय मराठी कोश' 'संस्कृत भाषेचा उलगडा' 'धातुकोश' हे प्रबंध भाषा आणि व्याकरण यांचा परामर्श घेणारे आहेत. एकमेकांपासून सर्वथा भिन्न असलेल्या या विषयांचा अफाट विस्तार आणि विविधता पाहिली आणि त्यात सहज लीलेने संचार करणाऱ्या राजवाड्यांच्या बुद्धीची झेप ध्यानात घेतली म्हणजे गगनाला गवसणी घालणाऱ्या गरुडाची आठवण होते आणि 'नास्ति कश्चिदविषयो धीमतानाम' हे कालिदासाचे शब्द सहजच डोळ्यांपुढे येतात.

वैयक्तिक रागद्वेषांपासून अलिप्त असलेली शास्त्रीय वस्तुनिष्ठ दृष्टी हा राजवाडे यांच्या सगळ्याच लेखनाचा आत्मा आहे, त्याला

हे लेख अर्थातच अपवाद नाहीत. पण शरीराच्या रोमरंध्रात प्राणवायू त्याप्रमाणे स्वदेश स्वभाव आणि स्वधर्म याचे ऊर्जित व्हावे, ही जिवंत तळमळ या लेखातल्या शब्दाशब्दात प्रतीत झाल्याशिवाय राहत नाही. 'कालगणन' हा शुद्ध शास्त्रीय लेख आहे. त्यात मुसलमानी अरबी फसली, त्याचप्रमाणे ख्रिस्ती कालगणना यांच्यापेक्षा शालिवाहन शकाची कालगणना जास्त सशास्त्र आहे, हे सिद्ध केले आहे. राजवाडे आपली सारी कालगणना शकाने करीत हे प्रसिद्धच आहे. ज्ञानकोश मडळाशी त्यांचे लेख देण्याबद्दलचे बोलणे चालू असता, 'कालगणना शकाने करीन' अशी आपली अट त्यांनी डॉ. केतकरांना कळविली होती, शालिवाहन शकाची सद्यःस्थितीत होत असलेल्या उपेक्षेबद्दल ते म्हणतात, 'आपले महिने चांद्र असून वर्ष सौर आहे, त्यामुळे भूमंडलातील जे मोटे दोन दिवे त्यांच्या दैनंदिन, मासिक व वार्षिक गतीशी आपल्या तिथी, मास, व वर्ष यांची जुळणी मोठी सशास्त्र व सुंदर बसली आहे. ही सुंदर जुळणी टाकून, वाटेल तेव्हा केव्हा तरी सुरू होणाऱ्या इंग्रजी तारखांचा व महिन्यांचा आपण अभिमान बाळगावा हा शुद्ध वेडेपणा आहे, अलीकडे पाच-पन्नास वर्षे युरोपियन पद्धतीने कालगणन करण्याचे आपणास व्यसन लागले आहे. ते आपण सोडले पाहिजे. शास्त्र, रूढी, पूर्वापरसंबंध व अभिमान या सर्वांचे पक्षपातित्व शालिवाहन शकाकडेच आहे.' राजवाडे यांच्याकाळी बडोद्याचे संस्थान सुधारणांबद्दल नावाजलेले होते. राजवाडे यांनी त्या सुधारणांचे परीक्षण करून काही मूलग्राही सूचना केल्या. राजवाड्यांची विवेचनाची ऐतिहासिक पद्धत त्यांनी बडोद्यालाही लागू करून असा निष्कर्ष काढला आहे की, 'गेल्या दोनशे वर्षात ह्या संस्थानचा स्वभाव वरिष्ठ सरकारची सत्ता झुगारून देऊन जमल्यास स्वतंत्र होण्याचा आहे. स्वतंत्र होण्याचा मूळ हेतू मात्र कधीही सिद्ध झाला नाही.' राजवाड्यांच्या काही सूचना थोड्या विलक्षण आहेत. प्रजा संरक्षणक्षम होण्यास, पोलीस शिपाई व लष्कर गुजराथी लोकांतील धडधाकट लोकांचेच बनवले पाहिजे. सुधारणेची इच्छा केवळ राजाला नाही. ती प्रजेलाही असली पाहिजे. त्याला योग्य तेच शिक्षण म्हणजे

राजकीय शिक्षणच पाहिजे. धर्मभक्तिहीन व राष्ट्रभक्तिहीन शिक्षणाने स्वातंत्र्याच्या ऐवजी स्वैरतेचा मात्र फैलाव होईल.संस्थानातील प्रजेला मवाळपणा आणणाऱ्या ज्या संस्था संस्थानात असतील त्यांचा निर्दय-पणे नाश करणे उचित आहे. मवाळपणा आणणाऱ्या असल्या संस्था-पैकी मुख्य संस्था म्हणजे बडोद्यातील गायनवादन शाला होय. ववहं-ववहं, किणकिण, गुहं गुहं वगैरे, नरम आवाज उत्पन्न करणारी सतार, तंतवाद्य, गितार वगैरे भिकार वाद्ये खुद्द भीमसेनालाही बृहन्नडा कर-तील, मग सामान्य पोलिस शिपाई व खर्डेघाशे ह्यांना त्यांनी साक्षात स्त्रैणपणा आणला तर नवल नाही. संख्या दृष्टीने समाजपरीक्षण करण्याच्या व त्यावरून सिद्धांत बांधण्याच्या राजवाडे यांच्या पद्धतीचा नमुना म्हणून 'महाराष्ट्रातील कर्त्या पुरुषांची मोजदाद' हा अतिशय प्रसिद्ध लेख पाहण्यासारखा आहे. गेल्या शंभर वर्षात निरनिराळ्या क्षेत्रात कर्तृत्व केल्याबद्दल मराठा म्हणजे महाराष्ट्रीय समाजात प्रसिद्ध असलेली १५० माणसे त्यांनी निवडली आहेत आणखी २५ धरून १७५ झाले. या प्रसिद्ध पुरुषांतून टिकाऊ व भरीव कामगिरी करणारे ४३ माणसे निवडली. २ गोळा बेरजेसाठी धरून ४५ झाले. त्यात पुन्हा निवड करून प्रतिभासंपन्न २३ राहिल्या. ४५ पैकी २३ हयात आहेत. मिळून शके १८३५ (१९१३ इ. स.) त मराठा समाजात कर्त्या व्यक्ती २३ आहेत. २५ धरू. शोधकांच्या शोधान्वये १८६८मधे ग्रेट ब्रिटनमधे ५०० बुद्धिमान व कर्त्या व्यक्ति होत्या व लोकसंख्या ४ कोटी होती. लाखात सव्वा बुद्धिमान कर्ता माणूस हे प्रमाण शास्त्र-ज्ञांनी काढले व ते कायम समजावे असे म्हटले आहे. १९१३ साली ग्रेट ब्रिटनमधे लाखात सव्वा माणूस कर्ता व बुद्धिमान, मराठा समा-जाची लोकसंख्या २ कोटी धरली तर २५ कर्ती माणसे निघाली. म्हणजे ८ लाखात एक कर्ता माणूस झाला.पण मोजणीतला सढळपणा कमी केल्यावर ही संख्या १० राहते म्हणजे २० लाखात १ कर्ता झाला. ब्रिटिश समाज व मराठा समाज यांच्यात प्रख्यात कर्तृत्वासंबंधाने २५: १ असे प्रमाण बसते. आता व्यवसाय बाहुल्यांच्या दृष्टीने पाहिले तर रसायनशास्त्र, अर्थशास्त्र इत्यादी शास्त्रात आपला एकही माणूस

नाही. आपले २३ प्रख्यात लोक १) मुत्सद्दी २) गणिती ३) ग्रंथकार ४) कादंबरीकार ५) काव्येतिहाससंशोधक ६) समाजसेवक ७) पत्रकार ८) नाटककार ९) वेदांत शास्त्रज्ञ याच वर्गात आहेत. ग्रेट ब्रिटनात या शास्त्रात व व्यवहारात एकाहून एक कर्ती व शोधक माणसे आहेत. ' ह्याचा अर्थ असा होतो की कोणत्या वेळी आपल्या समाजावर प्राणान्तिक संकट ओढवेल त्याचा नेम नाही.' ' ब्रिटिश समाजात व मराठा समाजात गेल्या शंभर वर्षात बुद्धिमत्तेचे प्रमाण ४०:१ असे निघते.' २०० वर्षातील सगळ्या जगातील बुद्धिमत्तेशी व कर्तृत्वाशी आपल्या समाजाच्या बुद्धिमत्तेची कर्तृत्वाची तुलना केली तरी २:१ किंवा ४:१ असे प्रमाण आपल्या वाट्यास येते. तात्पर्य, ' बुद्धिमान व कर्त्या जगात आपली किंमत नाही.'

१९०२ साली ठाणे मराठी ग्रंथसंग्रहालयात नववा वर्धापनदिन झाला. त्या प्रसंगी ग्रंथाची आवश्यकता आणि मराठीत ग्रंथरचना करण्याची जरूरी या बाबतीत बोलताना राजवाडे यांनी असा विचार मांडला की, ' ग्रंथसमूह हे खरे समाजसुख होय.' ग्रंथ वाचल्याने मनुष्य विचार करू लागतो. विचारांचा खल झाल्याने आचार बनतात व नंतर समाजाचे पाऊल पुढे पडते. पण रानडे, कुन्टे, तेलंग, भांडारकर या मोठ्या लोकांचे वैगुण्य हे आहे की, त्यांनी इग्रजीत लिहिले, ' ह्यांचे देह महाराष्ट्राचे खरे पण यांनी सेवा केली परराष्ट्राची.' परकी भाषेत केलेले कार्य चिरकाळचे नाही. केशव चंद्रसेन, राजा राममोहन रॉय अशी मंडळी आमच्या देशात व्हावी पण स्वभाषेत होऊ नये हे दुर्दैव नव्हे काय ? मात्र अपमान, लहानसहान गरजा, ह्यांची परवा न करिता ज्या समाजात आपण उपजलो त्याची भाषा आहे, हे लक्षात धरून तिच्या द्वारे आपण असे दाखविले पाहिजे की आम्हास विचार करण्याची ताकद आहे.' बडोदे येथील ग्रंथकारांच्या संमेलनात साहित्य परिषदेची संस्थारूपाने स्थापना झाली. त्यांचा परामर्श घेताना राजवाडे यांनी असा मार्मिक विचार मांडला की, ' प्रतिभावंत सारस्वत निर्माण करण्याचे काम ह्या संस्थेचे नाही. ते काम व्यक्तिशः प्रतिभाशाली सरस्वती पुत्रांचे आहे. ते काम द्रव्याने होणारे नाही, संस्थेने

होणारे नाही किंवा राजाश्रयाने होणारे नाही. ते काम केवळ प्रतिभाधीन आहे.' परंतु साहित्याच्या क्षेत्रातील राजवाडे यांचा अत्यंत नामांकित निबंध म्हटला म्हणजे ' कादंबरी ' हा होय. वस्तुतः कादंबरीचा विषय म्हणजे ललित व कल्पनारम्य, राजवाडे यांचा स्वभाव गंभीर व रागीट, स्त्री-पुरुष संसाराचा त्यांनी केव्हाच निरोप घेतलेला, त्यांचे आवडीचे विषयही व्याकरण, व्युत्पत्ति, इतिहास यांच्यासारखे एका पेक्षा एक रूक्ष. अशा माणसाने कादंबरीसारख्या विषयावर कादंबरीकारापेक्षाही मर्मग्राही निबंध लिहावा हे एक आश्चर्यच म्हटले पाहिजे.

राजवाडयांच्या टीकावाङ्मयातला हा लेख म्हणजे कोहिनूर म्हटला तरी चालेल. मराठी कादंबरीची सद्यःस्थिती हा या निबंधाचा मुख्य विषय आहे. पण ' ताकापुरते रामायण ' या न्यायाने जेवढ्यास तेवढ्यापुरते विवेचन करणे, हा मुळी राजवाड्यांचा बाणाच नव्हे. कादंबऱ्यांचे अद्‌भुत आणि वास्तविक असे दोन प्रकार त्यांनी केले आहेत, आणि अद्‌भुताची परंपरा, महाराष्ट्रापुरते बोलायचे झाले तरी आठशे वर्षांची आहे. अद्‌भुतापासून पुढे क्रमाने वास्तविकाचा विकास झाला. तरी पाश्चात्यात अजूनही अद्‌भुताचा सुकाळ आहे–' परवा नुकती जर्मनीत जीत पॉल रिक्टरसारखी मंडळी नामी अद्‌भुत कथा निर्माण करते,आणि अद्‌भुताचा काळ गेला आणि वास्तविकाचा काळ आला म्हणून म्हातारपणाच्या गोष्टी करण्यात आम्ही शहाणपणा मानतो याला काय बरे म्हणावे ? ' मराठी कादंबरीप्रमाणे पाश्चात्य वाङ्मयातील अद्‌भुताचा व वास्तविकाचा परामर्श राजवाडे यांनी घेतलेला आहे आणि सामाजिक दुःखे व राष्ट्रीय वासना प्रकट करणाऱ्या फ्रेंच व रशियन कादंबऱ्यांच्या मानाने, साम्राज्यलब्धी एवढाच उद्देश असलेल्या इंग्लंडमधील व्यक्तिप्रधान कादंबऱ्यांचा दर्जा खालचा ठरवला आहे. येवढ्या व्यापक पार्श्वभूमीवर मराठी कादंबरीचा विचार करताना स्वतंत्र प्रमाणावर कादंबरीलेखन करणारे एकमेव कादंबरीकार हरिभाऊ आपटे यांचा दर्जा ठरवला म्हणजे जागतिक वाङ्मयात मराठी कादंबरीचा दर्जा ठरवल्यासारखे त्यांना वाटते.

' इंग्लंडमधील सोसायटी नॉव्हेल्सपेक्षा यांच्या कादंबऱ्या सरस आहेत. परंतु डिफन्स, थॅकरे वगैरेंच्या तोडीला ह्याचा कोणताही ग्रंथ बसविता येईल असे वाटत नाही.' परंतु राजवाडे यांनी प्रांजळपणाने कबूल केले आहे की, 'अलीकडील तीस वर्षातील वास्तविक कादंबरीकारात हे फारच मोठ्या योग्यतेचे आहेत. पुढील दहा-वीस वर्षात हे कदाचित सध्याच्या वाचकांच्या स्वप्नीही नाहीत असे स्वतंत्र चमत्कार करू शकतील असे त्यांच्या ह्या गोष्टीवरून वाटते.' लोकांची खरी स्थिती वाचकांच्या मनात यथास्थित बिंबविण्याला कादंबरीसारखे दुसरे साधन नाही, ' रामजी ' हे त्यांचे उत्कृष्ट उदाहरण आहे ह्या संबंधात राजवाडे यांनी कादंबरीकारांचे कर्तव्य काय हे सांगताना एक अत्यंत अर्थ पूर्ण व माननीय विधान केले आहे त्यावरून त्यांची सामाजिक सहानुभूतीची इयत्ता कळून येईल.' समाजातील हा जो पतित भाग आहे त्याच्या स्थितीचे प्रदर्शन करणे हे प्रत्येक कादंबरी-काराने आपले आद्यकर्तव्य समजले पाहिजे. श्रीमंतीत अंध झालेल्या राष्ट्रातील कादंबरीकारांना हे कर्तव्य करणे लाजिरवाणे वाटल्यास, ते त्यांना खुशाल वाटो. परंतु हिंदुस्थानातील व महाराष्ट्रातील कादंबरी-कारांना तसे वाटून परिणाम लागावयाचा नाही. ह्या देशातील दारि-द्रयाने गांजलेल्या, रोगाने पीडिलेल्या व विद्येने मागासलेल्या सामान्य जनसमूहाचा कैवार सहृदयतेचे मूर्तिमंत पुतळे जे कादंबरीकार त्यांनी घेतला नाही तर दुसरा कोण घेईल ?' राजवाडे यांनी हे शब्द लिहून झाल्यानंतर तीस वर्षांनी मराठी वाङमयात माटे यांचे 'उपेक्षितांचे अंत-रंग ' प्रसिद्ध झाले आणि आज ऐंशी वर्षांनंतर दलित वाङमयाचे स्वतंत्र दालनच उघडले गेले आहे. राजवाडे यांच्या द्रष्टेपणाची झेप केवढी विशाल आहे हे यावरून कळून येईल. ह्यूगो किंवा टॉलस्टॉय यांच्यासारख्या फ्रेंच आणि रशियन कादंबऱ्या मराठीत कशा आणि केव्हा निर्माण होतील याबद्दलही त्यांचे विचार असेच चिरंतन महत्त्वाचे आहेत. ' आता ह्यूगो, झोला, टॉलस्टॉय ह्यांच्यासारखी ग्रंथरचना व्हावी अशी इच्छा असेल, तर त्याला एकच उपाय आहे. ह्यांच्यासारखी मने ह्या देशातील कादंबरीकारांची बनली पाहिजेत. विधवांची दुःखे

पाहून जीव तिळतिळ तुटला पाहिजे.गरिबांची उपासमार पाहून स्वतः-च्या घशाखाली घास उतरता कामा नये.स्वदेशाचे दैन्य पाहून रात्रीची झोप डोळ्यावरून उडून जावी.स्त्रियांची बेअब्रू झालेली पाहून द्रौपदी-च्या भीमाप्रमाणे त्वेष यावा ही मनोवृत्ती ज्यांची झाली, ह्या ब्रह्मा-नंदी ज्यांची टाळी लागली, त्यांनीच कप्तान ड्रेफूची बाजू घेऊन सर्व राष्ट्राविरुद्ध भांडावे व रशियातील पादशाहीलाही चळचळ कापावया-ला लावावे. इतरांची माय ही कामे करणाऱ्या कादंबरीकारांना व्याली नाही ! तेव्हा उत्तोमत्तम कादंबरीकार व्हावयाचे म्हणजे मनोवृत्ती अशी अत्यंत जाज्वल्य पाहिजे. अशी जाज्वल्य मनोवृत्ति ही प्रयत्नसाध्य नाही. श्रेष्ठ विद्या,मोठा प्रवास, गाढ सहानुभूती, तीव्र निरीक्षण इत्यादी कादंबरीकारांचे गुण प्रयत्नाने मिळवता येतील पण जिच्या अभावी हे सारे गुण असून नसल्यात जमा आहेत, ती जाज्वल्य मनोवृत्ति मूळचीच असली पाहिजे. ते देणे ईश्वराचे. ती माणसांच्या किंवा माणसांच्या मंडळाच्या बक्षिसांनी निर्माण होणे शक्य नाही. उत्तेजक मंडळाच्या बक्षिसांनी रद्दड कविता, रद्दड कादं-बऱ्या, रद्दड नाटके, रद्दड चरित्रे अशी सर्व रद्दड ग्रंथप्रजा निर्माण होईल. बक्षिसांनी प्रासादिक ग्रंथ निर्माण होते तर, बाळाजी बाजी-रावाने म्हटल्याप्रमाणे चुटक्यांनी पोरेही झाली असती !' राजवाडे यांच्या या निबंधात त्यांच्या गंभीर चिंतनशीलतेला असलेली ललित्या-ची बाजू जशी दिसते, त्याचप्रमाणे पौर्वात्य व पाश्चात्य, स्पॅनिश, इंग्रजी, फ्रेंच, रशियन कादंबऱ्यांचे त्यांचे चकित करणारे डोळस आणि व्यापक वाचनही दिसते. डेक्कन कॉलेजच्या 'पुस्तकालयाकडे मी एक दिलाने वळलो' असे त्यांनी शिक्षणाबद्दलच्या 'स्वानुभवा' त म्हटले आहे, त्याचा अर्थ अशा वेळी चांगला समजतो.

विकार विचार प्रदर्शनाच्या साधनांची इतिहासपूर्व व इतिहा-सोत्तर उत्क्रांति या नावाचा राजवाडे यांचा इतिहासाच्या नानाविध साधनांचे विवेचन करणारा लेख आहे. राजवाडे यांचे इतिहास-संशोधन मुख्यतः कागदपत्रांच्याच संबंधात झाले पण एकंदर संशोधनाच्या दृष्टीने या साधनांची अपूर्णता त्यांच्या लक्षात

आलेली होतो. या लेखाच्या शेवटी, ते म्हणतात. 'पाच-चारशे वर्षे सोडली म्हणजे कागदपत्रांचे साहाय्य बंद होते. फक्त ग्रंथ राहतात. त्यांना पुष्टि मूर्ति,चित्रे, स्थापत्य याची द्यावी लागते. या विचाराने राजवाडे यांनी कऱ्हाड, देवरूख, मसूर, निंबगाव, शेंदुर्णी, मंगळवेढा, पाटणा, तंजावर येथील काही शिलालेखांचा संग्रह केला होता व तंजावरचा बृहदीश्वर देवालयातील शिलालेख, चाळिसगाव जवळील पाटणा येथील देवीच्या देवालयातील शिलालेख, पंढरपूरच्या श्री विठ्ठलाच्या देवळांतील 'चौऱ्यांशीच्या शिळे' वरील शिलालेख अशा काही शिलालेखांवर लेखही लिहिले.

पण या सर्वांपेक्षाही त्यांचे चित्त, भाषा, व्याकरण, नामादि शब्द व्यक्तिनामे आणि ग्रामनामे यांनी वेधून घेतले. कारण पत्रे व शिलालेख इत्यादींच्या पेक्षा ह्या साधनांची व्याप्ति आणि पल्ला फार दूरचा होता. ह्याच्या सहाय्याने, शब्द अंधाराने भरलेल्या अज्ञात भूतकाळाचा भेद करण्याचा आणि तो उजळण्याचा त्याचा प्रयत्न होता. महाराष्ट्राचा प्राचीन इतिहास, ग्रामनामाच्याच अभ्यासाने कसा काढता येईल हे दाखविण्यासाठी इतिहास व भाषाशास्त्र अशी संयोजक लेखकाला त्यांनी 'इतिहास व ऐतिहासिक' ह्या मासिकात प्रसिद्ध केली. महाराष्ट्राचा वसाहतकाल हा या संदर्भातील त्यांचा निबंध प्रसिद्धच आहे. कुलविषयक इतिहास तयार करण्यासाठी, नाशिकच्या तीर्थोपाध्यायांच्या वह्या तपासून आडनावे जमा करण्याचा उद्योग त्यांनी सुरू केला होता. असे सांगतात की अमळनेरला असताना बाहेर ओटचावर बसून येणाऱ्या जाणाऱ्याचे आडनाव, गोत्र वगैरे ते टिपून घेत. अशी सुमारे २००० नावे त्यांनी गोळा केली, या मिळालेल्या माहितीचा उपयोग त्यांनी 'महाराष्ट्राचा-वसाहतकाल' या निबंधात केलेला आहे. पण हा केवळ प्रारंभ होता. व्यक्तिनामे व ग्रामनामे यांच्या अभ्यासाने त्यांना आर्य लोकांच्या विजयाचा एक मोठा ग्रंथ लिहायचा होता. त्या ग्रंथाची त्यांनी रूपरेखाही आखली होती. ती अशी १) क्षेत्रातील पंड्यांच्या वह्यांवरून अखिल हिंदुस्थानातील आर्यांची आडनावे संगतवार लिहून काढणे व त्यांचे सामा-

जिक वर्गीकरण फार काळजीपूर्वक करणे. २) नंतर हिंदुस्थानातील व बाहेरच्या देशातील गावांची नावे पाहून त्या आडनावांचा व त्या स्थानांचा संबंध ऐतिहासिक व सामाजिक दृष्टीने निश्चित करणे. ३) शक्य तितक्या अधिक गावांचे अति प्राचीन नाव शोधून काढून आर्यांच्या हालचालीच्या दृष्टीने त्याचे महत्त्व निश्चित करणे. ४) या व अशा अनेक महत्त्वाच्या मुद्यांचे संगतीकरण करून आर्यांच्या एकंदर क्रांतीचे व विजयाचे स्वरूप दाखवणे. पण हा ग्रंथ काही पूर्ण होऊ शकला नाही.

परंतु व्यक्तिनामे काय किंवा ग्रामनामे काय, कितीही झाली तरी नामे होत. इतिहासावर प्रकाश टाकण्याच्या कामी नामादि शब्दांपेक्षाही सामर्थ्यशील साधन म्हणजे त्यांचे मूळ रूप असलेले भाषेतील धातू होत. दामले यांच्या व्याकरणात मराठीचा धातुपाठ नाही ही राजवाडे यांच्या दृष्टीने मोठीच उणीव होती. प्रायः भाषेत असा शब्द नाही की जो सीमान्त अशा कोणत्या तरी धातूला नेऊन भिडवता येत नाही. भाषेच्या सीमान्त धातूचे संशोधन व संकलन अत्यंत उपयोगाचे आहे. माझा असा अंदाज आहे की, संशोधन व पृथक्करण करून मराठी भाषेचा धातुपाठ रचिला असता पूर्ववैदिक व वैदिक भाषांवर पराकाष्ठेचा प्रकाश पडेल, (आणि) महाराष्ट्र, संस्कृत, वैदिक, पूर्ववैदिक, ग्रीक, ल्याटिन, लिथूएनियन वगैरे भाषांतील धातुपाठाशी त्याची तुलना करण्याचे एक अजस्र साधन तयार होईल व तद्योगे करून मराठीच्या पूर्वपरंपरेवर प्रकाश पडेल.' असा मराठी भाषेचा धातुपाठ रचण्याच्या प्रयत्नात राजवाडे होते आणि त्यांनी जवळ जवळ तीस हजार धातूंची प्रकिया उलगडण्याचा प्रयत्न केला होता. या 'धातुकोशा'ला पाचशे पृष्ठांची प्रस्तावना लिहिण्याचा त्यांचा संकल्प होता. त्यांचे ते अपुरे काम कृ. पां. कुलकर्णी यांनी पुरे केले. त्या धातुकोशात लिहिलेल्या प्रस्तावनेत कुलकर्णी यांनी राजवाडे यांच्या या धातुपाठाचे महत्त्व वर्णन केले आहे. ज्या भाषेत धातु अधिक त्या भाषेत क्रिया अधिक, ज्या राष्ट्रात क्रिया अधिक, त्या राष्ट्राचा व्याप अधिक, त्याच्या हालचाली अधिक, तितके चैतन्य

अधिक. एखादा समाज सुधारणेच्या कोणत्या अवस्थेत आहे हे पाहा-ण्याचे झाले तर त्या समाजाची भाषा पाहावी. त्यातही पुनः तिचा शब्दसमूह पाहावा त्यातही तिचा धातुपाठ पाहावा. राजवाडे यांनी एकनाथपूर्वकालीन ज्ञानेश्वरी प्रसिद्ध केली, तिच्या आधारे ज्ञानेश्व-रीचे ऐतिहासिक व तौलनिक व्याकरण लिहिले, आणि संस्कृत भाषे-चा उलगडा केला, त्यातही व्याकरणादी शुष्क घटपटादि खटपट नसून भाषेच्या अवस्थेवरून समाजाची अवस्था शोधू पाहणारी ऐति-हासिक संशोधनबुद्धीच दिसून येते. ज्याप्रमाणे साहित्यात 'कादंबरी' त्याप्रमाणे व्याकरणाच्या ऐतिहासिक विचाराच्या बाबतीत पाणिनि-कालनिर्णय हा राजवाडे यांचा अत्यंत नामांकित निबध होय. या निबंधात 'कम्बोजाल्लुक' या सूत्रात पाणिनीने फक्त कंबोजाचाच निर्देश केलेला आहे आणि 'यवन' शब्दाचे स्त्रीलिंग 'यवनानी' होते एवढी एकच बाब त्याला माहीत होती. या दोन आधारांवरून व इतर प्रमाणांच्या साहाय्याने राजवाडे यांनी सिद्धांत केला आहे की बी. सी ९०० च्या पूर्वी व बी. सी. १२०० च्या नंतर पाणिनी केव्हातरी झाला. व्याकरणाचे महत्त्व, इतिहास, मानववंशशास्त्र व समाज-शास्त्र यांच्या दृष्टीने राजवाडे यांना अशा प्रकारे अपरंपार वाटे व त्यामुळे व्याकरणाचा उपयोग काय असा बालिश प्रश्न विचारला म्हणजे त्यांना चीड येई. ते म्हणतात, 'व्याकरणशास्त्रावाचून सध्या काय अडले आहे, असा बालिश प्रश्न जे कोणी विचारतात त्यांना उत्तर एवढेच की, हर एक शास्त्रावाचून तर ह्या देशाचे सर्वत्र नडत आहे. जितके रसायनशास्त्रावाचून नडत आहे, जितके राज्यशास्त्रा-वाचून नडत आहे, जितके युद्धशास्त्रावाचून नडत आहे तितकेच व्याकरणशास्त्रावाचूनही नडत आहे. ज्युलियस कैझर हा योद्धा मोहि-मेवर असताही लॅटिन भाषेच्या व्युत्पत्तीवर व व्याकरणावर शास्त्रीय टिपणे मोठ्या काळजीने लिहून ठेवी. व्याकरणशास्त्र हे मानवी व्यव-हाराला फार उपकारक आहे. तदभावी केव्हा केव्हा मोठा अनर्थ गुदरतो व राजकीय उलाढाली करणाऱ्यांच्या प्राणावर येऊन बेतते. यास दृष्टान्त अनुभवावरून व इतिहासावरून शेकडो देता येतील.

परंतु परप्रत्ययनेय बुद्धीचे आमच्या इकडील खर्डेघाशे, त्यांच्या समाधानार्थ त्यांना मान्य अशा एका आधुनिक इंग्लिश मुत्सद्याचे व्याकरण व वैयाकारण या संबंधाचे मत सांगतो. हाल्डेन नावाच्या एका पुढारी इंग्लिश मुत्सद्याने द डिटेक्टेड लाईफ नावाच्या एका निबंधात व्युत्पत्ती व वैयाकरण यांच्या अभ्यासात गर्क झालेल्या परंतु चवढाळ अशा मूर्ख लोकांच्या अवहेलनेस पात्र झालेल्या एका वैयाकरणाचा दाखला देऊन आपल्या इंग्लिश श्रोतृ वर्गाला असा उपदेश केला आहे की ! बाबांनो, या वैयाकरणाप्रमाणे कशाचीही पर्वा न करिता एकनिष्ठेने हाती घेतलेले महत्कृत्य करीत राहा, सुज्ञांनी या वर दिलेल्या गोष्टीचे मनन करावे.'

ज्याला आपण पुराणकथा म्हणतो आणि अनेक वेळा ज्यांची भाकडकथा म्हणून संभावना होते, त्या वस्तुतः सत्यकथाच असतात. एवढेच की त्यात सत्याचे आणि कल्पिताचे, व संकेताचे बेसुमार मिश्रण झालेले असते. खाणीतून सोने काढताना ज्याप्रमाणे खंडोगणती माती बाजूला काढावी म्हणजे मग तिच्यात लपलेले सोन्याचे कण सापडतात. त्याप्रमाणे पुराणकथातले कल्पित काढून टाकले म्हणजे त्यात असलेले वास्तव प्रतीत होते. पुराणकथांकडे पाहण्याची ही राजवाड्याची ऐतिहासिक दृष्टी आमची पुराणे व असीरियातील शोध या लेखात उत्तम प्रतिबिंबित झालेली आहे, 'विष्णुपुराण' व इतर पुराणे व महाभारत यात पृथ्वीतील जंबुद्वीप, लक्षद्वीप, साज्मल द्वीप, कुशद्वीप, क्रौंचद्वीप, शाकद्वीप, व पुष्कल द्वीप या सप्तद्वीपांचे वर्णन आहे, मंद, मंद, शंक असुर, सुमेश पर्सृ, पन्हव पारसीक इत्यादी लोकांचेही वर्णन आहे. अलीकडे असीरिया देशात अति प्राचीन काळाचे जे लेख सापडले आहेत, त्यावरून पुराणातील ही सर्व माहिती वास्तव आणि साधार असल्याचे राजवाडे यांनी दाखवून दिले आहे, तात्पर्य पुराणे व इतिहास ह्यांच्यात जो प्राचीन व वास्तव इतिहास आहे, त्याच्यावरील गचाळपणाची मलिन व खुळचट पटले काढून टाकून आधुनिक शोधाच्या साहाय्याने तो नीट तपासून घेतला पाहिजे, राजवाड्यांची हीच दृष्टी सप्तशती या त्यांच्या लेखात दिसते. भवानीला

महिषासुर मर्दिनी म्हणतात व तिने कोल, महिष, मुंड व चंड, असुर, दैत्य इत्यादी तेरा जणांना ठार मारले असे सप्तशतीत वर्णन आहे. ही लोकांची नावे आहेत, आणि काल्पनिक नसून वास्तविक आहेत. वसाहती करीत असताना आर्यांना हे अनार्य लोक भेटले. 'सप्तशती' ची रचना आर्य व अनार्य यांच्या संघर्षाच्या वेळी झाली, म्हणून 'सप्तशती ' त्या संघर्षयुगाचे स्मारकच म्हटले पाहिजे. ह्या तेरा लोकांची ऐतिहासिक प्रमाणसिद्ध माहिती राजवाडे यांनी दिली आहे. व म्हटले आहे, 'लोकव्यवहारात इंद्र, वरुण, नासत्य इत्यादी पुराणतम दैवते बहुतेक विस्मृतिपथास गेली. परंतु वसाहतकाली अनार्यांशी झगडण्यात साहाय्य करणाऱ्या भवानीची स्मृति अद्यापही महाराष्ट्रात पहिल्याप्रमाणेच ताजी व गाढ आहे. या एका गोष्टीवरून अनार्यांशी पहिले झगडे किती भयंकर व प्रचंड झाले असले पाहिजेत त्याचे मापन करता येते. '

आपपरभावापासून अलिप्त राहून ऐतिहासिक सत्याचे संशोधन करणारी बुद्धी ही अग्नीसारखी असते. जोपर्यंन्त ती दूर असते व अनुकूल असते तोपर्यंत तुम्हाला सुखावह असते, पण जर का ती जवळ अंगाशी आली व प्रतिकूल झाली तर पूर्वी जी हवी होती तीच आता नकोशी वाटते व तिचे चटके बसू लागतात. या ऐतिहासिक दृष्टीचे विवेचन करताना गिबनने म्हटले आहे की, एव्हँजेलिस्ट पंथांची जी धर्माज्ञा तीच जवळ जवळ ऐतिहासिक दृष्टीचीही आहे– की, मित्रा, देश, धर्म हे विसरावे, गुणांचा योग्य गौरव करावा व सत्य जेथे जेथे असेल तेथे तेथे त्याचा स्वीकार करावा. हे बोलायला फार सोपे आहे, पण करायला फार अवघड आहे. प्रत्यक्ष व्यवहारात, ते म्हणजे एक प्रकारचे असिधाराव्रत आहे, आणि 'विकारहेतौ सति विक्रियन्तेशेपा न चेतासि त एव धीरा: ' या न्यायाने सारे जण प्रतिकूल झाले असतानाच संशोधकाच्या सत्त्वाची व सच्चेपणाची परीक्षा होत असते. राजवाड्यांचे असेच झाले. जोपर्यंत आपली पुराणे खरी आहेत व सप्तशतीत इतिहास आहे असे राजवाडे सांगत होते तोपर्यंत त्यांचे कौतुक झाले. पण जेव्हा का त्यांच्या संशोधनांतून नको अस-

लेल्या गोष्टी निष्पन्न होऊ लागल्या, तेव्हा पूर्वी ज्यांनी त्यांची वाहवा केली, तेच त्यांना खाऊ का गिळू करू लागले.

शके १८३८ च्या भा. इ. सं. मंडळाच्या वार्षिक संमेलनात राजवाडे यांनी 'हिंदु समाजात हिंद्वेतरांचा प्रवेश' नावाचा निबंध वाचला. त्या निबंधांत हिंदु, युरोपियन व मुसलमान या समाजांच्या बाह्यांचा स्वसमाजात समावेश करण्याच्या रीतींची त्यांनी तुलना केली. त्यात हिंदु समाजाची जातीसंस्था शाप नसून वरदान आहे असे सांगितले, कारण, आपत्काली स्वसमाजसंरक्षण, व संपत्काली परसमाजसंरक्षण अशी दोन कार्ये जातीसंस्था साधते. येथपर्यंत सारे ठीक होते. कारण सारा मामला कौतुकाचाच होता. पण याच निबंधात 'वाटेल त्या संस्कृतीच्या माणसांचा स्वसमाजात समावेश केल्यामुळे, मुसलमान समाज मानवहित साधण्याच्या व स्वसमाजहित साधण्याच्या कार्यात अगदी दुर्बल म्हणून प्रख्यात पावलेला आहे. सध्या तर मुसलमान समाज इतक्या नीचतर पदवीस पोहोचलेला आहे की, इतर सुधारलेल्या शास्त्रसंपन्न व शुचिर्भूत देशांची गुलामगिरी करण्यापलीकडे येणाऱ्या हजार–बाराशे वर्षांत त्याला गत्यंतर नाही.' अशी विधाने मुसलमान समाजाबद्दल केल्यामुळे, मुसलमानांच्या भावना दुखावल्या गेल्या, त्यांनी मंडळाकडे तक्रार केली व राजवाड्यांवर फौजदारी फिर्याद करण्याचाही त्यांनी विचार केला.

१९१६ च्या मंडळाच्या संमेलनात 'गागाभट्टकृत शिवराजप्रशस्ती व कायस्थ धर्मदीप' हा निबंध राजवाड्यांनी वाचला. त्या निबंधाने कायस्थ प्रभु समाजात खळबळ उडून गेली. त्या समाजात काहींनी, हा निबंध सभेत कसा वाचू दिला? म्हणून मंडळाच्या अधिकाऱ्यास जाब विचारला. काही जणांनी राजवाड्यांवर फिर्याद करण्याचा विचार केला. दहा–बारा महिन्यांनी राजवाड्यांना उत्तर म्हणून गुप्ते नावाच्या गृहस्थांनी एक पुस्तक छापून प्रसिद्ध केले व ते राजवाड्यांकडे पाठविले. ते पुस्तक राजवाडे यांनी भटांना दाखवले आणि म्हणाले, 'या पुस्तकाच्या प्रत्येक पानावर मला एक शिवी

आहे. मी या निबंधात असे काय लिहिले आहे की, त्यामुळे या गृहस्थाने मला शिव्या द्याव्या ?' पण हे काहीच नव्हे असा गदारोळ राजवाडे यांच्या 'भारतीय विवाहसंस्थेचा इतिहास' या लेखमालेने झाला. त्या प्रबंधात राजवाडे यांनी असे दाखविले होते की, आपले पूर्वज हे आपल्यासारखेच होते. ते काही अपूर्व कोटीतील अतिमानव नव्हते. त्यांच्यात अनेक आर्ष चाली प्रचलित होत्या, आणि त्या प्राचीन कालापासून आजपर्यंतच्या आपल्या विवाहसंस्थेचा इतिहास म्हणजे स्वैराचारापासून संयमापर्यंत मानवाने केलेल्या प्रवासाचा आलेख आहे. राजवाडे काही आपल्या पदरचे बोलत नव्हते. त्यांनी आपली विधाने सिद्ध करण्यासाठी महभारत, तैत्तीरीय संहिता, कृष्णयजुर्वेद-संहिता, शुक्लयजुर्वेदसंहिता यांचे मूळातून आधार दिले होते. पण त्याचा काही उपयोग झाला नाही. वासुकाका जोशी यांच्या 'चित्र-मयजगत' मध्ये या लेखमालेतील पहिला लेख प्रसिद्ध झाल्यावर अनेक वाचकांनी कळविले की, असे लेख प्रसिद्ध झाल्यास आम्ही मासिक बंद करू. तेव्हा वासुकाकांनी पुढील लेख छापण्याचे नाकारले. भारताचार्य चिंतामणराव वैद्य जे राजवाड्यांचे कौतुक करीत, तेसुद्धा या लेखांनी रागावले. पुढे कोठल्याही मासिकात ते लेख प्रसिद्ध न झाल्यामुळे राजवाड्यांजवळ पडून होते. पुढे एकदा असे झाले की, अंमळनेरच्या इतिहास मंडळात राजवाड्यांनी ते लेख वाचले. हे मंडळ अंमळनेरच्या भागवतांनी राजवाड्यांच्या प्रेरणेने काढले होते व त्याला अंमळनेरच्या श्रीमंत प्रतापशेट यांचा उदार आश्रय होता. राजवाड्यांनी हे निबंध वाचले मात्र, सभेत बाँबस्फोट व्हावा तसा गोंधळ उडाला. प्रतापशेट हे सनातन धर्माचे अभिमानी व श्रद्धाळू. त्यांना राजवड्यांचे हे पाखंड बिलकूल पसंत पडले नाही. त्यांची व राजवाडे यांची खडाजंगी जुंपली. राजवाडेही बोलायला काही कमी नव्हते. बोलता-बोलता ते शेटजींच्या जातीवर घसरले. त्याबरोबर प्रतापशेटनी मंडळाचा संबंध तोडून टाकला, त्यांचा आश्रय सुटल्यावर मंडळ तर बंद पडलेच, पण विशेष हे की, राजवाडे मेल्यानंतरही राजवाड्यांवरचा राग शेटजींच्या मनातून काही गेला नाही. हे सारे

पाहिल्यानंतर सत्याचा मार्ग बोलायला सोपा, पण चालायला कठीण असे मिल्टनने म्हटले आहे, त्याची सत्यता पटल्याशिवाय रहात नाही !

कागदपत्रांचे संशोधन करणारे इतिहास संशोधक महाराष्ट्रात व हिंदुस्थानात पूर्वी झाले आहेत व पुढेही होतील. शिलालेख आणि पुराणेतिहास यांच्या संशोधनात पंडित असलेले मिराशींसारखे पुराणेतिहासतज्ज्ञही आहेत. भाषाशास्त्रात कालेलकरांसारखे तज्ज्ञ आहेत. शब्द आणि उत्पत्ती यांच्या बाबतीत शब्दकोश व व्युत्पत्तिकोश रचणारे दाते–कर्वे आणि कुलकर्णी आहेतच; परंतु पत्रे, शिलालेख, भाषा, व्याकरण, व्युत्पत्ति या विविध शाखांचे अध्ययन मराठ्यांच्या व हिंदुस्थानच्या इतिहासाचा शोध घेण्याच्या दृष्टीने करणारा, आणि त्याचप्रमाणे हेगेल, कॉंप्ट इत्यादी पाश्चात्य इतिहास तत्त्ववेत्त्यांची विज्ञाननिष्ठ आणि जीवनव्यापी इतिहास–कल्पना मराठ्यांच्या व हिंदुस्थानच्या इतिहासाला लागू करून इतिहासाचे स्वतंत्र तत्त्वज्ञान निर्माण करणारा, इतकेच नव्हे; तर त्याचा सद्यःस्थितीशी संदर्भ साधणारा इतिहासकार राजवाड्यांच्याखेरीज अन्य कोणी झालेला नाही. या दृष्टीने त्यांचे स्थान एकमेवाद्वितीय आहे आणि 'इतिहासाचार्य' या पदवीवरही त्यांचा एकट्यांचाच हक्क पोचतो. कालिदासाच्या 'रघुवंशा'त इंद्र रघूला सांगतो की, 'ज्याप्रमाणे पुरुषोत्तम असलेला हरि एकच आहे, महेश्वर असलेला त्र्यम्बक हा एक, दुसरा नव्हे, त्याप्रमाणे शंभर यज्ञ करणारा शतक्रतु मी एकटा आहे. आमची पदवी दुसऱ्याच्या बाबतीत वापरता येण्यासारखी नाही. 'द्वितीयगामी न हि शब्द एषः न,' 'इतिहासाचार्य' म्हणून राजवाड्यांचा विचार करताना हेच शब्द वापरावे लागतील, की, 'द्वितीयगामी न हि शब्द एषः न।'

'काव्यं यशसेऽर्थकृते व्यवहारविदे शिवेतरक्षनये।' असे मम्मटाने काव्यांचे म्हणजे साहित्याचे प्रयोजन सांगितले आहे. राजवाडे यांच्या साहित्याचा विस्तार अफाट आहे. १८९३ पासून १९२६ पर्यंत ते

अखंड लेखन करीत होते. त्यांच्या मराठ्यांच्या इतिहासाची साधने' या एकवीस खंडांची पाने जवळ जवळ ५५५० आहेत. याखेरीज महिकावतीची बखर, राधामाधव विलास चंपू, संस्कृत भाषेचा उलगडा इत्यादि ग्रंथ व त्यांचे अनेक स्फुट लेख विचारात घेतले तर त्यांचा वाङ्मयप्रपंच सामान्यतः वीस हजार पृष्ठांपर्यंत जाण्यास हरकत नाही. पैशासाठी राजवाडे यांनी हे वाङ्मय लिहिले नाही, परंतु पैसा हे त्या वाङ्मयाचे आनुषंगिक फळ होतेच, त्या दृष्टीने राजवाड्यांना आपल्या साहित्याच्या प्रपंचातून या परमार्थाची कितपत प्राप्ती झाली हे पाहणे उद्बोधक ठरते.

१९०५ साली राजवाडे यांनी मराठ्यांच्या इतिहासाच्या साधनाचा सहावा खंड प्रसिद्ध केला, खंडाच्या प्रस्तावनेत गेल्या आठ वर्षांत साधने प्रसिद्ध करण्यासाठी व संशोधनार्थ प्रवास करण्यासाठी वेळेला खर्च व झालेली प्राप्ति यांचा हिशेब दिलेला आहे, ती या दृष्टीने पाहण्यासारखा आहे– ' दुसरा, तिसरा, पाचवा, सहावा व आठवा असे पाच खंड प्रो. विजापूरकर यांनी ग्रंथमालेतून स्वतःच्या खर्चाने छापून काढले. पैकी ग्रंथकाराच्या मेहनतीचा अल्पस्वल्प मोबदला म्हणून ग्रंथकार प्रत्येक खंडाच्या पन्नास प्रती मला देतात. त्या विकून शोधनाचा व प्रवासाचा खर्च मी मोठ्या काटकसरीने करतो. या पुस्तकविक्रीपासून आजपर्यंत सरासरी सहाशे प्राप्ति मला झालेली आहे. या अवधीत सुमारे पाचशे रुपये श्रीमंत बाबासाहेब इचलकरंजीकर, रा. रा. पांडोबा शिराळकर, (कऱ्हाड) व रा. रा. रावजी भिडे या तीन मंडळांनी आपखुशीने व उदारपणाने दिले. शिवाय दोघां तिघां स्नेह्यांकडून प्रवासाकरिता सहाशे रुपये मी कर्ज काढले. मिळून आजपर्यंत स्वतःच्या खर्चाने व लोकांच्या देणग्यांनी मी सुमारे छत्तीसशे रुपये या कामी खर्चिले आहेत. पैकी देणग्यांचे व पुस्तक विक्रीचे रुपये एकवीसशे वजा जाता सध्या मला पंधराशे रुपये कर्ज आहे...हे कर्ज पुढील खंडांच्या विक्रीने फेडावयाचे आहे. मी प्रवास खर्च व चरितार्थ बिनबोभाट कसा चालवतो हे पुष्कळ लोक मला विचारतात. त्यांच्या समाधानार्थ हा कटाळवाणा तपशील दिला आहे

माझे धनको माझ्यावर बहुत प्रेम करीत असल्यामुळे, त्यांच्या अड-चणीच्या प्रसंगीही त्यांनी मला फारशी कधी निकड लाविली नाही. परंतु, कर्ज आहे, ही कठोर बाब विसरता येत नाही...इतिहासाची साधने, सारस्वाची साधने व ऐतिहासिक टीका ह्या तीन रूपांनी पाच हजार रुपयांत चव्वेचाळीसशे पृष्ठे मजकूर शोधून व विवेचून मी प्रसिद्ध केला आहे. ह्या स्तुत्य उठाठेवीत पंधराशे रुपये कर्ज म्हणजे नुकसान झालेले आहे–' या प्रस्तावनेत चित्रशाळा छाप-खान्याचे मालक वासुदेवराव जोशी यांचे नऊशे रुपये कर्ज राज-वाड्यांना देणे होते असे राजवाड्यांनी म्हटले आहे. १९२० साला-नंतर राजवाडे यांनी 'राधामाधव विलास चंपू' व 'महिकावतीची बखर' हे दोन ग्रंथ नामांकित प्रस्तावनेसह चित्रशाळेमार्फत प्रसिद्ध केले. त्यावेळी भट यांनी राजवाड्यांना विचारले 'या ग्रंथाच्या उत्पन्नापैकी काही रक्कम जोशांनी तुम्हास दिली काय ?' तेव्हा राज-वाडे म्हणाले, 'मी काही एक रक्कम घेतली नाही. वासुदेवरावांच्या ऋणातून मुक्त होण्याकरिता हे दोन्ही ग्रंथ छापून प्रसिद्ध करण्याचे सर्व हक्क मी त्यांना दिले आहेत.' एवंच, राजवाडे यांचे वाङ्मय द्रव्यदृष्ट्या त्यांना बिलकूल फलदायी झाले नाही हे उघड आहे, ठाणे ग्रंथसंग्रहाच्या संमेलनात ते म्हणाले की, इंग्लंडातही कादंबऱ्या-शिवाय इतर ग्रंथ लिहिणारास अन्नाची मोताद आहे. अशांचे अन्न ब्रिटिश म्यूझियम असून तिच्या जोरावरच ते काम करतात–' राजवाडे यांचा हिंदुस्थानातला अनुभव यापेक्षा काही वेगळा नव्हता.

अशा स्थितीत राजवाडे यांचा चरितार्थ कसा चालत असेल हे म्हणजे एक मोठे कोडे होते. बरे, त्यांना याबाबतीत विचारण काही सोपे नव्हते. चरितार्थाचा प्रश्न वय किंवा पगार याच्याप्रमाणे एखाद्याला विचारणे हे तसे कठीणच असते. तथा राजवाडे यांना असा प्रश्न विचारणे म्हणजे मोठे धाडसच होते. त्यांचा स्वभाव तऱ्हेवाईक, कशाने ते संतापतील ते सांगणे कठीण, अशा प्रश्नाने ते वसकन अंगा-वर आले नाही म्हणजे मिळविली. पण डॉ. केतकर यांनी आपल्या निर्भीड स्वभावानुसार हे धाडस एकदा केले. त्यांनी त्यांना विचारले

'तुम्ही आपली उपजीविका इतके वर्षे कशी चालवली?' आणि आश्चर्य हे की, राजवाडे यांनी त्यांना सरळपणे उत्तरही दिले. 'पहिला व्हॉल्यूम प्रसिद्ध झाल्यानंतर मी गायकवाडांना भेटलो. तुम्ही ७५ रुपये महिना घ्या व बडोद्यालाच राहा, ही त्यांनी देऊ केलेली मदत मी नाकारली होती. मला काही हिस्टॉरियन बनावयाचे नव्हते. सयाजीरावांनी मदत केली ती ही, की, सयाजीरावांनी जे जे प्रसिद्ध करीन, त्याच्या संस्थानाने दीडशे प्रति घ्याव्यात, म्हणून मला एक सनदच करून दिली होती म्हणताना या दीडशे प्रतीत प्रत्येकी तीन चार रुपये लावून, मी चार पाचशे रुपये मिळवीत होतो.' पण राजवाड्यांचे उत्तर केतकरांना समाधानकारक वाटले नाही. ते म्हणतात, 'राजवाड्यांची उपजीविका केवळ पुस्तकांच्या दीडशे प्रतींवर होती असे दिसत नाही का की, त्यांचे काही रुपये बँकेत ज्या किंग कंपनीत होते ते त्या बँकेत बुडाले. त्या रुपयांचे त्यास व्याज येत होते व ते रुपये काही दिवस, त्यांच्या खर्चाचा काही भाग देण्यास उपयोगी पडत असावेत.'

पैशासाठी कोणापुढे याचना करणे आणि मिंधेपणा पत्करणे हे राजवाड्यांच्या रक्तातच नव्हते. त्यांचे गुण मोठे होते आणि त्या गुणांचा आदर करणारे गुणज्ञही होते. पण या गुणज्ञांच्याही हातून राजवाड्यांसाठी पैसा सुटत असे असे नव्हे. ते फक्त त्यांचा आपल्या कामासाठी उपयोग करून घेत. राजवाड्यांचे स्नेही म्हणविणाऱ्या एका लक्षाधीश गृहस्थांना महानुभावी वाङमयाचा नाद होता. ते ग्रंथ पाहण्यासाठी राजवाड्यांना त्यांनी एकदा आपल्या घरी बोलाविले, कारण महानुभावी सांकेतिक लिपीचे कोडे सतत तेरा दिवस एकाग्रतेने खटपट करून राजवाडे यांनी सोडविले होते, आणि 'आनंदाश्रम' व ह्या 'अनिर्वचनीय' म्हणून शास्त्री-पंडितांनी बाजूला ठेवलेल्या महानुभावाच्या 'लीलासंवाद' या ग्रंथाचा अर्थ लावला होता. आठ दहा दिवस त्या गृहस्थांकडे मुक्काम करून राजवाडे धुळ्यास परत आले व भट यांना म्हणाले-'माझी आर्थिक स्थिती कशा प्रकारची आहे हे ह्या गृहस्थास माहीत असूनही पत्राप्रमाणे तुम्ही आला, तरी

तुमच्या भाड्याचा हा खर्च घ्या असे सुद्धा मला हा गृहस्थ म्हणाला नाही व त्याने मला एक पै ही दिली नाही.' पण अशा नमुनेदार लोकांप्रमाणे राजवाडे यांच्या गुणावर, कार्यावर लुब्ध होऊन त्यांना निरपेक्षपणे मदत करणारे लोकही, थोडे असले, तरी होते. मिरजेचे श्रीमंत बाबासाहेब मिरजकर हे दरसाल सव्वाशे रुपये नियमित वेळी राजवाडे यांना देत असत. त्याबद्दल मिरजकर राजवाडे यांना म्हणाले-' दरसाल सव्वाशे रुपये तुम्हास द्यावयाचे असे माझ्या मनात आहे.' तेव्हा राजवाडे म्हणाले-' हे पैसे तुम्ही मला देता ते कशा-बद्दल देता ? त्याबद्दल मी तुम्हास एखादा खंड अर्पण करू ? यामध्ये आपली अपेक्षा काय ? त्यावर मिरजकर म्हणाले-' माझी काही एक इच्छा नाही. तुम्ही इतिहास संशोधन करीत आहात, तुम्हाला काही तरी मदत करावी ही माझी इच्छा आहे.' यावर राजवाडे म्हणाले, 'मी याबद्दल काय समजावे ?' मिरजकर म्हणाले, 'फार तर मी एक बरा माणूस आहे. या बाबतीत माझी कसलीही इच्छा या देण-गीत नाही.' बाबासाहेब मिरजकरांप्रमाणेच राजवाड्यांचे एक स्नेही १९१२ पासून १९२४ पर्यंत दरसाल तीनशे रुपये देत असत. १९२४ पासून जेव्हा औंधचे बाबासाहेब पंतप्रतिनिधी यांज-कडून राजवाड्यांनी त्यांना कागदपत्रे व पोथ्या विकत दिल्या त्याबद्दल दरसाल एक हजार रुपये मिळू लागले, तेव्हा ही मदत बंद झाली. राजवाड्यांचा सारा खर्च खाणे-पिणे, प्रवास, कपडालत्ता धरून वर्षाचा जास्तीत जास्त पाचशे रुपये असे. कऱ्हाडला ते दोन महिने एकदा राहिले होते. त्यावेळी पांडुअण्णा शिराळकर यांच्याजवळ वीस रुपये त्यांनी ठेवायला दिले व खर्चास लागेल तसे म्हणून घेतले. दोन महिन्याच्या अखेरीस त्यांनी आपली शिल्लक मागून घेतली. ती पाच रुपये भरली. म्हणजे दोन महिन्यात त्यांना फक्त पंधरा रुपये खर्च आला. वाईला असताना एक वर्षभर एक चिपटे तांदूळ घेऊन ते शिजवून खात. चिपटे तांदुळास त्यावेळी तीन पैसे पडत. त्यावेळी राजवाडे म्हणत-' मला तीन पैसे मिळाले म्हणजे जगात धडधाकट राहता येईल.'

राजवाड्यांचे जीवन म्हणजे एक अखंड संशोधन यात्रा होती, या प्रवासांत धुळे, सातारा, पुणे, कोल्हापूर, वाई, इस्लामपूर, कऱ्हाड वगैरे काही ठिकाणी त्यांची स्नेही मंडळी होती. त्यांच्यामार्फत एखादी जागा भाड्याने घेत व बाकी डाळ-तांदूळ इत्यादि सामान विकत आणत. या संसारात विंचवाप्रमाणे त्यांचे बिऱ्हाड त्यांच्या पाठीवरच असे. कोळशाची शेगडी ते बरोबर बाळगत. एकदा पुण्यास नंदगींकराकडे राजवाडे उतरले असताना खंडेराव मेहेंदळे त्यांना भेटण्यास गेले होते त्यांच्या दृष्टीस राजवाडे यांचे सामान पडले.

त्यात एका गाठोड्यात तवा, पितळी, दोन-तीन भांडी होती. दुसऱ्या गाठोड्यात पुस्तके, तिसऱ्यात एखाद दुसरी पांढरी घोंगडी व चौथे पोते कागदपत्रांचे होते, खेड्यापाड्यातून प्रवास करण्याचा त्यांना हरहमेश प्रसंग येई म्हणून या आवश्यक साहित्याशिवाय साबणाच्या वड्या, शाईच्या, पुड्या, कोऱ्या कागदांचे पुडके, कोरडी दौत, टाक, निफे असे साहित्य असे. कितीही जवळचा स्नेही असला तरी त्याच्याकडे एखाद्या दिवसापेक्षा जास्त दिवस राजवाडे राहत नसत. याबाबतीत ते अनुभवाने शहाणे झाले होते. वाईला असताना ते एका वकीलस्नेह्याच्या घरी राहत होते. वकीलसाहेबांची वागणूक राजवाड्यांशी आदराची असे. पण त्यामुळे वकिलीणबाईंची नथ हरवली तेव्हा त्यांचा आळ राजवाड्यावर आला. अखेर राज-वाड्यांबद्दल त्यांचे स्नेही अंताजीपंत जोशी यांनी वकिलांची खात्री करून दिली. पण ही गोष्ट घडल्यापासून राजवाड्यांनी धडा घेतला. आणि कुटुंबवत्सलाचे घर त्यांनी जवळ जवळ वर्ज्य केले याचे आण-खीही एक कारण होते, 'कोठच्याही घरी राजवाड्यांचे म्हणजे त्या घरातील मुलांशी दोन गोड शब्द बोलणे, वेळप्रसंगी त्यांना जवळ घेणे इत्यादी गोष्टी कराव्या लागतात. नाहीतर यजमनीणबाई नाराज होतात. माझा स्वभाव तुसडा आहे. मला या गोष्टी करणे साधत नाही. एकत्र ठिकाणी राहण्याचा प्रसंगच आला नाही म्हणजे ही गोष्ट करावी लागत नाही व नाराजी होण्याचा प्रसंग उद्‌भवत नाही.

सकाळी साडेअकरा बाराच्या सुमारास राजवाड्यांचे जेवण होई. जेवायला भात मुख्य पदार्थ असे. त्यांच्या जोडीला मेथी, आळू, चाकवत इत्यादी पालेभाज्या. त्या भाज्यात वांगी, काकडी, कारली इत्यादि भाज्यांच्या फोडी टाकून शिजवीत व त्यात तिखटमीठ घालून फोडणी न देता खात. भाताबरोबर कणकेचे गाकर भाजत, त्यात लोणकढे तूप बरेच घालीत. या गाकरांना ते पुरोडाश म्हणत. जेवताना भातावर दूध, तूप ओतीत व तळेगावला मावळयांकडून ते मध घेत तो मधही ओतीत व खात. दुधात भात शिजविला आणि त्यावर वाटी दीड वाटी मध ओतला म्हणजे अगदी उत्तम जेवण तयार होते, असे ते म्हणत. संध्याकाळी सकाळी केलेल्या पुरोडाशांपैकी दोन-तीन व काही भाजी व केळी ते खात. केळी व भुईमुगाचे दाणे, व द्राक्षे हे त्यांच्या विशेष आवडीचे पदार्थ होते. ते मिळाले म्हणजे किती खातील याचा नेम नसे. एकदा लिंबगागावी त्यांनी पाच-सहा रुपयांची द्राक्षे खरेदी केली व सगळा दिवस द्राक्षावर काढला. वाईला असताना एकदा त्यांनी दीडशे केळयांचा घड फस्त करण्याचा विक्रम केला होता, दूध ते कधीच घेत नसत. कारण स्वच्छ व पाणी न मिसळलेले दूध मिळणे कठीण आणि दुधात रोगजंतु निर्माण होण्याची शक्यता फार. प्रवासात तो कितीही दीर्घ असला तरी पाणीसुद्धा पीत नसत. मग स्टेशनवरचे पदार्थ घेणे दूरच. अशा प्रसंगी एखाद्या वैद्याकडून बरेच तूप घातलेले पौष्टिक लाडू ते तयार करून घेत व त्यावर वेळ भागवीत. एकदा ते इंदुरला असताना एका श्रीमंत गृहस्थाने खडीसाखर, काळ्या मनुका व बदामाच्या बिया असलेले तीन मोठमोठे पुडे भेट दिले. तेव्हा जवळ असलेल्या मोकाशींना राजवाडे म्हणाले—' दररोज उजाडताच अर्धा मूठ बदाम, दोन-चार खडीसाखरेचे तुकडे, व दहा-पंधरा काळ्या मनुका खात जा आणि आधी एक तास किंवा खाल्ल्यानंतर दोन तासांनी सपाटून जोर-बैठकांची मेहेनत कर, म्हणजे माझ्यासारखी दहा-बारा मैल चालण्याची व आठ-दहा तास अभ्यासाची यथास्थित ताकद राहील. जोपर्यंत माझ्या खिशात पाच-सात पैसे राहत आहेत, तोपर्यंत न चुकता हे दररोज मी खात असतो. हे जिन्नस

मी साठ्याला ठेवीत असतो.' राजवाडे यांना चहा, कॉफी केवळ विषवत होती, हे सांगण्याची अर्थात जरूर नाही. पण त्याचप्रमाणे दोन जेवणांच्यामध्ये काहीही न खाण्याचा नियम ते कडकपणाने पाळीत. त्याबाबतीत कोणाच्याही भिडेला ते बळी पडत नसत. त्यांची बायको मेल्यापासून पस्तीस वर्षे ' रांधा, वाढा, उष्टी काढा ' या त्रिविधता-पापासून ते अगदी पोळून निघाले होते, त्यामुळे एखाद्या वेळी ते वैतागून म्हणत–' चांगले अन्न मिळण्याकरिता एखाद्या बाईबरोबर लग्न केले पाहिजे !'

राजवाडे यांची दिनचर्या रेखीव आणि नियमबद्ध असे. 'ब्राह्मे मुहूर्ते बोद्धव्यम् !' या मनु वचनाप्रमाणे पहाटे पाच वाजता ते उठत. उठल्यानंतर दंतधावनासाठी टूथपेस्ट, टूथपावडर किंवा राखुंडी न वापरता बाभळीच्या काडीचे एक टोक दगडाने ठेचून ब्रशासारखे त्या काडीचे टोक करीत आणि त्याने पंधरा-वीस मिनिटे दात घाशीत. अर्धापाऊण तास याप्रमाणे मुखमार्जनादी विधी झाल्यानंतर ते आपल्या लेखनवाचनाच्या कामाला लागत. चहा, कॉफी, दूध काहीच घेण्याची त्यांना सवय नव्हती. त्यांची वाचनाची पद्धत काही निराळीच होती. दिवसभर एकसारखे ते वाचीत नसत. वाचन सकाळी एक तास व दुपारी एक, फार तर दोन तास चाले. पण बाकीचा सर्व वेळ ते मननात घालवीत. दुपारी दोन-तीन वाजता त्यांच्याकडे जावे तर पुस्तक बाजूला ठेवून ते मननात गढलेले असत. मध्ये दोन-तीन दिवस काही लिहीतही नसत व वाचीतही नसत. मनन करीत असत. शिराळकरांनी त्यांना एकदा थट्टेने म्हटले–' विसूभाऊ, आळसात किती दिवस घालविता ?' तेव्हा राजवाडे हसले व म्हणाले, ' माझे असेच चालायचे.' पण ज्या वेळी ते रिकामे दिसत. त्यावेळी त्यांचे मन विषयाच्या चिंतनात मग्न झालेले असे. आणि ते चिंतन किती सखोल आणि गहन असे, ते अप्रतिहत विचारांचा ओघ असलेल्या त्यांच्या लेखनावरून जसे दिसून येते त्याचप्रमाणे प्रत्यक्ष ते लिहीत त्यावरूनही दिसून येई. मांडी घालून, दहा–दहा बारा–बारा तास, बोरूने किंवा टाकाने ते बंदामागे बंद लिहून काढीत, राजवाड्यांचे चिंतन आणि लेखन यांचा

हा असा जन्मजनकसंबंध पाहिला म्हणजे, 'मी जेव्हा काही काम करीत नसतो, तेव्हाच काम करीत असतो' या राजवाडयांच्या मार्मिक उक्तीची आठवण होते. अशा त्यांच्या चिंतनसमाधीची व लेखन-समाधीची आठवण देणारे त्यांचे दोन निबंध म्हणजे कन्हाडास असताना लिहिलेला, 'हिंदुसमाजात हिंद्वेतरांचा समावेश' आणि धुळयास लिहिलेला 'महाराष्ट्राचा वसाहतकाल' हे होत.

राजवाडे मोडीत लिहीत आणि नंतर छापण्यासाठी कोणाकडून तरी त्यांचे बालबोधीत करून घेत. त्यांचे मोडी अक्षर 'वाटोळे सरळे मोकळे ओतले मसीचे काळे कुळकुळीत ओळी चालल्या ढाळे मुक्तामाळा जैशा ॥' याप्रमाणे रामदासाने वर्णिल्यासारखे मोत्यांच्या माळेसारखे होते. मराठीखेरीज त्यांनी दुसऱ्या भाषेत एक अक्षर लिहिले नाही. पत्रव्यवहार मराठीत किंवा क्वचित संस्कृतात करीत, पण इंग्रजीत नाही. इंग्रजीतून लेखन करणाऱ्या मराठी माणसाची त्यांना चीड येई. कॉलेजात असताना इंग्रजीत लिहिण्या-बोलण्याचे त्यांना व्यसन जडले होते. पण ते तेवढयापुरतेच. मराठी भाषेचे शिवाजी असलेल्या विष्णुशास्त्र्यांनी त्यांचे प्रबोधन केल्यानंतर मराठी भाषेशी जी अव्यभिचारी निष्ठा धरली, ती अखेरपर्यंत कायम होती. त्यांच्या या एकांतिक निष्ठेमुळे क्वचित प्रसंगी त्यांच्यापुढे मोठे धर्म-संकट उभे राही. एकदा किंकेड यांनी अलाहाबादच्या इंडियन रिव्ह्यू या मासिकात मराठयांची बदनामी करणारा लेख लिहिला. त्याला राजवाडयांनी 'राष्ट्रोदय' या पत्रात मराठीतून उत्तर दिले. पण तेवढयाने त्यांचे समाधान झाले नाही. त्यांनी केळकरांना पत्र लिहिले 'रा. किंकेड यांचा लेख अलाहाबाद रिव्ह्यूंत आला होता. त्यांचे खंडन मी राष्ट्रोदयात केले आहे. तरी ते इंग्रजीत 'अलाहाबाद रिव्ह्यू 'त झाल्याशिवाय योग्य गोष्ट होणार नाही, सर्व हिंदुस्थानभर आपल्या पूर्वजांची निंदा त्या गृहस्थाने केली आहे. ती खोटी आहे हे जगाच्या निदर्शनास आणणे हे आपले कर्तव्य आहे. मी स्वतः इंग्र-जीत लिहीत नाही, हे आपल्याला माहीत आहे. तेव्हा आपण हे काम करावे अशी माझी आपणाला आग्रहाची विनंती आहे. आपण भज-

पेक्षा इंग्रेजी चांगले लिहाल. तशात मी मुळी लिहीतच नाही. प्रतिज्ञाच आहे–'

सकाळी सहापासून साडेदहा वाजेपर्यंत लेखन-वाचनाचे हे काम चाले. साडेदहा वाजले म्हणजे राजवाडे आंघोळीस जात. राजवाड्यांची आंघोळ म्हणजे ते एक प्रकरणच असे. बादलीभर पाण्यानं काकस्नान करणे त्यांना मंजूर नसे. त्याचे स्नान किमान अर्धा तास चाले व पाच-सहा घागरी पाणी त्यांना लागे. आंघोळीच्या वेळी ते साबण वापरत. पण सुवासिक तेलाचा स्पर्श त्यांनी अंगाला कधी होऊ दिला नाही. आंघोळ बारा महिने थंड पाण्याने होई. एकदा कामशेतला सरदेसायांबरोबर ते इंद्रायणीवर स्नानास गेले. कमरेइतक्या पाण्यात अर्धातास उभे राहून त्यांनी आपले अंग चोळ-चोळून इतके लाल केले की वाटावे की त्यातून रक्तच सांडणार की काय ! सरदेसाई यांना ते म्हणाले, ' सरदेसाई, आंघोळ अशी केली पाहिजे बरं का ! ' आंघोळ झाल्यानंतर भात–भाजी–पुरोडाश वगैरे करून बाराच्या सुमारास जेवायला बसत. जेवण स्वस्थपणे चर्वण करीत चाले. त्यामुळं त्यांना जेवायला अर्धा तास लागे. जेवणानंतर अर्धा-पाऊण तास विश्रांती घेऊन पुन्हा कामास लागत ते चार वाजेपर्यंत.

चार वाजले म्हणजे राजवाडे फिरायला बाहेर पडत ते संध्याकाळी सहा-सात वाजण्याच्या सुमारास अंधार पडण्यापूर्वी परत येत. दिवसा-उजेडी फिरण्याचे कारण म्हणजे त्यांना सापाची भीती अतिशय वाटे. म्हणून ते हिरवळीवरून किंवा कुंपणाजवळून जाण्याचे टाळीत. पण तरीही सापाची भीती जेथे अधिक त्या शेताभातातल्या वाटांतून ते फिरत. राजरस्ते त्यांना वर्ज्य होते. कारण, ते, धुळीने भरलेले असत. ते म्हणत, जोपर्यंत आपल्याकडील म्युनिसिपालिटयांस रस्ते शिंपण्याची अक्कल आली नाही व आवश्यकता वाटत नाही, तोपर्यंत अशा धुळीच्या लोटाने भरलेल्या रस्त्यातून चालणे व नासिकारंध्रे भरून घेणे म्हणजे क्षयरोगाने मरण ओढवून घेण्याप्रमाणे आहे.' पावसाळ्यात फिरणे बंद असे. कधी कधी ते नमस्कारांचा व्यायाम घेत पण कायम व्यायाम म्हणजे फिरण्याचाच. फिरताना सापापासून इतकी काळजी

घेऊन व बरोबर सोटा असूनसुद्धा, 'मनी वसे ते स्वप्नी दिसे' या न्यायाने आपला पाय सापावर पडल्याचा त्यांना कधी कधी भास होई. आणि मग त्यांची फार त्रेधा उडे. धुळे येथे असताना एकदा पाझरा नदीवरून फिरून परत येत असता, असाच सापावर पाय पडल्याचा त्यांना भास झाला. त्यांच्या स्नेहयांनी त्यांची खूप समजूत घातली पण राजवाडे यांचे समाधान झाले नाही. अखेरीस, दोन दिवसांनंतर, जेव्हा त्या सर्पदंशाचा प्रकृतीवर काहीच परिणाम झाला नाही असे त्यांस दिसले, तेव्हा त्यांचे मन निश्चित झाले. फिरून परत आल्यानंतर ते थोडी विश्रांती घेत आणि दुपारच्या जेवणापैकी उरलेले पुरोडाश व केळी खात. रात्री लेखन-वाचन करीत नसत. कोणी समानशील स्नेही असले तर त्यांच्या बरोबर नाना तऱ्हेच्या विषयांवर मध्यरात्रीपर्यंत गप्पा मारीत. नाहीतर दहा वाजता गाढ झोपी जात. राजवाडे यांनी गादी म्हणून झोपण्याकरिता आयुष्यात कधी वापरली नाही. घोंगडी ते अंथरत आणि थंडीच्या दिवसात पांघरण्याकरिता एक जाड घोंगडी असे. भटांकडे राहत असताना, भटांनी त्यांना एक लाकडी पलंग दिला होता. त्यावर दोन फळ्या ते टाकीत व त्याच्यावर घोंगडी अंथरीत. उशीच्या ऐवजी वाचण्याकरिता आणलेली जाड जाड पुस्तके ते वापरीत. मच्छरदाणी कायम असे, कारण कोठेही गेले तरी ढेकूण व पिसवा यांचा उपद्रव ठरलेला असायचा. मसूर येथे ते मुंडल्यांबरोबर एकदा एका माडीत राहत होते. तेथे पिसवा अतोनात झाल्या होत्या. राजवाडे नुसती चटई अंथरून व लंगोटीवर आखूड पंचा लावून सर्वांगास करंजेल तेल माखून एक उपरणे पांघरून झोपत व दुसरेदिवशी स्नान करताना साबण लावून अंग स्वच्छ करीत. करंजेलाचा दर्प अतिशय उग्र. तेव्हा मुंडले यांनी त्यांना एकदा विचारले, 'हे तुम्ही सहन कसे करता ?' तेव्हा राजवाडे म्हणाले, 'दुसरे दिवशी दहा-वीस बादल्या पाणी मस्तकावर ओतले की डोके पूर्ववत् शांत होते !'

विद्येखेरीज राजवाड्यांना दुसरे व्यसन नव्हते. संगीत, गाणे, वाजवणे, नृत्य, नाटक इत्यादी ललितकलांची त्यांना आवड तर नव्ह-

तीच, उलट जालिम तिरस्कार होता. 'मडोघातील सुधारणा' या निबंधात त्यांनी संगीत, नृत्य या कलांबद्दल अत्यंत कडवट लिहिले आहे. मनोविनोदनासाठी सोंगट्या, गंजिफा, बुद्धिबळे असल्याही खेळांची त्यांना कधी जरूर वाटली नाही. बिडी आणि तंबाखूचे मात्र त्यांना व्यसन होते व ते कॉलेजपासून होते. कॉलेजात गप्पा मारताना पाच-पन्नास बिड्या ते फस्त करीत. कधी बिडीवर सपाटा चाले तर कधी तंबाखूचा अतिरेक होई. एकदा एका स्नेह्याने हजार-पंधराशे बिड्यांचा गठ्ठा दिला तेव्हा ते दररोज चाळीस पन्नास बिडया ओढीत. त्यांना विचारले तेव्हा म्हणाले, 'सध्या आहेत म्हणून मी ओढतो. मी विकत घेऊन काही ओढीत नाही.' पण बिडी किंवा तंबाखूपासून त्यांचे काम कधी अडले नाही. लिहिताना कधी तोंडात तंबाखू टाकून ते चघळायचे तर कधी चार-पाच बिडया एकदम शिलगावून पीत बसत व धुराच्या वलयांकडे पाहात चिंतनांत निमग्न होत.

'आकृतिविशेषेषु आदरः पद करोति' या कालीदासाच्या वचनाची आठवण या राजवाडे यांच्याकडे पाहिले म्हणजे झाल्याशिवाय राहत नसे. त्यांचा बांधा उंच आणि बळकट होता. उंची साडेपाच फूट होती. आणि कॉलेजात सक्त मेहनत केल्यामुळे आणि पुढेही ऐदी-पणाचा स्पर्श नसल्यामुळे त्यांचे शरीर म्हणजे केवळ लोखंडाची कांब होती. वर्ण गोरापान, कपाळ घुमटासारखे भव्य, नाक धरधरीत, हनुवटी लांब व निश्चय दाखवणारी, नेहमी दूर गेलेले स्वप्नाळू डोळे आणि उग्र चेहऱ्यावर प्रतिबिंबित झालेला निःस्पृह तुसडेपणा, नवशिका तर राहोच, पण परिचित माणूससुद्धा त्यांच्याशी बोलायला बिचके. त्यांचा सफेद रुमाल, एका गुंडीचा पांढरा सदरा, पुढचा सोगा सोडलेले आखूड धोतर, हातातील सोटा, पायातला जाड ब्राह्मणी तळेगावी जोडा, लांब आणि जोरात पडणारी पावले, आणि साऱ्या जगाला कस्पटासमान लेखणारी मुद्रा पाहिली म्हणजे 'दृष्टिस्तृणीकृतं जगत्त्रयसत्त्वसारा ! धीरोद्धता नमयतीव गतिर्धरित्रीम् !' या भवभूतीच्या ओळी साकार झाल्यासारख्या वाटत आणि समाजातले सामान्य लोक तर राहोच, पण पद, पदवी आणि प्रतिष्ठा असलेले

प्रतिष्ठितसुद्धा त्यांच्यापासून चार हातांवर राहिलेले बरे, अशा मतांचे होते.

राजवाड्यांची भेट झाली म्हणजे हा ग्रह पक्का होई आणि राजवाड्यांचे कर्तृत्व व किंमत जर माहिती नसेल तर हात दाखवून अवलक्षण केल्याप्रमाणे त्यांना भेटल्याचा पश्चात्ताप करायची वेळ येई. राजवाडे श्रीमंत नव्हते. पण ते भिकारी आणि दरिद्री नव्हते. ते निर्धन होते. पण ही निर्धनता, सतीचे वाण पतकरावे त्याप्रमाणे त्यांनी उघड्या डोळ्यांनी सुखेनैव पतकरली होती. ते त्यांना दूषण नसून भूषण होते. ते बुभुक्षिताचे दारिद्र्य नव्हते, तर 'अकिंचनः सम् प्रभवः ससंपदत्वम् !' असल्याचा महिमा गायिलेला आहे. त्या शंकराच्या प्रमाणे असलेले विरक्ताचे 'अकिंचनत्व' होते. तो ममत्वाचा संन्यास होता. म्हणूनच त्यांनी इतके लिहिले, पण 'कोणताही हक्क राखून ठेविलेला नाही' असे प्रत्येक पुस्तकावर लिहिण्यास चुकले नाहीत. 'श्रीशायजनतात्मने' म्हणून 'गीतारहस्य' समाजाला अर्पण करणाऱ्या टिळकांसारखे हे होते. इंग्रजीत बोलायचे म्हणजे सारा जन्म कवितेची उपासना करताना बुटांच्या लेसंसुद्धा त्या कवितेच्या जोरावर विकत घेऊ न शकणारा वर्डस्वर्थ किंवा उपाशीपोटी 'ब्रिटिश म्युझियम'मध्ये ज्ञानसाधना करणारा कार्ल मार्क्स यांच्याप्रमाणे राजवाड्यांचेही '**Honourable poverty**' 'गौरवास्पद दारिद्र्य होते. ते असे स्वतंत्र व स्वयंप्रकाश असल्यामुळे परकीय सरकारच्या नोकरीत मोठ्या पदाला पोचलेल्या बड्या सरकारी नोकरांचा त्यांना कधीच दबदबा वाटला नाही, उलट तिरस्कार मात्र वाटे. अशा लोकांना ते 'गुलाम' म्हणूनच म्हणत.

एकदा भट यांचेकडे त्यांचे एक मामलेदार स्नेही आले होते. त्यावेळी राजवाडे तेथे होते. भटांचे व त्या गृहस्थाचे बोलणे-चालणे चालले असता राजवाड्यांनी त्या गृहस्थास सवाल केला. 'तू कोण, कोठे असतोस ?' तो गृहस्थ म्हणाला, 'मी मामलेदार आहे.' तर मग तू गुलाम आहेस !' असे त्याला सुनावून त्यांनी तिरस्काराने विचारले, 'किती रुपड्या तुला मिळतात ?' त्या गृहस्थाला

राजवाडे हे काय प्रकरण आहे हे माहीत होते.त्यामुळे पुढील अनवस्था प्रसंग टळला.एकदा धुळ्यास राजवाडे हे त्यांचे कॉलेजातले सहाध्यायी मोरशास्त्री साठे याचे चिरंजीव नानासाहेब साठे यांनी बोलविल्या-वरून त्याच्याकडे गेले होते. साठे हे हुजूर डेप्युटी कलेक्टर होते. त्या प्रसंगी नातू फर्स्ट क्लास सबजज्ज, नानासाहेब चापेकर व हिरेमठ, डेप्युटी कलेक्टर यांच्याकडेही ते गेले. गप्पा चालू असता राजवाडे यांनी हिरेमठ यांच्याकडे बोट करून म्हटले, 'खानदेशसारख्या उष्ण प्रदेशात या साहेबी पोशाखाची जरूर काय ?' राजवाड्यांचे बोलणे ऐकून सारी मंडळी चूप बसली. थोडा वेळ गेला आणि राजवाड्यांनी चापेकरांना विचारले, 'अहो, हा बंगला कोणाचा?' चापेकर म्हणाले; 'येथील एका सावकारांचा आहे.' राजवाड्यांनी विचारले,' त्यास तुम्ही काही भाडे देता की फुकट राहता ?' चापेकर उत्तरले, 'येथे आम्ही फुकट राहातो. मालकास काही देत नाही.' ताबडतोब राज-वाड्यांनी त्यांना सुनावले.' तुम्ही हे गैर करता. तुमच्या कोर्टात या सावकारांचा दावा निकालाकरिता आल्यास तुम्ही त्यांचे मिंधे असल्या-मुळे तुमचे हातून त्यांच्या दाव्याचा निकाल निःस्पृहपणे होणार नाही. तरी तुम्ही बंगल्याचे भाडे देत जा. फुकट राहू नका.' राजवाड्यांबद्दल या लोकांना माहिती होती म्हणून रंगाचा बेरंग झाला नाही हे निराळे पण नेहमीच असे समंजस भेटत असे नाही.एकदा राजवाडे धुळे येथील गरुड वाचनालयात वाचायला गेले होते. त्यावेळी त्या लायब्ररीचे एक वृद्ध पेन्शनर सभासद मासिके व वर्तमानपत्रे ठेवण्याच्या टेबलावर दोन्ही पाय ठेवून वाचत बसलेले त्यांना दिसले. राजवाडे चिडले व त्यांनी त्या गृहस्थांचे दोन्ही पाय उचलून खाली ठेवले. तोही राज-वाड्यांसारखाच तामसी होता. परिणामी दोघेही वर्दळीवर आले आणि अस्तन्या सरसावून मारामारीला प्रवृत्त झाले. अखेर जवळची मंडळी मधे पडली आणि त्यांनी दोघांना आवरले.सरकारी नोकरीतल्या मामलेदार, कलेक्टर अशा लोकांशी राजवाडे यांची वागण्याची अशी फटकळ तऱ्हा होती तर जे कसेबसे त्या नोकरीत पोट भरीत होते अशा सामान्य लोकांबद्दल बोलण्याची सोयच नव्हती. त्यांना तर ते

'बिपेड' म्हणजे द्विपाद पशू 'च म्हणत असत. दिवसा सरकारची चाकरी करणाऱ्या अशा लोकांबद्दल ते म्हणत, 'दिवसा त्या राज्य-यंत्राचा कर्कश आवाज होऊ नये म्हणून लोक त्याला तेल घालतात व फुरसतीचे वेळी त्या राज्ययंत्राचा द्वेष करतात. अशाने काय निभाव लागणार ?' परंतु, राजवाड्यांच्या या तिरस्कारात वैयक्तिक द्वेषाचा कसलाही भाग नव्हता. त्यांना द्वेष वाटे तो त्या माणसाचा नसून त्याच्या परकीय सरकारच्या गुलामगिरीचा होय. त्यामुळे त्यांचा रोष हा 'रोषोऽपि निर्मलधिया रमणीय एव' अशा प्रकारचा उदात्त होता. हे ज्यांच्या लक्षात येई असे लोक, राजवाड्यांचे चारित्र्य,विद्वत्ता व स्वातंत्र्याची तळमळ लक्षात घेऊन,त्यांच्याबद्दल गैरसमज तर करून घेत नसतच, उलट त्यांच्याबद्दल पूर्ववत आदरच बाळगीत. १९१० सालच्या सुमारास पुण्यास मळेकरांच्या वाड्यात साहित्यसंमेलनास राजवाडे गेले होते. त्यावेळी नागपूरचे एक्स्ट्रा असिस्टंट कमिशनर साठे तेथे आले व त्यांनी राजवाड्यांना नमस्कार केला. राजवाड्यांनी त्यांना 'कसे काय आहे ?' म्हणून क्षेमकुशल विचारले. तेव्हा हजर-जबाबीपणाने साठे विनोदाने म्हणाले, 'आम्ही बोलून चालून गुलाम! आमचे काय असायचे !' राजवाड्यांना खूण बरोबर पटली आणि स्वारी हसली. आणि मग बाकीचेही लोक हसू लागले. सरकारी कृपेचे ह्या श्रीमंतांप्रमाणे इतर श्रीमंतांचीही राजवाड्यांना बिलकूल दर-कार नव्हती. एकदा मुंबईचे प्रसिद्ध इतिहासभक्त मावजीशेठ यांच्या निमंत्रणावरून राजवाडे त्यांना भेटण्यासाठी त्याच्या बंगल्यावर गेले होते. मावजीशेठ राजवाड्यांना आणण्यास गाडी पाठवणार होते पण गाडी वेळेवर आली नाही. तेव्हा राजवाडे संतापले व 'x x x वेळेची किंमत नाही' अशा शब्दात शेटजींचा उद्धार करून स्वतःच गाडी करून मुंडले यांच्याबरोबर मावजीकडे गेले. बंगल्याच्या कंपाउंडात गाडी शिरली त्याबरोबर मावजींचा मनुष्य सामोरा आला व गाडीच्या बाबतीत झालेल्या चुकीबद्दल क्षमा मागून त्याने राजवाडे व मुंडले गाडीतून उतरताच त्या माणसाने 'भाडे काय ठरले' असे कोच-

मनला विचारले. 'त्याने एक रुपया' असे उत्तर दिले. त्यांची प्रश्नोत्तरे संपतात तोच राजवाडे यांनी आपली चंची उघडली व तिच्यातून एक रुपया काढून तो मुंडले यांच्याजवळ दिला आणि त्यांनी तो गाडी-वानास दिला. दरवाजावर मावजी शेट स्वत: स्वागतास उभे होते. त्यांनी राजवाड्यांचा हात धरून दिवाणखान्यात नेले व खुर्चीवर बसवले. त्यांची मर्जी राखण्याची शेटजी पराकाष्ठा करीत होते. थोडा वेळ गेला आणि शेटजींनी मेवामिठाई व फळे यांचे मोठे थोरले ताट व दुधाचा पेला राजवाड्यांपुढे ठेवला व कपबशांऐवजी चांदीची भांडी वापरण्यास पुढे केली.पण राजवाड्यांनी त्यातील एकाही वस्तूस स्पर्श केला नाही. ते म्हणालें, 'दोन वेळ जेवणाखेरीज मी मध्यंतरी काही खात नाही.' शेटजींचा फारच हिरमोड झाला. मुंडलेही आग्रह करू लागले तेव्हा मोठ्या मिनतवारीने राजवाडे यांनी दुधाचे दोन–तीन घोट घेतल्यासारखे केले. नंतर इतर काही बोलणें होऊन भेट संपली व राजवाडे परत जाण्यास उठले. यावेळी शेटजींची गाडी दारापुढे तयार होती. मुंडले व राजवाडे गाडीत बसले, तो शेटजींच्या माणसाने पूर्वीच्या गाडीच्या भाड्याबद्दलचा एक रुपया मुंडले यांजकडे दिला. पण राजवाड्यांनी तो तात्काळ परत करण्यास सांगितले. तेव्हा मुंडले यांनी तो त्यास परत दिला. गाडी चालू झाली तेव्हा त्या माणसाने तो रुपया गाडीत टाकला. तेव्हा राजवाड्यांनी तो पुन्हा बाहेर फेकून दिला. इतक्यात गाडी वेगाने कंपाउंडच्या बाहेर गेली. यावेळी मात्र त्या माणसाने रुपया गाडीत फेकला नाही. रुपया फेकताना राजवाडे पुटपुटले. 'एक रुपयासाठी तरी त्याचा मिंधेपणा कशाला !' याचा अर्थ असा नव्हे, की मावजीशेटबद्दल त्यांचे मत वाईट झाले होते. उलट ते चांगलेच झाले होते. 'मुंडले यांना ते म्हणाले, 'बुद्धि बेताचीच पण श्रीमंत व सुखासीन असूनही विद्वद्व्यासंगाची हौस व इतिहासाची गोडी व त्याप्रीत्यर्थ पारसनीसासारख्यास जवळ करून पैशाची घस सोसण्याची तयारी ही कौतुकास्पद आहे.' तेव्हा मुंडले यांनी त्यांना विचारले, 'मग तुम्ही का त्यांचा उपयोग करून घेत नाही ?' त्यावर राजवाडे उत्तरले, 'माझ्यासारख्या नि:स्पृह

माणसास ते जमणार नाही. श्रीमंताकडून पैसा काढावयाचे म्हणजे त्यांची थोडीतरी खुशामत करावी लागते व मिंधेपणा पदरी घ्यावा लागतो. त्याने कार्याचा तेजस्वीपणा कमी होतो. माझे कार्य व पारस-निसांचे कार्य यातील फरक पाहिल्यास हे तुमच्या लक्षात येईल.'

इतिहास संशोधनास वाहून घेतलेल्या, भिक्षावृत्तीवर निर्वाह करणाऱ्या एका काल्पनिक कर्तबगार कामकऱ्याचे शब्दचित्र राजवाडे यांनी अकराव्या खंडाच्या प्रस्तावनेत रेखाटले आहे. त्यात ते म्हणतात, 'कर्तबगार कामकऱ्याची उदरनिर्वाहाची सोय येणेप्रमाणे लागल्यावर त्याने मनोनिग्रह व इंद्रियनिग्रह पराकाष्ठेचा केला पाहिजे. कनक व कांता या दोहोंचा मोह मोठा कठीण आहे. ॐ भव तिपक्षीय विद्वानाने स्वतःच्या चैनीकरता एक पैचाही संग्रह करिता कामा नये, आणि लहानापासून थोरापर्यंत सर्व स्त्रियांना मातुःश्रीप्रमाणे लेखिले पाहिजे. ह्या दोन मोहांपासून अलिप्त राहणे म्हणजे ब्रह्मचर्याचा निव्वळ ओनामा होय. तो साधल्याने चित्तवृत्ती अकलंक राहून ज्ञान-ज्योतीचे निर्लेप स्फुरण होईल, आणि वाटेल त्या व्यवसायात आणि शास्त्रात अपूर्व गती होण्याचा मार्ग खुला होईल.' राजवाडे यांचे हे विवेचन म्हणजे नेत्याने अनुयायांना केलेला उपदेश' या जातीचा उपदेश नसून, 'हे तो प्रचीतीचे बोलणे, आधी केले मग सांगितले' अशा योग्यतेचे प्रांजल आत्मनिवेदन आहे. पैशाचा मोह त्यांना नव्हता. आणि श्रीमन्ताच्या संगतीत वावरण्याची त्यांना आकांक्षा नव्हती. त्यांचे चारित्र्य स्फटिकाप्रमाणे निर्मळ होते आणि बायकोच्या निधनापासून अखेरपर्यंत त्यांच्या नीतिमत्तेबद्दल त्यांच्या शत्रूंनाही कधी संशय आला नाही, त्यांच्या समकालीनांमध्ये याबाबतीत त्यांची किंमत काय होती याचे एक उदाहरण सांगण्यासारखे आहे. वाईचे प्रसिद्ध भाऊशास्त्री लेले यांनी पन्नाशीच्या घरात आल्यावर पहिली बायको मेल्यामुळे दुसरे लग्न केले. त्यांच्यावर टीका झाली तेव्हा ते म्हणाले, 'मी काही राजवाडे नाही. मला स्त्री नसून चालावयाचे नाही.' कामिनी आणि कांचन यांच्याप्रमाणे राजवाडे यांनी मत्सर हा बलवत्तर [रिपू] पूर्णपणे जिंकला होता. मत्सराचे

प्राबल्य, बुद्धिजीवी लोकांत विशेष दिसते आणि ते फार प्राचीन काळापासून चालत आले असावे असे बोद्धारो मत्सरग्रस्त असे हजार वर्षांपूर्वी होऊन गेलेला भर्तृहरि म्हणतो त्यावरून वाटते. राजवाडे या बाबतीत अपवाद होते. त्यांच्या काळी रा. ब. साने, रा. ब. गणेश व्यंकटेश जोशी, पारसनीस, सरदेसाई, खरेशास्त्री आणि परप्रांतीयांपैकी जदुनाथ सरकार ही मंडळी इतिहासाच्या क्षेत्रात त्याची समव्यवसायी होती. साने आणि जोशी हे सरकारी नोकर होते आणि सरकारी नोकरांबद्दलची राजवाड्यांची घृणा आणि तुच्छताबुद्धि जगजाहीर होती. पण या दोघांच्या बाबतीत तिचा स्पर्श राजवाडे यांनी कधीही होऊ दिला नाही. उलट त्यांच्याशी ते आदराने वागत आणि त्यांनी स्थापन केलेल्या भारत इतिहास संशोधकमंडळात त्यांनी मानाचे पद भूषित केले होते. साने तर अध्यक्षच होते. पण फार पूर्वी राजवाडे कॉलेजात असताना सान्यांच्या काव्येतिहाससंग्रहाने 'अथस्य तत्त्वे बु कृते ऽ वभासे, संमुन्निर्मलेव चिरायु चक्षु:' या भारतीच्या वचनाप्रमाणे राजवाड्यांना स्वदेश म्हणून काही आहे हे प्रबोधन केले व इंग्रजीच्या अज्ञान समोहापासून मुक्त केले, या राजवाड्यांच्या सांस्कृतिक पुनर्जन्माबद्दल, साने यांच्याबद्दल कृतज्ञतेची भावना त्यांच्या मनात होती. तीच गोष्ट ग. व्यं. जोशी, यांच्याबद्दल. त्यांच्याबद्दल राजवाडे म्हणतात, 'खरे म्हटले असता रा. नीलकंठराव कीर्तने किंवा रा. साने किंवा या दोघांपेक्षा रा. गणेश व्यंकटेश जोशी यांच्यासारखा एखादा महाराष्ट्रेतिहासपारंगत गृहस्थ डेक्कन कॉलेजात इतिहास व अर्थशास्त्र शिकवावयास त्यावेळी पाहिजे होता. परंतु असल्या महाराष्ट्रेतिहास तज्ज्ञांची स्थापना खालच्या प्रतीच्या इंग्रजी शाळांतील पाचव्या-सातव्या यत्तातील पोरांना इंग्रजी शब्द शिकविण्याच्या वर्गावर सरकार करते आणि नोकर तयार करणाऱ्या कॉलेजात हिंदुस्थानचा व मराठ्यांचा इतिहास शिकविण्यास इंग्लंडातील एखादा ग्रॅजुएट आणते ! जोशी यांच्या इतिहासपटुत्वाबद्दल राजवाड्यांचे मत हे असे होते. सरदेसायांच्या रियासतीचा उद्योग त्या वेळी नुकताच सुरू झाला होता. १८९८ साली सरदेसायांची मुसल-

मानी रियासत प्रसिद्ध झाली तिची राजवाडे यांनी मुक्तकंठाने प्रशंसा केली.

'आपली मुसलमानी रियासत फारच उत्तम वठली आहे. आपला ग्रथ मजजवळ आहे व त्याचा मी वारंवार उपयोग करीत असतो. मूळ फारशी व अरबी व रजपूत व इतर ग्रंथ घेऊन आपण इतिहास रचला असता तर उत्तम होते. तरी ज्या कामाकरिता तो आपण रचला आहे, ते काम तो पूर्णपणे बजावील हे उघड आहे. सरदेसा-यांना इतिहासाच्या कामी ते उत्तेजन देत व वेळोवेळी त्यांना अड-णाऱ्या ऐतिहासिक शंकांची निवृत्ती करीत. पण साने, जोशी, सरदेसाई यांच्याशी राजवाडे यांचे चांगले संबंध असले तरी, मिरजेचे वासुदेव-शास्त्री खरे हे त्यांचे खरे अंतरंग स्नेही होते. मिरजेला राजवाडे गेले म्हणजे ते खरे शास्त्र्यांकडे नेहमी उतरत. आपले घरदारसुद्धा विकून खरेशास्त्री यांनी पटवर्धनी दप्तराचे जे संशोधन चालविले होते, त्याबद्दल राजवाडे यांना खरेशास्त्रींबद्दल निरतिशय आदर वाटे. ते खरे शास्त्र्यांबद्दल एकदा म्हणाले होते, खरेशास्त्री यांच्या एवढा अवाढव्य माहितीचा माणूस राष्ट्रात वारंवार उपजत नसतो. खरे-शास्त्र्यांच्या संग्रही राजवाड्यांच्या अंदाजाप्रमाणे तीस हजार ऐति-हासिक पत्रे होती. राजवाडे जात्या उग्रगंभीर पण खरेशास्त्र्यांसारखा समानधर्मा भेटल्यावर त्यांच्या हास्यविनोदाला भरते येई, एकदा राजवाडे आले असता खरेशास्त्र्यांचा एक लेखक विद्यार्थी काही जुनी पत्रे चाळीत बसलेला त्यांनी पाहिला. ते पाहून राजवाडे शास्त्रीबुवांना म्हणाले, 'अहो, ह्या भिकेच्या चाळण्या ह्या लहान पोरांच्या हाती आतापासूनच कशाला देता ?' शास्त्रीबुवा चटकन म्हणाले, 'अहो, विसूभाऊ, काय टाकावे व काय घ्यावे, ठेवावे, संग्रहित करावे हे चाळ-णीच शिकवीत असते. मात्र विवेक, तारतम्य पाहिजे !' राजवाडे प्रवासास निघाले की शास्त्रीबुवांची बायको त्यांना कणकेच्या दशम्या तूप, गूळ, भाजी, झुणका साखर, लोणचे अशी भरपूर शिदोरी बांधून देई. एकदा राजवाडे म्हणाले, 'मला फराळाचे इतके सोपस्कर कशाला करून देता ? मी एखाद्या वेळी खातो, बाकी उरलेले कोणास

तरी देऊन टाकतो, झाले ! १९११, १९१२ साली खरेशास्त्र्यांच्या ऐतिहासिक लेखसंग्रहाचे काम आर्थिक पेचामुळे मंदावले होते त्या विवंचनेने खरेशास्त्रीच नव्हे तर राजवाडेही व्यग्र झाले. एके दिवशी रात्री नऊ साडेनऊ वाजता पुण्यास दत्तोपंत पोतदारांना बरोबर घेऊन राजवाडे हे केळकरांकडे गेले. केळकरांविषयी राजवाडे यांचे मत फारसे बरे नव्हते. पण केळकर हे खरेशास्त्र्यांचे शिष्य व या कामी त्यांची उपयुक्तता निर्विवाद होती. किंबहुना लोकप्रियतेपेक्षा लोकोपयोगिता हेच केळकरांचे वैशिष्टय होते, आणि ते त्यांचे त्यांनाही माहीत होते कारण निरनिराळ्या थरात या ना त्या कारणामुळे अप्रिय असलेल्या पण उपयुक्त असल्यामुळे अनिवार्य असलेल्या त्या. रानडे यांचाच आदर्श केळकरांनी डोळ्यांपुढे ठेवला होता. त्यामुळे एरवी राजवाड्यांच्या आवडीनिवडी जरी अनावर असल्या तरी या प्रसंगी केळकरांबद्दलची आपली नावड त्यांनी बाजूला ठेवली व खरेशास्त्र्यांचे काम कसे मार्गी लावता येईल याबद्दल केळकरांशी आग्रहाने चर्चा केली. विद्वान विद्वानांची स्तुती करताना शब्दांच्या बाबतीत मोठे कृपण असतात, ' विद्वांसो वसुधातले परवचः श्लाघासु वाचसमः ! ' असा जगन्नाथ पंडितासारख्या कविवरांचा कडू अनुभव आहे त्या दृष्टीने राजवाडे याचे हे मोठे वैशिष्टय म्हटले पाहिजे, की साने, जोशी, सरदेसाई, खरे अशा समव्यवसायी पंडितांची प्रशंसा करताना त्यांची वाचा कधी अडखळली नाही आणि त्यांचा हात नेहमी सढळ राहिला.

जशी स्तुती तशीच टीका. पारसनिसांचे व त्यांचे फारसे रहस्य नसे आणि पारसनिसांवर त्यांनी वेळोवेळी सडकून टीकाही केली. ब्रह्मेंद्रस्वामीचे त्यांनी चरित्र लिहिले, त्याचे तर राजवाडे यांनी वाभाडे काढले. पण याचा अर्थ असा नव्हे, की पारसनिसांचे व त्यांचे वैयक्तिक शत्रुत्व होते. ' ऐतिहासिक टीका ' या लेखात या संदर्भात ते म्हणतात, ' रा. पारसनिसांवर मी आज बारा वर्षे टीका करीत आहे. ती सगळी टीका खाऊन आमचे मित्र रा. पारसनीस पहिल्याहूनही जास्त ताजेतवाने झालेले आहेत. एखादा सटरफटर माणूस

असता तर त्याने आजपर्यंत शंभरदा राम म्हटला असता. परंतु रा. पारसनिस अद्याप हयात असून, इतिहाससंशोधनाचे त्यांचे काम भानूंना कल्पना नाही इतक्या नव्या दमाने चालले आहेत. भानू समजत असतील की, पारसनीस माझा द्वेष करतात, तर त्यावर एवढेच सांगितले म्हणजे बस्स आहे की, त्यांचे पत्र मला व माझे पत्र त्यांना गेल्याशिवाय एक आठवडाही सुना जात नाही. वाद व टीका, ऐतिहासिक पत्रे, मते, सिद्धांत यासंबंधी असतात. त्यात एकाचे म्हणणे पूर्वपक्षरूप असते. दुसऱ्याचे म्हणणे उत्तरपक्षरूप असते. दोघांचाही हेतू इतिहासाचे हित व्हावे, रचना व्हावी, सिद्धी व्हावी, हा असतो. त्यात खाजगी रागद्वेष बिलकूल नाही.' केवळ पारसनीसच नव्हे, तर टिळक, गोखले किंवा सरकारी नोकर किंवा इतर कुणावरही राजवाड्यांनी टीका केली तर त्या टीकेमागे त्याची वृत्ती ही होती, त्यात खाजगी रागद्वेष बिलकूल नसत, त्याची टीका व्यक्तिनिष्ठ नसून वस्तुनिष्ठ असे. परप्रांतीय इतिहासकारांपैकी जदुनाथ सरकार यांचेशी राजवाडे यांचा संबंध एकदाच आला पण तो ऐतिहासिक ठरला. सरकार १९१० साली पुण्यास आले होते. त्या वेळी हरिभाऊ आपटे हे त्यांना भाइसंमंडळात घेऊन आले. सरकारांचा त्यावेळी मंडळाने सत्कार केला. त्याप्रसंगी राजवाडे यांनी सरकार यांना इंग्रजीत उपदेश केला की, ज्याप्रमाणे वृद्ध ह्यूमने तरुण गिबनला आपला इतिहास फ्रेंच किंवा लॅटिनमध्ये लिहिण्याच्या मोहाला बळी न पडता स्वभाषेत म्हणजे इंग्रजीतच लिहिण्याचा आदेश केला, तद्वत सरकार यांनी आपले लेखन बंगालीतच करावे.' अप्रियस्यच पथ्यस्य वक्ता श्रोताच दुर्लभः।' या न्यायाने राजवाड्यांचा हा अप्रिय पण पथ्यकर उपदेश सरकारांना फारसा आवडला असेल असे वाटत नाही. कारण त्यांच्या इतिहासाचे खरे सौंदर्य त्यांच्या इंग्रजीपेक्षाही सुरेख इंग्रजी शैली लिहिण्याच्या चातुर्यात होते, त्याचमुळे 'बंगालचे गिबन' अशी कीर्ति त्यांना लाभली होती. आपल्या आंग्लभाषा कोविदत्वाचा त्याना रास्त अभिमानही होता, कारण या प्रसंगानंतर जवळ जवळ पन्नास वर्षांनी प्रा क्षीरसागर यांना एका चर्चेत त्यांनी

सुनावले की, 'Don't think, Professor, that you are talking with a mere Historian. I was first class first in my M. A. with English !'

ते मुळात मुळी इंग्रजीचे प्रोफेसरच होते. राजवाडे यांच्या परखड उपदेशाने सरकारांचे हे यश हरण केले. ते सरकारांना पटण्यासारख नव्हते. राजवाड्यांबद्दलचा द्वेश त्यांच्या मनात राहिला असावा. राजवाड्यांच्या निधनानंतर सरकारांनी लिहिलेल्या लेखात राजवाड्यांचा त्यांनी प्रांजळ गुणगौरव केला असला तरी, इतिहासकार म्हणून राजवाड्यांची त्यांच्या दृष्टीने असलेल्या अपात्रता सांगताना सरकाराची टीका वाजवीपेक्षा कडक वाटते, त्यावरून हा ग्रह दृढ होतो. पण इतर सर्व बाबतींप्रमाणे याबाबतही राजवाडे यांची वृत्ती तृणं ब्रह्मविदः स्वर्गं तृणं शरस्य जीवितं। विरक्तस्य तृणंभार्या निःस्पृहस्य तृणं जगत। या सुभाषितात वर्णन केल्याप्रमाणे होती.

खरे बोलायचे झाले, तर राजवाडे यांची ही सारी गुणसंपदा मानवी नसून केवळ दैवी होती असे म्हटले पाहिजे पण तिचा देवाशी किंवा देवभक्तीशी अर्थाअर्थी काही संबंध नव्हता. सामान्यतः समजूत अशी आहे की, 'करून करून भागले आणि देवपूजेला लागले किंवा कोल्हटकरांच्या भाषेत सांगायचे म्हणजे, देवाज्ञा होण्याचा समय आला म्हणजे देवाच्या कल्पनेची छाया माणसाच्या मनावर पडू लागते. राजवाड्यांच्या ईश्वरविषयक कल्पनांची उत्क्रांती या सामान्य नियमाच्या उलट होती. पूर्ववयात ते आस्तिक होते. वयाच्या सेहेचाळीसाव्या वर्षी लिहिलेल्या एका आत्मचरित्रपर टिपणात ते म्हणतात, 'ईश्वराची कृपा अपरंपार हवी.' पण जसजशी त्यांची शास्त्रीय दृष्टी तीव्र झाली. तसतशी त्याच्या श्रद्धेची जागा शुद्ध बुद्धिवादाने घेतली, सहाव्या खंडाच्या पहिल्या पृष्ठावर 'व्यक्तमध्य प्रपंच अनाद्यनंत आहे. ब्रह्म् स्थाणु आहे. पाहण्याचे प्रकार मात्र निराळे आहेत' असे एक वाक्य त्यांनी छापले आहे. हे वाक्य त्यांनी कोणत्या ग्रंथातले अवतरण म्हणून घेतलेले नाही, त्यावरून ते त्यांच्या विचारधारेचे द्योतक समजण्यास हरकत नाही. याच खंडाच्या प्रसिद्ध प्रस्तावनेत इतिहास व

तत्त्वज्ञान यांचा संबंध स्पष्ट करताना तत्त्वज्ञानाबद्दल त्यांनी व्यक्त केलेले विचार या संदर्भात निर्णायक समजण्यास हरकत नाही. मानव-समाजास प्रारंभ केव्हा झाला व समाप्ती केव्हा होणार हे इतिहासाला माहीत नाही. गीतेत म्हटल्याप्रमाणे 'व्यक्तमध्य' जो प्रपंच त्याची मधली माहिती तेवढी मनुष्याला मिळणे शक्य आहे. प्रपंचाचा आदि अंत मनुष्यकल्पित शास्त्रांना उपलभ्य नाही. व्यक्तमध्य प्रपंचाच्या चरित्राची अशी असमाधानकारक स्थिती आहे. ती आजचीच आहे अशातला प्रकार नाही. फार पुरातन काळापासून ती अव्याहत चालू आहे. आलो कोठून व जाणार कोठे हा प्रश्न सोडविल्यावाचून चालले आहे काय, या प्रश्नाचा उलगडा करता येत नाही आणि हा उलगडा केल्याविना विचारी मनुष्याची चित्तशांती होत नाही. प्रपंच म्हणजे काय हा शोध आज हजारो वर्षांपासून चालला आहे व शेकडो शोध-कांनी शेकडो उपपत्त्या काढल्या आहेत. परंतु सांगण्यास दुःख वाटते की, त्यांपैकी एकही उपपत्ती वर्तमानक्षणी मनाला समाधान देणारी नाही. 'आपएव ससर्जादौ' पासून 'तत्त्वमसि'पर्यंत शेकडो साध्या व भानगडीच्या उपपत्त्या युरोपात व भरतखंडात मागे निघाल्या आहेत व सध्या निघत आहेत. परंतु त्यात गृहीत गोष्टींचा भाग बहुत व प्रमाणबद्ध पद्धतीचा अंश अत्यल्प आहे असा संशय येतो.' (ऐ. प्रस्तावना पा. ३३२–३३३) या विश्वाचा आदि अंत हे मानवी बुद्धीला न उकललेले व न उकलणारे कोडे आहे असा राजवाडयांचा आशय आहे. कोऽहं कस्त्वं कुतः आयात्। को मे जननी को मे तात।।' या प्रश्नाची उत्तरे माणसाला कधीही मिळणे शक्य नाही. म्हणून 'गीते'त म्हटल्याप्रमाणे 'अव्यक्तादीनि भूतानि व्यक्तमध्यानि भारत। अव्यक्त निधनान्येव तत्र का परिदेवता।।' हेच प्रपंचाचे तात्पर्य आहे असा राजवाडयांचा सिद्धांत आहे. १९१८ साली लिहि-लेल्या 'विकार-विचार प्रदर्शनाच्या साधनांची उत्क्रांति' या प्रसिद्ध लेखात त्यांनी प्रपंचाला आधारभूत असलेली ईश्वरकल्पना एक भ्रम म्हणून मोडीत काढली आहे. 'मनुष्यमात्रांच्या ह्या दीर्घकालीन म्हणजे लाखो वर्षांच्या शैशवावस्थेच्या मंद इतिहासावरून असे दिसते

की, ईश्वर, आत्मा, परमात्मा, काळ, दिक्, कारण इत्यादी शुद्ध किंवा शबल कल्पना स्वयंभू नसून मनुष्याने शुद्ध किंवा भ्रांत अनुमानाने बनविलेल्या आहेत... नीतिकल्पना, ईश्वरकल्पना, कार्यकारणभावकल्पना, दिक्कल्पना, कालकल्पना या सर्व कल्पना लाखो वर्षांच्या उत्क्रांतीने बनत आलेल्या आहेत. देवाची आणि देवीची जरूर कोठपर्यंत, तर संकटनिवारणाचे उपाय सुचले नाहीत तोपर्यंत. संकट निवारणाचे जसजसे जास्त उपाय मनुष्याला सुचतात तसतसा तेवढ्यापुरता देवाला कमी कमी त्रास द्यावयाचा किंवा तो तो देव काढून पदभ्रष्ट करावयाचा परिपाठ मनुष्याचा आहे. अशा रीतीने अनेक देव खोटे ठरल्यावर एकच एक देव मनुष्य प्रौढीने कल्पितो आणि आपणास शहाण्यांचा शिरोमणी समजतो. पण हा एकमेव अद्वितीय देवही हजारो प्रसंगी उपयोगी पडत नाही. शेवटी त्या अद्वितीयालाही भिरकावून देऊन मनुष्य एक अद्वैतवेदान्ती तरी बनतो व ईश्वराला मायेच्या म्हणजे भ्रांतीच्या सदरात काढतो किंवा भौतिकशास्त्रज्ञ बनून कथित ईश्वराच्या ताब्यातून संकटे निवारण्याचे काम आस्ते आस्ते बळकावीत जातो. तात्पर्य, कार्याचे खरे कारण जेथे जेथे सापडले नाही तेथे तेथे भूत किंवा देव हे कारण अज्ञ मनुष्य कल्पीत आलेला आहे व खरे कारण सापडले म्हणजे भूतकारणाला किंवा देवकारणाला रजा देण्याची त्यांची वहिवाट आहे. तात्पर्य, देव ही कल्पना कृत्रिम आहे, स्वयंभू नाही. राजवाडे यांचे तत्त्वज्ञान हे अशा प्रकारचे होते. त्यामुळे 'जसे ज्याचे तत्त्वज्ञान तसा त्याचा प्रपंच' या त्यांच्याच सिद्धांताप्रमाणे त्यांचा प्रपंच होता. ते कधी देवपूजा करीत नसत, गीतेसारख्या धार्मिक ग्रंथाचा नित्यपाठ करीत नसत, स्तोत्रपाठ करीत नसत की, कधी देवळात देवदर्शनासाठी जात नसत.

परंतु यावरून राजवाडे यांना नास्तिक समजणे केवळ धाडसाचेच नव्हे तर त्यांच्यावर अन्याय करण्यासारखे होईल. राजवाड्यांसारख्या लोकोत्तर पुरुषाची गुंतागुंतीची मनोरचना समजणे इतके सोपे नाही. 'लोकोत्तराणांचेतासि कोहि विश्वपुमर्हति ।' भटांनी ते देवपूजा किंवा देवदर्शन करीत नसत हे जसे त्यांच्याबद्दल लिहिले आहे, त्याच

प्रमाणे असेही लिहिले आहे की, 'अन्नग्रहण करण्यापूर्वी डोळे मिटून एकाग्रचित्ताने ते दोन्ही हात जोडून नमस्कार करीत.' व पुढे भट म्हणतात, 'सर्व जगाचे नियंत्रण करणारी जी कोणी अचित्य शक्ती असेल तीस ते वंदन करीत असावे असे आम्हाला वाटते. भट यांचे हे स्पष्टीकरण अगदी बरोबर आहे. संकटनिरसन करणाऱ्या आणि मानवी गुणांचा अध्यारोप असलेल्या ईश्वराची कल्पना त्यांना तर्क-दृष्टचा कृत्रिम वाटत असली आणि त्यांनी ती भ्रांतीच्या सदरात काढली असली तरी, ज्या अगाध आणि अज्ञेय शक्तीच्या जोरावर सर्व सृष्टीचे व्यवहार चालले आहेत, त्या शक्तीचे अस्तित्व तर्कातील असलेल्या अंतस्फूर्तीच्या आणि श्रद्धेच्या योगाने, जरी तिची तार्किक उपपत्ती देता येत नसली तरी, त्यांना प्रतीत होतच होती. या खोल अर्थाने ते आस्तिकच होते; जसा 'God is subtle but he is not cruel' असे म्हणणारा थोर शास्त्रज्ञ आइनस्टाइन आस्तिकच होता. तर्क आणि श्रद्धा यांच्यातील या द्वंद्वाचा निरास करताना टिळकांनी गीतारहस्यात एका ठिकाणी म्हटले आहे, ते राजवाडयांच्या या बाबतीतील वृत्तीला चांगले लागू पडते– 'सर्व ज्ञान केवळ बुद्धीनेच प्राप्त होते, त्याला दुसऱ्या कोणत्याही मनोवृत्तीचे साहय लागत नाही, हा केवळ तर्कप्रधान शास्त्रातच जन्म घालविल्यामुळे बुद्धिकर्कश झालेल्या पंडितांचा वृथाभिमान आहे. श्रद्धेने प्राप्त झालेल्या ज्ञानाची छाननी करून त्याची उपपत्ती लावणे हे बुद्धीचे काम आहे हे खरे; पण सर्वस्वी योग्य उपपत्ती न मिळाली तरी तेवढयामुळेच श्रद्धेने प्राप्त होणारे ज्ञान नुसता भ्रम आहे असे म्हणता येत नाही. म्हणून रूढार्थाने आस्तिक किंवा धार्मिक नसले तरी राजवाडे यांचे सबंध जीवन मूलतः आध्यात्मिकच होते. 'भस्मीभूतस्य भूतस्य पुनरागमनः कुतः । यावज्जीवं सुखं जीवेत् ऋणं कृत्वा घृतं पिबेत् ।।' अशा प्रकारच्या आधिभौतिक सुखावादाचा निःशेष परिहार करणारा तो एक मूर्तिमंत वस्तुपाठ होता.

राजवाडयांना संसार नव्हता पण म्हणून ते सुखी होते असे नाही.

जॉनसनच्या वचनाप्रमाणे ब्रह्मचाऱ्याच्या जीवनातल्या स्वातंत्र्याच्या सुखाबरोबर दुःखेही त्यांच्या कपाळी आली होती. त्या एकाकी आणि निरानंद जीवनात संसारी माणसाला सुख वाटावे असे काय होते ? बायको नाही, मुले नाहीत, घर नाही, दार नाही, सत्ता नाही, संपत्ती नाही, लौकिक नाही, लोकप्रियता नाही, सुग्रास अन्न नाही, दुपारची सावली नाही, संगीत नाही, गायन नाही, काही नाही, रंग, रूप, रस यांचा सर्वस्वी संन्यास केलेले ते जीवन होते. अशा त्या जीवनात असा कोणता आनंदाचा झरा होता की, ज्याच्यामुळे वर्षानुवर्षे राजवाडे जगू शकले ? राजवाड्यांच्या जीविततील तो आनंद म्हणजे ज्ञानावरून अज्ञानाचे संशोधन करणाऱ्या ज्ञानोपासकाचा ज्ञानानंद होय. इतिहास, व्याकरण, भाषाशास्त्र इत्यादी शास्त्रांच्या अभ्यासात राजवाडे यांना जो आनंद झाला, त्याचे मूल्यमापन पैशाच्या भाषेत करणे कठीण आहे. या बाबतीत टिळकांनी एकदा द. वि. आपटे यांना म्हटले होते तेच खरे– ' एकंदरीत संशोधन हा विषय असा आहे की ज्याची त्याला अभिरुची असेल त्याने ती पुरवून घेतल्यावाचून राहू नये. सर्वच गोष्टी फायद्याकडे, तात्कालीक फायद्याकडे नजर देऊन करावयाच्या नसतात. संशोधनांत जाणाऱ्या काळांत संशोधकाला जो आनंद वाटतो, त्याची कल्पना व महत्त्व ही संशोधनाची अभिरुची नसलेल्या लोकांना पटवून देता येणार नाहीत. आपल्यास संशोधनाने सत्याचा एखादा किरण लाभला तरी जो आनंद होतो, त्यापुढे सर्व गोष्टी तुच्छ असतात. ' ब्रह्मास्वाद सहोदर ' असलेला राजवाड्यांचा हा विद्यानंद ह्या गीतेत म्हटल्याप्रमाणे ' सुखमात्यंन्तिक यत्तद्बुद्धिग्राह्यमतीन्द्रियम् ।' अशा प्रकारचा अतीन्द्रिय आणि आत्मिक आनंद होता. पण टेनिसनच्या ' कमळ भक्षक 'प्रमाणे त्यांचा हा विद्यानंद म्हणजे निरपेक्ष आनंदसेवनाचा एक प्रकार नसून, ' सा विद्या या विमुक्तये ' या न्यायाने, राष्ट्राच्या मुक्तीसाठी त्यांना आपली विद्या वापरावयाची होती. म्हणून इतिहासात ज्यांनी या राष्ट्राला स्वतंत्रतेचा मोक्ष मिळवून दिला, त्या शिवाजी, रामदास आणि थोरला माधवराव या राष्ट्राच्या पितरांच्या नावाने दररोज

संध्येनंतर ते पितृतर्पण करीत. हे तिघे पुरुष म्हणजेच मराठशाही होय असे त्यांना वाटे.

शिवाजीची गुणसंपदा त्यांनी वर्णन केली आहे त्यात भक्तीची उत्कटता असली तरी अतिशयोक्ती नाही–' शिवाजीचे वर्तन न्यायाचे, नीतीचे, पराक्रमाचे, स्वधर्मपरायणतेचे व परधर्म सहिष्णुतेचे होते, दोन–चारशे लढाया मारून त्यात विजयी होणे, तीन--चारशे किल्ले मैदानी, डोंगरावर, समुद्रतीरावर बांधणे, नवीन सैन्य तयार करणे, स्वभाषेला उत्तेजन देणे, स्वतः पद्यरचना करणे, कवींना आश्रय देणे, नवी शहरे वसविणे, स्वधर्माचे संरक्षण करणे, गोब्राह्मणांचा प्रतिपाल करणे, सारांश स्वदेशाला स्वतंत्र व सुखी करणे; ह्या लोकोत्तर कृत्यांनी जर कोण्या पुरुषाने ह्या भूमंडळाला अक्षय ऋणी करून ठेविले असेल तर ते शिवाजीनेच होय. शिवाजीची खाजगी वर्तणूक व सार्वजनिक पराक्रम इतके लोकोत्तर होते की, त्याच्याशी तुलना करावयास जी जी म्हणून व्यक्ती घ्यावी, ती ती ह्या नाही त्या गुणाने शिवाजीहून कमतरच दिसेल. ह्या अवतारी पुरुषासंबंधी लिहिताना समर्थ म्हणतात, ' तयाचे गुण महत्त्वासी । तुलना कैची ॥' राजवाडे यांच्या ' रामदास ' या निबंधाने तर रामदासांकडे पाहण्याची नवी दृष्टी निर्माण केली.

राजवाडे यांच्यासारख्या देव न मानणाऱ्या देव माणसाच्या जीवनातील हा उदात्त आनंद पाहिला म्हणजे ब्राउनिंगच्या Grammarian's Funeral ' या प्रसिद्ध कवितेची आठवण होते. युरोपातील प्रबोधन युगात व्याकरणासाठी सर्वस्वार्पण करणाऱ्या एका वैय्याकरण्याचे चित्र रेखाटले आहे, आणि काडीला काडी जोडून माडी बांधणारी छोटी माणसे आणि ध्येयासाठी सर्वस्वाचा होम करणारी या वैय्याकरणासारखी मोठी माणसे यातले अंतर चांगले दाखवले आहे.

लहान गोष्टीत यश मिळविणारी माणसे आणि मोठ्या गोष्टीत अपयश वाट्याला आलेली मोठी माणसे यांच्यात अयशस्वी झालेली मोठी माणसेच खरोखर मोठी होत असा ब्राउनिंगचा आशय आहे.

Scanned with CamScanner

आणि तेच खरे आहे. 'दन्तभङ्गो हि नागानां श्लाघ्यो गिरिविदारणे !' लहान माणसे आणि मोठी माणसे यांच्यातले जे हे अंतर तीच राजवाड्यांची मोठेपणाची इयत्ता होय. ते जेथे विराजमान झाले आहेत तेथे हे भरारीसुद्धा मारू शकत नाहीत. 'They durst not sore where doth sit !'

'अणोरणीयान् महतो महीयान् ।' राजवाडे याप्रमाणे काही बाबतीत मोठ्याहून मोठे असले तरी काही बाबतीत लहानाहून लहान होते. कमळाच्या मुळांना चिखल असावा किंवा अमृत आत्मा मृण्मय शरीराच्या पिंजऱ्यात जखडलेला असावा, त्याप्रमाणे त्यांचे मोठे गुण लहान गोष्टींनी जखडलेले होते. त्यामुळे अनेक वेळेला त्याच्या वागण्याचा ग्रंथ भल्या भल्यांना लागत नसे आणि त्यांचे वर्तन पाहून शहाण्यांना वेड लागायची वेळ येई. राजवाडे यांच्या ठिकाणी सहानुभूती उदंड होती आणि त्यांचा स्वभावही प्रेमळ होता. पण त्यांचे प्रेम हे सह्याद्रीच्या दऱ्याडोंगरात झुळझुळणाऱ्या गुप्त झऱ्यासारखे होते. ते वाटेल त्याला मिळत नसे. सामान्यत: त्यांचा चेहरा रागीट आणि गंभीर असे आणि बायको–मुले यांच्या संगतीमुळे माणसांच्या स्वभावाला जे मार्दव येते त्यांचा त्यांच्या बाबतीत अभाव होता. त्यामुळे त्यांचा मूळचा उग्र स्वभाव वाजवीपेक्षा रुक्ष आणि कडक झालेला होता. Certainly wife and children are a kind of discipline of humanity ' बेकनने म्हटले आहे ते खरे आहे. कौटुंबिक शिस्तीला राजवाडे पारखे होते. त्यामुळे कुटुंबवत्सलाशी त्यांचे जमत नसे. सातवळेकर त्यांना खाणावळीऐवजी आपल्या घरी उतरण्याचा आग्रह करू लागले तेव्हा राजवाड्यांनी त्यांना उत्तर दिले– 'अहो ! माझ्यासारख्याने खाणावळीत जेवावे, देवळांत किंवा धर्मशाळेत पडावे व आपल्या कामास लागावे हेच योग्य आहे. आमचा स्वभाव, व्यवसाय व त्यातील अनुभवाने बनलेला स्वभाव कुटुंबवत्सल माणसाच्या घरात राहण्यास योग्य नाही. कोणाच्याही घरी गेले म्हणजे त्या घरासारखे त्यांच्या तंत्राने राहावे लागते. ते आम्हास साधतेच असे नाही. त्यामुळे पहिले एक दोन दिवस जरी आमचा आदर झाला

तरी मग लोक त्रासतात हा आमचा आज चाळीस वर्षांचा अनुभव आहे. म्हणूनच मी कोणाच्या घरी उतरत नाही. यासाठी मी तुमच्याकडे येऊ इच्छीत नाही.' सुरुवातीला ते लोकांकडे उतरत पण त्यांना एकंदर मुलांचे व मालकांचे अनुभव वाईट आले. त्याबद्दल ते एकदा केतकरांना म्हणाले–'मी कोणाकडे राहावयास गेलो आणि पोरांनी माझ्या पोथ्यांशी फाजीलपणा केला, म्हणजे मी थप्पड अगर छडी मारावी, घरमालकाला देखील पोरांना नीट शिस्त लावली नाही म्हणून रागवावे. ह्यामुळे घरच्या मालकांनी ही खरी गोष्ट न सांगता, माझ्या द्वाडपणाच्या इतर पुष्कळ गोष्टी सांगावयास सुरुवात करावी, असे पुष्कळदा होई आणि ह्यामुळे मी लोकांच्या घरी राहणेच सोडून दिले.' राजवाड्यांचा विक्षिप्तपणा हा त्यांच्या रागीटपणाचाच एक भाग होता. ते स्वतः शास्त्रीय दृष्टीचे मोठे पुरस्कर्ते होते पण भुताखेतांबद्दल त्यांना थोडी फार भीती वाटे. एकदा ते व कुलकर्णी तळेगाव दाभाड्याला भाटवडेकरांच्या जुन्या व बिनवस्तीच्या वाड्यांत राहत होते. स्वयंपाक व भांडी घासणे नेहमी स्वहस्ते चाले. त्या वाड्यात शेवग्याचे एक झाड होते. त्याच्या दोन शेंगा रोज मुगाच्या आमटीत घालीत. एके दिवशी कुलकर्णी पोस्टात गेले असता पोस्ट मास्तर त्यांना म्हणाला, 'तुम्ही कसे हो तिथे राहता? तिथे परसात तर शेवग्याच्या झाडावर हडळ आहे!' कुलकर्ण्यांनी राजवाड्यांना हे सांगितले मात्र, त्यांनी तावडतोब तो वाडा सोडला आणि तळेगावच्या समर्थ विद्यालयाची वाट धरली. त्या दिवशी दुपारी ते तेथे जेवले आणि संध्याकाळी तळेगावही सोडले. एकदा राजवाडे कुलकर्ण्यांकडे अहमदाबादला गेले होते. कुलकर्ण्यांनी हॉस्टेलमधून जेवण, मागवले. ते राजवाडे यांना फार आवडले. दोन दिवस गेले व एके रात्री जेवण चालू असता कॉलेजचा रेक्टर आला व गप्पा मारीत बसला. राजवाड्यांनी पुऱ्यांची फार तारीफ केली. रेक्टर म्हणाला–'अहो पण त्या पुऱ्या खऱ्या कणकेच्या रव्याच्या नाहीत. त्या मक्याच्या पिठाच्या आहेत.' त्याबरोबर राजवाड्यांनी हातातली पुरी तर टाकलीच, ताट तर बाजूला मारलेच पण पुरीचा जो अर्धा

घास तोंडात होता तोही फेकून दिला. इतकेच नव्हे तर दुसरे दिवशी अहमदाबादही सोडले. राजवाडे यांचा स्वभाव तसा फार संशयखोर होता. घ्यावा त्यांचा तर ते संशय घेतच पण घेऊ नये त्याचाही आणि घेऊ नये त्या प्रकारचा संशय ते घेत. त्यांच्या मनाने आपले कायम घेतले होते की, सर्व लोक आपल्या वाईटावर आहेत. त्यांच्या इतिहासांत आणि व्याकरणात दिसणाऱ्या नवनवोन्मेषशाली कल्पनाशक्तींचाच हा एक वेगळा आणि विकृत विलास होता. एकदा ते स्वतःच्या एका खोलीत राहून आपले जेवणखाण व लेखन वाचन करीत होते. एके दिवशी सुटी असल्यामुळे दुपारच्या वेळी काही मुले खोलीजवळ रस्त्यावर खेळत होती. त्यांच्या दंग्याने व गलक्याने राजवाडे संतापले व एक दोनदा ते त्या मुलांवर खोलीतून ओरडले. त्यांनी दाद दिली नाही, तेव्हा राजवाडे त्या मुलांशी हमरीतुमरीवर आले व त्यांना शिव्यागाळी करू लागले. त्याने तर ती मुले फारच चेकाळली. शेवटी राजवाडे यांनी निष्कर्ष काढला की, पुण्याच्या इतिहास मंडळाच्या सभासदांनी आपल्याविरुद्ध कट केला आहे व ही मुले आपणाला त्रास द्यायला उठवली आहेत. त्या क्षणी ती खोली त्यांनी सोडली. एकदा साताऱ्याला असताना त्यांनी स्टेशनवर जाण्यासाठी टांगा केला. त्यांच्या बरोबर त्यांची एक जड ट्रंक होती. त्या ट्रंकेवरून टांगेवाल्याशी ते वर्दळीवर आले. तो म्हणे की टांगा उलटतो आहे म्हणून ट्रंक पुढे ठेवतो ' व ते म्हणत की, ' माझी ट्रंक माझ्या जवळ मागेच पाहिजे. ' टांगेवाल्याने चाबूक काढला व राजवाड्यांनी सोटा उगारला. अखेर, राजवाड्यांनी टांगा तर सोडलाच पण स्टेशनवर जायचेसुद्धा रद्द केले.

इस्लामपुरास राजवाडे असताना असाच प्रकार घडला. ते व मुंडले इस्लामपुराहून अकुड्यास गेले होते. परत येताना छकडेवाल्याने मधल्या वाटेने छकडा चालवला. रस्ता काही चांगला नव्हता. वाटेत एक लहानसा खाडा, एका बाजूस उंच व एका बाजूस खोल असा लागला. त्या वेळी छकडेवाल्याने छकड्यातील लोकांस खाली उतरण्यास सांगितले. मुंडले व त्यांच्याबरोबरचे दुसरे गृहस्थ उतरले पण

राजवाडे हट्टाने छकड्यातच नसून राहिले. त्यांचे म्हणणे की, छकडे-वाला मूर्ख आहे. उगीच बाऊ करून आपणांस खाली उतरण्यास सांगतो आहे. मी उतरत नाही, झाले, छकडा खाड्यांत शिरला आणि दोन मिनिटात उलटला. एका बाजूस बैल व एका बाजूस राजवाडे. बैलांच्या गळ्यात दोरखंड अडकले होते व राजवाड्यांच्या डोळ्याला छकड्याच्या तट्ट्यांची कामटी लागून रक्त येत होते. मुंडल्यांनी त्यांना उभे केले व छकडेवालाही बैल सोडून मोकळा झाला. डोळ्या-तून रक्त आलेले पाहिल्याबरोबर राजवाड्यांनी त्या छकडेवाल्याला ' न भूतो न भविष्यति ' अशा अभद्र शिव्या द्यायला सुरुवात केली. तो छकडेवाला तर मारामारीलाच उठला. अखेर दोघांची कशीबशी समजूत घालून मुंडले यांनी राजवाड्यांना इस्लामपूरला नेले. तेथे डॉक्टरांकडे डोळ्यांवर उपचार करण्यास ते त्यांना नेणार होते. पण राजवाडे म्हणाले–' इथल्या भिकार डॉक्टरांकडून माझ्या डोळ्यास बरे होण्याऐवजी अधिक इजा होण्याचाच संभव जास्त म्हणून मी आत्ताच्या आत्ता पुण्यास जातो.' मुंडले म्हणाले–' ठीक आहे. पण जेवण करून मग जा.' पण राजवाडे महाहट्टी. ते न जेवताच तडक पुण्याला चालते झाले. राजवाडे अशा प्रकारे कुणाशी भांडू लागले की त्यांच्या तोंडून अर्वाच्य आणि अश्लील शिव्यांचा भडीमार चाले आणि शिव्या खाणाऱ्याप्रमाणे शिव्या ऐकणाराही चीत होऊन जाई. भाषाप्रभु राजवाडे हे त्यांच्या संस्कृत आणि प्राकृत शब्दांच्या पांडि-त्याबद्दल प्रख्यात होते. पण या शिव्या ऐकल्या म्हणजे ते शब्दांप्रमाणे अपशब्दांचेही पंडित असल्याची खात्री पटे. त्यांच्यासारख्या वयस्कर, विद्वान, विचारवंताच्या तोंडी अशा शिव्या अगदी चमत्कारिक दिसत. जणू गोमुखातून गंगेऐवजी गटारगंगेचे पाणी यावे असे वाटे. पण त्याला इलाज नव्हता. राजवाड्यांच्या स्वभावाची तीही एक, नसती तर बरे झाले असते असे वाटावयास लावणारी पण तरीही असणारी अशी बाजू होती आणि नको म्हणून ती काही टळत नव्हती. स्वत: अभ्यास न करणाऱ्या पण अभ्यासूंचा वेळ खाणाऱ्या रिकामटेकड्या

...८

जिज्ञासूंची तर त्यांना इतकी चीड होती की, त्यांना टाळण्यासाठी काही काही ते एक शिडी लावून घराच्या माळ्यावर चढत आणि मग शिडी वर ओढून घेत. राजवाड्यांचे हे सारे प्रकार पाहिले म्हणजे प्रतिभासंपन्न माणसे आणि वेडी माणसे यांच्यात साम्य फार आणि फरक थोडा असे ड्रायडनने म्हटले आहे, ते खरे असावे, असे वाटू लागते.

अशा प्रकारच्या वाऱ्याशीही भांडणाऱ्या आणि रामदासाने म्हटल्या-प्रमाणे 'पुर्ते कोणाकडे पाहेना । पुर्ते कोणाशी बोलेना । आपुली स्थिति अनुमाना । येवोच नेदी ॥' अशा माणसात जमा नसलेल्या माणसाशी जमणे कठीणच. पण माणसाची जात फार विलक्षण आहे, आणि माणसाच्या वाईटपणाला ज्याप्रमाणे सीमा नाही त्याप्रमाणे त्याच्या चांगुलपणालाही सीमा नाही. अशी माणसे अर्थात कोठेही झाली तरी थोडीच असतात. पण त्यांच्यामुळेच जग चाललेले असते. राजवाडे यांना अशी माणसे भेटली. त्यात प्रमुख म्हणजे धुळ्याचे भास्कर वामन भट, शंकरराव देव, गोविंदराव चांदोरकर, आप्पासाहेब रण-दिवे, चाळीसगावचे विनायक परशुराम भागवत, शेट नारायण दांगट, पुण्याचे पोतदार, साताऱ्याचे कृ. पां. कुलकर्णी, इस्लामपुरचे वा. दा. मुंडले, वाईचे काकाराव पंडित, कऱ्हाडचे पांडुरंग केशव शिराळकर, तळगाव दाभाडे येथील विजापूरकर हे होत. आणखीही चांदोर-कर, तात्यासाहेब मेहेंदळे, आबासाहेब खरे, वासुदेवशास्त्री खरे, गोगटे वगैरे आहेत. पण त्यातल्या त्यात राजवाड्यांचा जास्त सह-वास आधी सांगितलेल्या मंडळींना घडला. या सर्वांनी राजवाड्यांच्या स्वभावातल्या उपद्रवी गोष्टी सहन करून, कसलाही स्वार्थ न धरता, त्यांना मोठ्या निष्ठेने साथ दिली. आणि त्यांच्यामागे कार्लाईलाने म्हटल्याप्रमाणे विभूतिपूजेशिवाय कोणतीही दुसरी भावना नव्हती.

देव आणि भट यांची राजवाड्यांशी ओळख बरोबरच झाली. दोघांनाही रामदासी वाङ्मयाची आवड होती आणि देवांना 'दास-बोधा'ची शुद्ध प्रत प्रसिद्ध करावयाची होती. ती राजवाड्यांजवळ

आहे हे कळल्यावरून देवांनी राजवाड्यांशी पत्रव्यवहार केला. त्याप्रमाणे सज्जनगडची वार्षिक यात्रा करून परत येताना राजवाडे यांची सातारा मुक्कामी देवांशी भेट झाली. त्यांनी आपल्याजवळची 'दासबोधा'ची प्रत व गिरीधरांची काही बाडे देवांना दिली, आणि विचारले, 'मला निश्चित काम करणारा आवडतो. मी तुम्हास जी दासबोधाची पोथी देत आहे तीबरहुकूम ग्रंथ छापून तुम्ही किती दिवसांत प्रसिद्ध कराल ते मला सांगा. तुम्ही दिलेल्या वचनाप्रमाणे वागाल असे मी समजतो.' तेव्हा देव म्हणाले, 'तीन वर्षांचे आत आपण दिलेला दासबोध अस्सल प्रतीबरहुकूम छापून प्रसिद्ध करीन हे निश्चित आपण समजावे.' दिलेल्या वचनाप्रमाणे देवांनी राजवाड्यांचा दासबोध तर प्रसिद्ध केलाच, पण त्याअधी डोमगाव मठातील कल्याणस्वामींची दासबोधाचीही प्रत प्रसिद्ध केली. देवांची सत्कार्योत्तेजक सभा होतीच, तिला रामदास आणि रामदासी वाङमय प्रसिद्ध करणारी संस्था हे रूप आले, ते राजवाड्यांच्या भेटीचे फल होय. राजवाड्यांचे ऐतिहासिक लेख प्रसिद्ध करण्यासाठी म्हणून 'इतिहास आणि ऐतिहासिक' मासिक देवांनी मुद्दाम सुरू केले. त्यात आणि देवांच्या 'रामदास आणि रामदासी' मासिकात राजवाड्यांचे पुष्कळ लेख प्रसिद्ध झाले. राजवाड्यांना सापडलेली एकनाथपूर्व 'ज्ञानेश्वरी'-ही देवांनी प्रसिद्ध केली व त्यांची फार दिवसांची इच्छा पूर्ण केली. भट यांनी राजवाड्यांच्या प्रेरणेने, मराठ्यांच्या इतिहासाची जी साधने तोपर्यंत प्रसिद्ध झाली होती, त्याच्या आधाराने 'महाराष्ट्रातील व्यवहार निर्णयपद्धति' नावाचा निबंध लिहिला व तो भारत इतिहास संशोधक मंडळाच्या संमेलनात वाचला. त्यांचा नामांकित ग्रंथ म्हणजे 'महाराष्ट्र धर्म अथवा मराठ्यांच्या इतिहासाचे आत्मिक स्वरूप' हा होय. हा ग्रंथ चांगला खपला. या ग्रंथावर राजवाड्यांनी अभिप्राय दिला नाही व भटांनीही तो मागितला नाही.' 'या ग्रंथाच्या विक्रीपासून कवडीचीही अपेक्षा करू नका' इतकेच राजवाडे म्हणाले. भट आणि देव यांच्यामुळे राजवाडे यांचा व चांदोरकरांचा परिचय झाला. चांदोरकर वारकरी संतांचे अभिमानी. त्यांची ज्ञानेश्वरीवर

निःसीम निष्ठा होती. राजवाड्यांनी त्यांना सूचना केली की, ज्याप्रमाणे देवांनी रामदासी वाङ्मयाचे संशोधन करण्याचा निश्चय केला आहे, त्याप्रमाणे तुम्ही महाराष्ट्रीय संतवाङ्मयाचे व ज्ञानेश्वरीचे संशोधन करावे. चांदोरकरांना ती सूचना पसंत पडली. त्यांनी संत वाङ्मयाच्या प्रसारार्थ ' प्रभात ' नावाचे मासिक सुरू केले. त्यातही राजवाड्यांचे पुष्कळ लेख प्रसिद्ध झाले. चांदोरकरांना ताम्रपटांच्या वाचनाचा व महानुभव वाङ्मयाचा नाद होता. त्यात राजवाडे यांनी त्यांना चांगले मार्गदर्शन केले. त्यांच्या भ्रमंतीत महानुभव पंथाची जी बाडे त्यांना मिळत, ती ते चांदोरकरांना देत. राजवाडे हे लोकांना सहजासहजी आपल्याजवळ येऊ देणारे नव्हते. पण त्यांच्या इतक्या जवळ धुळ्याचे हे भट, देव, चांदोरकर गेले, त्याचे रहस्य राजवाडे यांनी बोलता बोलता भटांना एकदा सांगितले, ' मला जे इतिहास संशोधनाचे कार्य प्रिय आहे त्यांची तुम्हास गोडी असून तुम्हास या कार्याबद्दल आदर वाटतो. म्हणून मी धुळ्यास येतो. उद्या जर तुम्ही हे कार्य करण्याचे सोडून दिले, तर तुमची मी ओळखही विसरून जाईन.'

याचा अर्थ असा नव्हे, की राजवाडे यांचे या मंडळींशी जमत असे. ते तसे कठीणच होते. राजवाडे स्वतःच म्हणत असत की, , माझा स्वभाव ' अकेमोडेटिंग ' नाही, मी 'सेल्फ–सीकिंग ' आहे.' याचा अर्थ सरळ हा होता की, राजवाडे कोणाच्या तंत्राने म्हणून कधी चालणारे नव्हतो. ज्यांना त्यांची जरूर असे त्यांना राजवाड्यांच्या तंत्राने चालणे भाग होते. त्याचा स्वभाव तिरसट, तऱ्हेवाईक, कोणाला काय वाटेल याचा विचार न करिता मनाला येईल ते तोंडावर बोलण्याचा. चांदोरकरांना राजवाड्यांच्या इतिहाससंशोधनाच्या कार्याबद्दल आदर होता आणि राजवाडे यांना पण. प्रारंभी पांझरा नदीच्या काठी सध्याकाळी राजवाडे, देव, भट, चांदोरकर ही मंडळी फिरायला जात,तेव्हा चांदोरकरांना प्रिय असलेल्या ज्ञानेश्वरांवर व त्यांच्या भागवत पंथावर राजवाडे इतक्या त्वेषाने तुटून पडत की, त्या वादविवादाला कंटाळून चांदोरकरांनी राजवाड्यांबरोबर फिरणेच सोडून दिले. पुढे

कालांतराने तो वाद आपोआप जिरला व राजवाडे–चांदोरकर यांचे सौरस्यही झाले. पण राजवाड्यांबद्दल चांदोरकरांच्या मनात जी अढी बसली होती ती काही शेवटपर्यंत गेली नाही. राजवाड्यांना याची वार्ताही नव्हती. त्यांचा स्वभाव लहान मुलासारखा. मनात येईल ते भडाभडा बोलून जात, मागे पोटात मळमळ काही राहत नसे. त्यांच्या मनात संतांबद्दल अढी होती, संतांचे भक्त असलेल्या चांदोरकरांबद्दल नव्हे. देव आणि चांदोरकर यांच्यापेक्षा भट राजवाड्यांच्या अधिक जवळ गेले. पण राजवाड्यांच्या शब्दसुमनांचा 'प्रसाद' कधी कधी भटांच्याही वाट्याला येई, एकदा ते भटांना म्हणाले, 'तुम्ही निग्रो आहात. तुमच्या हातून देशकार्य काही एक व्हावयाचे नाही. काही मोठे कार्य करण्याची ऐपत तुमच्यात नाही.' भट काही निग्रो नव्हते. ते धुळ्यातले चांगले प्रतिष्ठित वकील होते. वकिलांना राजवाडे बूट पाटलोणे म्हणत व हसत. त्यामुळे धुळ्यातले वकील राजवाडे यांच्या वाऱ्याला उभे राहत नसत हे भटांना माहीत होते. तसे करणे त्यांना काही कठीण नव्हते. पण, भट राजवाड्यांना थोरल्या भावाप्रमाणे मानीत होते ते त्यांना म्हणाले, 'तुम्ही म्हणता ते सर्व दोष आमच्या ठिकाणी आहेत. परंतु तुम्ही जे काही श्रेष्ठ कार्य करता त्यामुळे तुमचे विषयी मला परम आदर वाटतो. तुमची सुखसोय व्हावी, तुम्हास काही मदत करावी इतकीच ऐपत व शक्ती आमचेपाशी आहे व आमची इतकीच अपेक्षा आहे की, आम्ही जे काही करतो त्याचा तुम्ही आनंदाने स्वीकार करावा. काही एक धंदा पत्करून आम्ही संसार थाटला आहे. तो सोडून देऊन आपल्याप्रमाणे श्रेष्ठ ध्येय साध्य करण्याचे काम आमचे हातून होणे दुर्घट आहे.' भटाच्या या स्पष्टीकरणानंतर, पुन्हा म्हणून राजवाड्यांनी या मुद्द्यांवर त्यांना छेडले नाही.

प्रथम प्रथम राजवाडे धुळ्याला आले म्हणजे देवांकडे उतरत पण पुढे पुढे ते भटांकडे उतरू लागले. धुळ्याला बरेच दिवस वास्तव्य करण्याचा राजवाड्यांचा बेत असला तर भट त्यांना राहण्यास जागा पाहून देत. काही दिवस आत्माराम छापखान्याच्या इमारतीतील खोली राजवाड्यांकडे होती काही दिवस प्राणिसंरक्षक संस्थेच्या दवाखा-

त्यातील पिछाडीची एक खोली व प्रशस्त दिवाणखाना त्यांच्याकडे होता. पुढे धुळेमालेगाव रस्त्याला भटांचा बंगला बांधून झाला, तेव्हा तो त्यांनी कोणास भाड्याने दिला नाही. राजवाडे धुळ्यास आले तर त्यांच्यासाठी म्हणून तो रिकामा ठेवला. प्लेगच्या दिवसात गावाबाहेर आपल्या शेतात भट झोपडी बांधून राहायला जात, त्यावेळी आपल्या बरोबर राजवाड्यांसाठी ते झोपडी बांधीत. राजवाडे आपल्या खोलीत स्वयंपाक करीत आणि जेवणाच्या वेळी भट त्यांच्याकडे पोळ्या, पातळ व कोरडी भाजी दररोज आपल्याकडे जेवणाऱ्या विद्यार्थ्यां-बरोबर पाठवीत. राजवाडे यांच्या सुखसोयीला भट अशा प्रकारे आपल्याकडून जिवापाड जपत होते. पण अमृत पुढे आले, तरी त्यात चमचाभर साखर कमी पडली म्हणून तक्रार करण्यासारखा दुरा-राध्य स्वभाव असलेल्या राजवाड्यांची कुरकुर या ना त्या कारणाने चालूच असे. भटांच्या बंगल्यात राजवाडे राहात होते. त्या बंगल्याच्या दाराशी एक चिंचेचे झाड होते. त्या झाडावर गुराख्यांची पोरे खेळत असत. त्यांच्या आरडाओरड्याने राजवाड्यांच्या लेखनात व्यत्यय येऊ लागला तेव्हा त्यांनी भटांना त्या पोरांचा बंदोबस्त करायला सांगितला व म्हटले, 'मला जागा अजून निवांत व कसलाही आवाज तेथे ऐकू येणार नाही अशी पाहिजे. शांत चित्ताने मी लेखनाचे कार्य करीत असतो, त्यात या आवाजाने विक्षेप होतो,' त्यांच्या लेखनाच्या व्यवसायात व्यत्यय येऊ नये म्हणून भटांनी एक स्वयंपाकी एकदा ठेवला. तीन-चार दिवस होतात तोच राजवाडे तक्रार करू लागले की 'त्या माणसास रक्तपितीचा रोग असल्याचा संशय येतो म्हणून त्यास रजा द्या. भटांनी त्याला रजा दिली. एका प्लेगच्या साथीत भट आणि राजवाडे जवळ जवळ झोपड्या बांधून भटांच्या शेतात राहत होते. भटांच्या ओळखीच्या एका वकिलाने भटांच्या शेजारी झोपडी बांधली. राजवाड्यांच्या झोपडीशेजारी झोपडी बांधू नका असे भटांनी त्या गृहस्थाला बजावून सांगितले असताही त्याने ऐकले नाही. झोपडीत तो गृहस्थ, त्याचे कुटुंब, त्याचा एक द्वाड मुलगा व एक कुत्रे राहत असत. त्या मुलांच्या खोड्या, वटवट, कुत्र्यांचे केकाटणे दिवसभर

चालू असे व शेजारी झोपडीत राजवाडे लेखन करीत असत. तीन–चार महिने हे चालले आणि शेवटी भट ज्याला भीत होते तेच झाले. राजवाडे मनातल्या मनात संतापत आणि रोज संध्याकाळी भट कोर्टातून त्यांच्या बरोबर फिरायला जायला आले की, सगळा राग त्यांच्यावर काढीत. 'त्या गृहस्थाची किंमत तुम्हास माझ्यापेक्षा अधिक वाटते. मी जे काही काम करतो त्याचे महत्त्व तुम्हास काहीच वाटत नाही. मला कटकट व आवाज सहन होत नाही. याचा बंदोबस्त तुम्ही काहीच करीत नाही. माझी तुम्हास पर्वा नाही.' अशी त्यांची सारखी टकळी चालू असे. भटांना त्यांनी सळो का पळो करून सोडले. बिचारे भट, 'घडू नये ती गोष्ट झाली त्यास उपाय नाही'येवढेच बोलून गप्प बसत. रविवारी व सणावाराला राजवाडे भटांकडे स्नान-भोजनाला येत, घरात साठविलेले सारे पाणी अर्धा पाऊण तास स्नान करून ते खलास करून टाकीत. सहसा राज-वाडे आजारी पडत नसत. पण जर का आजारी पडले तर त्यांचा विचित्र व संशयी स्वभाव विकोपाला जाई आणि त्यांची शुश्रूषा कर-णाऱ्या भटांना ते 'दे माय धरणी ठाय' करून सोडीत. 'देवा यांना एकदा लवकर बरे कर' अशी परमेश्वरास प्रार्थना करायची भटांवर वेळ येई. धुळयाला असताना राजवाडे एकदा तापाने आजारी पडले. त्यांच्या सांगण्यावरून धुळयाच्या गर्दे नावाच्या होमिअपाथिक डॉक्ट-रांचे औषध त्यांना सुरू केले. दोन-तीन दिवस गेल्यावर डॉक्टरांना अकोल्याहून कोणा नातेवाईकाची तार आल्यामुळे ताबडतोब जावे लागले. त्यांनी दोन-तीन दिवसांची औषधांची व्यवस्था करून ठेवली व सर्व प्रकार भटांस व राजवाडयांस सांगून लवकरच परत येण्याचे आश्वासन देऊन गेले. ते गेले आणि इकडे राजवाडयांच्या डोक्यात चक्र फिरू लागले. त्यांना संशय आला की, या सर्व प्रकाराच्या बुडाशी काहीतरी गूढ कारस्थान आहे. आपणावर विषप्रयोग होईल असा त्यांना नेहमी संशय येई. भटांनी त्यांची समजूत घालण्याची पराकाष्ठा केली पण राजवाडे यांनी आपले म्हणणे काही सोडले नाही. राज-वाडयांकडे भट पोळया पाठवीत असत व त्यांना घरकामासाठी एक

माणूस पाहून देत असत. त्याबद्दल तक्रारीचे एक टिपण राजवाडे यांनी केले होते. ते असे. १. पुरुष माणूस पाठविणे. २. कुळंबीण भांडी धुते व खरकटे येथेच कोठेतरी टाकते. ३. फडके नीट धुऊन पाठविणे. ४. भांडी स्वच्छ धुणे. ५. पोळ्या नीट भाजणे. आतांशी नीट भाजत नाहीत.'

धुळ्यास ज्याप्रमाणे भट होते त्याप्रमाणे चाळिसगावी विनायक परशुराम भागवत, बाजीराव भावसार, करंदीकर वकील, शेट नारायण बंकट हे राजवाड्यांचे स्नेही होते. त्यातल्या त्यात भागवत वकिलांचा व राजवाड्यांचा स्नेह विशेष होता. चाळिसगावी बरेच दिवस राहायचे असल्यास ते भावसार यांच्या बाजारपेठेतल्या माडीत राहत व आठवड्यातून एखादे दिवशी भागवतांकडे भोजनास जात. बागलाण प्रातांत शहाजीकालीन व वेरूळ–दौलताबाद भागात शिवकालीन कागदपत्रे शोधण्यास चाळिसगाव हेच मध्यवर्ती ठिकाण असल्यामुळे १९१५–१६ सालापासून ते चाळिसगावी राहू लागले. कऱ्हाडला पांडू अण्णा शिराळकर यांच्या राहत्या घराजवळच त्यांची एक स्वतंत्र माडीची जागा होती त्यात उतरत. वाईचे काका पंडित तर त्यांचे विद्यार्थीच होते. आणि त्यांच्या घरी सापडलेल्या एरंडे दप्तरातील पत्राने तर राजवाड्यांच्या इतिहाससंशोधनाच्या कार्यास आरंभ झाला होता. फडणीसाचे मेणवली दप्तर, बावधनचे पिसाळ दप्तर, काळे दप्तर, शिंगणी दप्तर, बावडेकर दप्तर लिहून घेताना पंडितांची मदत राजवाडे यांना फार झाली.

वाईला ते रास्तेवाड्यात किंवा काथवटे यांच्या घरी राहात असत. मसूर व इस्लामपूरला मुंडले यांजकडे व साताऱ्याला कृ. पां. कुलकर्णी यांच्याकडे उतरत. धुळ्याचे आत्माराम छापखान्याचे मालक रणदिवे यांनी मावळ प्रांतात शिवकालीन कागदांच्या नकला इतक्या बिनचूक केल्या की, त्या राजवाड्यांच्यासुद्धा पसंतीस उतरल्या. तळेगावी कधी समर्थ विद्यालयात तर कधी भाटवडेकरांच्या वाड्यात तर कधी मेढे यांच्या घरात राहात. घरभाडे तेरा रुपये असे. एका मे महिन्यात पंधरा दिवस ते तळेगावी राहिले होते, त्या वेळी त्यांना भोजनखर्च

सात रुपये पंधरा आणे आला असे त्यांनी लिहून ठेविले आहे.

'अतिपरिचयादवज्ञा' या न्यायाने, कोठेही गेले, तरी कुलकर्ण्यांचा अपवाद सोडला तर, मित्राकडे राजवाडे पराकाष्ठा तीन–चार दिवसांपेक्षा जास्त दिवस उतरत नसत. त्यांचा कारभार तसा स्वतंत्रच असे आणि त्या बाबतीत दुसऱ्याला त्यांचा उपसर्ग काही नसे. पण त्यांच्या सहवासात आले म्हणजे गुलाबांचे काटे टोचावेत, त्याप्रमाणे त्यांचा स्वभावातला विक्षिप्तपणा, संशयखोरपणा, संतापीपणा यांचा उपद्रव होणे अपरिहार्य होते. शिराळकर म्हणतात, 'विसूभाऊचा स्वभाव एककल्ली व चमत्कारिक होता. कित्येक प्रसंग असे येत की, त्यावेळी विसूभाऊंशी बोलणे नको असे वाटे. अत्यंत वाईट भाषण करून लोकांची मने फार दुखवीत! काका पंडितांवर त्यांचा इतका विश्वास पण एके प्रसंगी नवरात्राचे दिवसात राजवाडे त्यांचेकडे जेवण्यास गेले असता दोडक्याची भाजी त्यांच्या खाण्यात आली. बायकांच्या हलगर्जीपणामुळे भाजी कडू झाली होती. राजवाड्यांनी भाजी खाल्ली आणि त्यांचे तोंड कडू झाले मात्र, ते ताडकन पानावरून उठले. त्यांना संशय आला की दिवस नवरात्राचे, पंडित कऱ्हाडा ब्राह्मण, त्याने भाजीत विष घातले असले पाहिजे. ते डॉक्टरांकडे गेले व आपणास विषप्रयोग झाला आहे तरी तावडतोब औषध द्या, असे म्हणू लागले. डॉक्टरांनी विचारल्यावर राजवाड्यांनी सारी हकीकत सरळपणे सांगितली. तेव्हा डॉक्टरांच्या लक्षात राजवाड्यांची चूक आली व ते हसू लागले. त्यांनी राजवाड्यांची समजूत घातली. तेव्हा राजवाड्यांनी पंडिताची प्रांजळपणे माफी मागितली. एकदा मुंडले हे मुंबईला असताना नासिकच्या बाबासाहेब खरे वकिलांची त्यांना तार आली की, 'राजवाडे फार आजारी आहेत. तावडतोब निघून यावे.' मुंडले जाऊन पाहतात तो राजवाडे अतिसाराने बेदम झाले होते. मालकाचे म्हणणे असे पडले की राजवाडे यांना हा विकार होऊन पाच–सहा दिवस झाले होते, पण सुरू केलेली औषधे त्यांना पसंत नसल्यामुळे ते ती घेत नव्हते, काही खात–पीत नव्हते, कोणी शुश्रूषा केली तर ते संतापत म्हणून त्यांच्या जवळही कोणी

जात नव्हते. मुंडले यांच्या उपचारांनी राजवाडे सुधारले तेव्हा बरे त्यांना म्हणाले, 'तुम्ही आला म्हणून बरे झाले. नाहीतर आम्ही मोठ्या पेचात पडलो होतो. त्याच्या तापट स्वभावापुढे आमचे कोणा-चेच काही चालत नव्हते, तुमच्या येण्यानेच हा प्रसंग निभावला.' त्यावर मुंडले फक्त हसले. कुलकर्ण्यांच्या घरी त्यांच्या सासूबाई राज-वाड्यांची बडदास्त फार उत्तम ठेवीत. पत्रावळी भरून भात, त्यावर पळी दोन पळी घट्ट वरण, शेवग्याच्या शेंगा घातलेली मुगाची घट्ट आमटी, चटणी, भाजी असा बेत असला म्हणजे राजवाडे संतुष्ट असत. पण संशयी स्वभाव इतका की भाताच्या ढिगावर साजूक तुपाची सबंध वाटी ते ओतीत तेव्हा सभोवार बघत की कोणी आप-ल्याला हसतेय की काय ? कधी कधी स्वतःच हसायचे आणि म्हणा-यचे, कायहो, किती मी जेवतो !' एवढे तंत्र सांभाळूनही, जरा काही मनाविरुद्ध झाले की आपला बाडबिस्तरा घेऊन आणि दोन अर्वाच्य शब्द बोलून राजवाडे तडक चालते होत. एकदा केर काढताना थोडा केर कुठे सांदीत राहिला म्हणून राजवाडे यांनी कुलकर्णी यांच्या मेव्हण्याच्या पाठीत तीच केरसुणी घातली.

परंतु, राजवाड्यांच्या स्वभावाला या रौद्र बाजूप्रमाणे दुसरीही सौम्य बाजू होती. त्यांचे ते शिवस्वरूप ध्यानात न घेणे म्हणजे त्यांच्यावर अन्याय करण्यासारखे आहे. राजवाडे यांच्या स्वभावात निर्व्याज प्रेमळपणा होता, तो स्वस्त नव्हता, वाटेवर पडलेला नव्हता, सहज उपलभ्य नव्हता, पण तो होता, आणि प्रसंग आला असता, जमिनीत दडलेल्या गुप्त झऱ्याच्या उच्छ्वासाप्रमाणे त्यांच्या स्नेहाचे उच्छ्वास उचंबळून येत. त्यांचे स्नेही भट यांना एकदा मूळव्याधीचा अत्यंत कष्टदायक विकार जडला. सकाळपासून संध्याकाळपर्यन्त ते त्याने हैराण होत. कोणतेही उपचार लागू पडेनात. तेव्हा, राजवाडे यांनी त्यांच्याजवळ असलेल्या 'योगचिंतामणि' नावाच्या हस्तलिखित पोथीतून 'बहुशाल गुडपाक' नावाचे एक औषध स्वतःच्या देखरेखी-खाली धुळ्याच्या एका वैद्याकडून तयार करवून भटांना दिले. भट म्हणतात, एक आठवडाभर मी ते औषध सेवन करून या विकारा-

पासून कायमचा मुक्त झालो.' भटांप्रमाणेच त्यांचे स्नेही चांदोरकर यांच्याही उपयोगी राजवाडे पडले. चांदोरकरांना क्षयाने पछाडले होते. त्यांच्या त्या रोगापुढे मुंबईच्या डॉक्टरांनी व नासिकच्या थंड हवेनेही हात टेकले. चांदोरकर निराश झाले व धुळ्यास खरे म्हणजे मरायच्याच तयारीने आले. या वेळी राजवाडे व चांदोरकर यांचे बरे नव्हते व एकमेकांशी भाषणही नव्हते. पण चांदोरकरांची दुरवस्था पाहून राजवाडे यांनी भटाच्यामार्फत आपण करून दिलेले औषध घेण्यास चांदोरकर तयार आहेत काय याची चौकशी केली. चांदोरकरांचा होकार कळल्यावर, आपल्याजवळच्या 'योगचिंतामणी' ग्रंथातील 'शिवगुटिका' नावाचे औषध धुळ्याचे वाळिंबेशास्त्री यांच्याकडून करवून घेतले व ते चांदोरकरांना दिले. एक महिना औषध घेतल्यानंतर चांदोरकर क्षयापासून पूर्ण मुक्त झाले. राजवाड्यांचे मित्र वासुदेवराव मुंडले यांना तुरुंगवासाची शिक्षा झाली होती. ते तुरुंगातून सुटले पण तुरुंगवासाच्या परिणामांनी त्यांना सोडले नाही. त्यांना आमांशाचा भयंकर विकार जडला. पावसाळ्याचे चार महिने त्यांना यमयातना भोगाव्या लागत. राजवाड्यांना हे समजल्यावर ते त्यांना पुण्यास घेऊन आले व त्या वेळी पुण्यात प्रसिद्ध असलेल्या 'तात्या वैद्या'चे औषध सुरू करून, त्यांनी मुंडल्यांची प्रकृति दुरुस्त केली. या तात्या वैद्य पुणेकर यांची गणना 'प्रख्यात वैद्य' म्हणून गेल्या शंभर वर्षांत महाराष्ट्रात होऊन गेलेल्या कर्त्या पुरुषांच्या यादीत राजवाडे यानी केलेली आहे.

परंतु, हे काहीच नव्हे, असा चिरंतन लाभ राजवाड्यांच्या संगतीमुळे त्यांच्या या सुहृदांचा होई. राजवाडे औषध देत व त्यामुळे शरीर दुरुस्त होई आणि रोगी अरोग होई. पण शरीराचे बरे किती झाले तरी तात्पुरते असते. राजवाडे यांचे बोलणे म्हणजेच मनाचे एक औषध होते. 'यत्किन्चमनुरवदत् तद्वै भेषजम्' असे मनूच्या वचनाबद्दल म्हणतात, तेच राजवाड्यांच्या बोलण्याबद्दल म्हणता आले असते. त्यांचे बोलणे गोड नसे. गोड बोलण्याचे बाळकडूच त्यांना मिळाले नव्हते. त्याला ते तरी काय करणार ? पण गुणकारी औषध,

सामान्यतः, गोड नसतेच, पण ते कडू असले व दुबळ्या प्रकृतीला झोंबत असले तरी, त्या जालिम औषधाच्या थोड्या मात्रेप्रमाणेच राजवाड्यांच्या जालिम बोलण्यात कायमचे कल्याण करण्याचा मोठा गुण होता. भीमाच्या बोलण्याचे भारवीने जे गौरव केले आहे, ते जसेच्या तसे राजवाड्यांच्या बोलण्याला लागू करता आले असते. परिणामसुखे गरीयसी, व्यथ केऽस्मिन् वचसि क्षतौजसाम् । अति-वीर्यवतीव भेष ऽ बहुरल्पीयसि दृश्यते गुणः ।' धुळ्यास असताना देव, भट, चांदोरकर यांच्या बरोबर दररोज रात्री भोजनोत्तर राज-वाड्यांच्या गप्पा चालत. राजवाडे यांनी इतिहासाला आपले जीवित वाहून घेतले असले तरी, ते वर्तमानकाळाला पारखे झाले नव्हते. या गप्पांत मराठ्यांचा इतिहास व मराठी वाङमय इत्यादींचे संशोधन मराठ्यांचे पूर्वचरित्र, इंग्रजी राजसत्तेचे महाराष्ट्रावर झालेले परि-णाम, स्वराष्ट्राची परकीय राजसत्तेमुळे झालेली दुर्दशा या विषयांवर राजवाडे आपली मते प्रकट करीत असत. रात्री जेवण झाल्यानंतर त्यांना लेखन-वाचन वर्ज्य असे व सामान्यतः दहा-साडेदहाला ते झोपी जात. पण या गप्पा सुरू झाल्या म्हणजे बरोबर एक वाजून गेला तरी त्यांना त्याचे भान नसे. भोराजवळ आंबडखिंडीवर मुक्काम असताना मुंडले यांच्याशी युरोपियन नॅशनेलिझम, स्वातंत्र्य, समता व बंधुभाव यांच्या युरोपियनांच्या मर्यादा किंवा कल्पना, इंग्लंड, फ्रान्स, जर्मनी, इटली, रशिया येथील मोठमोठे ग्रंथकार, प्राचीन ग्रीक व रोमन संस्कृती, व तिचे उदयास्त, आर्य संस्कृतीची स्थित्यंतरे स्वकीय पूर्वजांचा शहाणपणा व मूर्खपणा, त्यांचे पांडित्य व बुद्धिमत्ता, मोगल, मराठे व इंग्रज यांचा संघर्ष, इंग्लिश मुत्सद्दी व लेखक यांची कुटिलनीति, शिवाजी रामदास, बाजीराव, शिंदे, होळकर यांची कर्तबगारी, साधुसंताचे गुणदोष व त्यांचा देशावर झालेला परिणाम यावर राजवाडे बोलत. कधी दादाभाई नौरोजी, मेथा, टिळक, गोखले, रानडे यांचे तौलनिक मूल्यमापन करीत. कधी राष्ट्रीय सभा, आर्यसमाज, हिंदुस्थानचे आर्थिक प्रश्न, प्रार्थनासमाज इत्यादि संस्थांची ध्येये व कार्य यांची मीमांसा करीत. मुंडले म्हणतात, ' कधी कधी राजवाडे माझ्याशी गप्पा मार-

ण्यास सुरुवात करीत, तेव्हा अनेक विषय चर्चेस निघून राजवाड्यांच्या रसवंतीचा प्रेमळ ओघ इतक्या झपाट्याने व आकर्षक रीतीने चालू लागे, की मध्यान्हरात्र केव्हा उलटून जाई यांचे दोघांसही भान राहात नसे. ' उत्तररामचरितात ' रामचंद्राने सांगितलेलाच हा अनुभव पुन्हा येत होता, 'अविदिगत यामा रात्रीरेवव्यरसीत् !' रात्र संपली पण गप्पा संपल्या नाहीत. चाळीसगावी भागवत व वंकटशेट यांच्याबरोबर राजवाडे गप्पा मारीत. कऱ्हाडला असले म्हणजे दुपारी चार वाजण्याच्या सुमारास शिराळकरांना फिरायला जायला राजवाडे बोलवीत. गावाबाहेर एखाद्या देवालयाच्या सावलीत त्यांच्या पायऱ्यावर किंवा एखाद्या झाडाखालच्या पायऱ्यावर बसत. राजवाडे त्यावेळी हिंदु समाजात हिंद्वेतरांना प्रवेश हा निबंध लिहीत होते. त्याबद्दलच्या गोष्टी ते बोलत. ख्रिस्ती समाजाची तामसी व आक्रमक प्रवृत्ती व हिंदु-समाजाची सहिष्णु वृत्ती यांची तुलना करीत. कधी इतिहासातील मौजेच्या गोष्टी सांगत. थोडा वेळ अशा रीतीने घालवून ऊन खाली झाल्यावर पुन्हा पुढे एक-दोन मैल फिरावयास जात. साताऱ्याला कृ. पां. कुलकर्णी यांच्याबरोबर भर दुपारी ते फिरायला बाहेर पडत. दोन प्रहरच्या भर उन्हात शुद्ध ओझोन वायू मिळतो असे त्यांचे मत होते. कॉलेजात असतानाही दोन दोन तास उन्हात तर उन्हातच बसत. फिरायला निघाले म्हणजे कोठेतरी तळ्याच्या किंवा ओढ्याच्या काठी, एखाद्या कातळावर, किंवा झाडाखाली बसत असत. मराठी वाङमय, मराठी इतिहास, जैमिनीची सूत्रे, कात्यायनाची वार्तिके, पतंजलीच्या आन्हिकांतील व्याकरणिक सिद्धांत, अर्वाचीन राजकारण अशा विषयांवर राजवाडे बोलू लागले म्हणजे त्या निवांत व रमणीय स्थळी बोलणाऱ्याची व ऐकणाऱ्याची समाधी लागे. बोलताना राजवाड्यांचे डोळे किलकिले होत किंवा मिटून जात आणि संगमे नदीनाम् । गह्वरे गिरीणाम् । धिया विप्रो अजायत !' या ऋग्वेदातल्या वचनाप्रमाणे त्यांच्या प्रतिभेला नव्या कल्पनांचे धुमरे फुटत. राजवाड्यांच्या सहवासाची मोहिनी ही अशी होती. जे त्यांच्या सान्निध्यात आले, ते पंडित होऊन गेले यात अतिशयोक्ती नाही. मुंडले

यांनी म्हटले आहे, ह्या दीड महिन्यांच्या सहवासात राजवाड्यांकडून मला इतके ज्ञान प्राप्त झाले की, लवकरच मी एक पोक्त व जाडा-जुडा बहुश्रुत विद्वान बनलो ! त्याचे परममित्र विजापूरकर त्यांना 'दुर्वास' म्हणत असत, ते केवळ त्यांच्या क्रोधी स्वभावामुळे नव्हे, त्यांच्या घोर आणि उग्र अशा ज्ञानमय तपश्चर्येमुळे. त्यांच्या जीवितालाा व व्यक्तिमत्वाला ऋषीदर्शनाते या न्यायाने मंत्रद्रष्ट्या ऋषीचे पावित्र्य आणि शुचिता आली होती म्हणून. त्यामुळे जे जे त्यांच्या सहवासात आले, ते ते त्यांच्या प्रभावाने, कृ. पां. कुलकर्ण्यांप्रमाणे, सुरवंटाची फुलपाखरे व्हावीत, बद्धांचे मुमुक्षु व्हावेत त्याप्रमाणे आमूलाग्र बदलून गेले. पूर्वी होते तसे ते पुढे राहिले नाहीत. म्हणून म्हटले, की राजवाड्यांचे सुखसंवाद म्हणजे भरल्या पोटावरच्या शिळोप्यांच्या गप्पा नव्हत्या, ते मनाचे अन्न होते आणि आत्म्याचे औषध होते. संस्कृतचा आश्रय करून बोलायचे तर 'यास्तेषां स्वैरकथालापास्ताएव भवन्ति शास्त्राणि !' त्याचे स्वैरकथालाप हीच शास्त्रे झाली.

'मी आत्मचरित्र लिहिणार आहे' असे भट यांना कधी कधी राजवाडे म्हणत. त्यांच्यासाठी त्यांनी काही त्रोटक टिपणेही करून ठेवली होती. त्यांचे कनिष्ठ, माध्यमिक व उच्च शाळांतील स्वानुभव हा लेखसुद्धा त्याच संकल्पाचा सूचक आहे. त्यांचे हे आत्मचरित्र त्यांच्या हातून कधीच लिहून झाले नाही ही दुर्दैवाची गोष्ट म्हटली पाहिजे. नाही तर त्यांच्या इतिहाससंशोधनांतील चित्रविचित्र अनुभव, त्यांची व्यक्तिरेखांची विश्लेषणे, त्यांचे सुखाचे व दुःखाचे उत्कट अनुभव यांच्यामुळे ज्या ऐतिहासिक पुरुषांचा जन्मभर त्यांनी ध्यास घेतला होता, त्यांचे चरित्रही रोमहर्षक आणि उद्‌बोधक झाले असते पण जरी त्यांनी आत्मचरित्र लिहिले नाही तरी बोलण्याच्या ओघात ते काही काही आठवणी सांगत. एकदा भागवत यांना त्यांनी सांगितले की रायगडाहून शिवाजी महाराज एकाएकी येऊन प्रकट होत याचे रहस्य शोधून काढताना त्यांना सह्याद्रीच्या प्रसिद्ध बोचाघळीचा शोध लागला ती जागा अत्यंत अवघड होती. एका बाजूला उंच डोंगर

आणि दुसऱ्या बाजूला खोल दरी, काही ठिकाणी फक्त हात धरून जाण्यास व पायाची बोटे ठेवण्यास जागा होती. अशा अवघड जागेतून राजवाडे सहज जात. इतिहासातली स्थळे, मग ती कितीही अवघड आणि दुर्गम असोत, स्वतःच्या डोळ्यांखाली घालण्याचा त्यांचा संप्रदाय असे, निरीक्षण करताना त्यांना वेळेचे भान नसे. कित्येक वेळा त्यांच्या जिवावर बेते. एकदा मुंबईजवळचे खादेरी - उंदेरी किल्ले व त्यांच्या सभोवतालचा प्रदेश यांची पाहणी करण्याकरिता ते कुलाब्याच्या दांडीवर गेले. संध्याकाळ झाली तरी त्यांना भान नव्हते. शेवटी पहारेकऱ्याने त्यांना आता येथे जास्त वेळ राहण्याची परवानगी नाही अशी सूचना दिली तेव्हा ते निघाले. खाली येऊन पाहतात तो समुद्राला तुफान भरती आलेली, अंधार पडू लागलेला. होडी नाही व सोबतीही नाही. अखेर एका मुसलमान खलाशाच्या सोबतीने ते पोहत किनाऱ्याकडे निघाले. वाटेत त्या खलाशाने त्यांना फसवले-तो मागे फिरला. राजवाडे एकटेच, त्या अंधारात, लाटांच्या तडाख्यांना तोंड देत पुढे चालले. पण ते थकले. इतक्यात दैवयोगाने एक कोळी पाण्यात मासे धरण्यासाठी जाळे टाकून उभा असल्याचे त्यांना दिसले. त्यांनी मोठ्यांदा आरोळी ठोकली. तेव्हा कोळ्याने आपले जाळे आणखी त्यांच्या रोखाने फेकले. ते पकडून त्याच्या आधाराने राजवाडे किनाऱ्यास येऊन पोचले. कधी ते त्यांच्या इतिहास यात्रेबद्दल सांगत. ते म्हणत, की प्रारंभीच्या काळात त्यांना एक रामदासी बोवा भेटले होते. त्यांच्याबरोबर ते आठ वर्षे फिरत होते. त्या काळात त्यांनी नर्मदा परिक्रमाही केली होती. तो रामदासी बोवा समर्थ संप्रदायाप्रमाणे दोघांसाठी भिक्षा मागून आणी दूध-तूप यांचा खर्च राजवाडे करीत. अनेक प्रसंगी त्यांच्या अनेक मित्रांनी त्यांना मदत केली पण त्यापेक्षा रामदासीची मदत अपूर्व व श्रेष्ठ प्रतीची होती, असे राजवाडे नेहमी म्हणत.

राजवाड्यांचा चेहरा उग्र आणि गंभीर त्यामुळे ते हसत नसतील असे वाटत असे. पण ते खोटे होते. ते हसत व हसवतही. त्यांचा विनोद उच्च दर्जाचा होता. कधी ते त्यांच्या चुलत्याचे विनोदी वर्णन

करीत व म्हणत की, ' गावाच्या आसपासच्या बागातील फुले, केळीची पाने इत्यादी गोळा करण्याचा जणू काही त्याचा हक्कच होता, कधी त्यांच्या परिचयाच्या एका धनाढ्य गृहस्थाने गाण्याच्या नादी लागून पैशाचे मातेरे कसे केले, याचे विनोदी शब्द चित्र रेखाटीत. कधी इतिहासाचे कागद मिळवताना आलेले अनुभव, त्यावेळी दुःखाचे असले तरी, मागून विनोदाने सांगून लोकांची करमणूक करीत एकदा राजवाडे इंदूरला असताना त्यांना एक मोठा व्यापारी भेटायला आला. त्याने खालून जिन्यातून मोठ्यांदा विचारले, ' राजवाडे साब उप्पर है ?' राजवाडे माडीवर होते. त्यांनी संतापून तशाच खणखणीत आवाजात सुनावले, ' साहेब सर्व मेले ! जा म्हणावं. बिचारा व्यापारी खजिल होऊन आल्या पावली मागे फिरला.' ते पाहून राजवाडे यांनी मोकाशी तेथे होते, त्यांना शेटजींना वर घेऊन येण्यास सांगितले ते आल्यावर त्यांना मोठ्या आदबीने तशी बसवून राजवाडे म्हणाले। ' शेटजी, साहेब ह्या शब्दाचा खरा अर्थ प्रभु, धनी, श्रेष्ठ असा आहे दीडशे वर्षे झाली. आपण सर्व जिंकलेले निर्माल्यवत असे आहोत हा काळाकुट्ट डाग धुण्याचा प्रयत्न करावा मग साहेब म्हणवून घेण्यास कोण कुपात्र सुपात्र आहे याचा विचार करता येईल. राजवाडे यांच्या सरवत्तीने शेटजी आधीच घामाघूम झाले होते. राजवाड्यांची ही अर्थमीमांसा ऐकण्याचा त्यांना धीर निघाला नाही. ते घाईघाईने कसे बसे म्हणाले, ' ' मेरा मगज उज्ज्वलित हुआ । आप बडे शास्त्री और विद्यालंकृत है । आपके साथ मै जादा भाषा नहीं कर सकता हूँ, नमस्ते. ' आणि त्यांनी राजवाड्यांचा निरोप घेतला.

कधी राजवाडे प्रचलित समाजस्थितीवर मार्मिक भाष्य करीत. त्यांनी रामदासाप्रमाणेच सर्व हिंदुस्थानचा प्रवास हजारो कोस पायी केला होता व तो उघड्या डोळ्यांनी, कानांनी व उघड्या मनाने केला होता. खरा हिंदुस्थान खेड्यात होता आणि तो त्यांनी ज्ञात्याच्या देखणेपणाने देखला होता. त्या प्रवासात दिवसच्या दिवस ते केळ्यावर, किंवा चणे, कुरमुऱ्यावर काढीत. त्या दिवसात त्यांची परिग्रह फल्गुता म्हणजे जवळच्या सामानाचा मोजकेपणा आश्चर्य

वाटावा असा होता. पांघरण्याची धावळी, अंथरण्याचे कांवळ, दोन धोतरे व एक पंचपात्र यांचे गाठोडे काठीत खोचून ती काठी खांद्यावर टाकून पायात पुणेरी जोडा घालून चालत. आंघोळ नेहमी नदीवर. त्याचवेळी कपडे धुणे चाले. रुमाल किंवा कोट एकच असल्यामुळे तो वाळेतोपर्यंत ते बाहेर पडत नसत. एक कोट चार वर्षे वापरीत. अशा सरंजामानिशी देशाचे दर्शन घेतल्यामुळे लोकस्थिती-विषयी त्यांचे ज्ञान केवळ पुस्तकी नसून अनुभवावर आधारलेले होते. त्यामुळे त्यांची वाणी ही या बाबतीत अधिकारवाणी होऊन बसली होती. तीस वर्षांच्या देशाटनानंतर देशस्थितीबद्दल रामदासासार-खेच त्यांचे मत झाले होते की, 'पदार्थ मात्र तितुका गेला। नुस्ता देशचि उरला। येणे करिता बहुताला। संकट जाले ॥ प्राणि-मात्र तितुके दुःखी। पाहता कोणही नाही सुखी। अखंड चिंतेच्या प्रवाही। पडिले लोक ॥' या दुर्धर अवस्थेसाठी योजिलेले सारे उपाय निरुपयोगी आहेत असे त्यांचे मत होते. ते म्हणत, 'राष्ट्रीय सभा, कौन्सिले व जयजयकार यांनी तुम्हास स्वराज्य मिळणे शक्य नाही, तर पाश्चात्य देश ज्या सैनिक शास्त्राच्या प्रगतीवर आपला सर्व भर देत आहेत, त्याच शास्त्रात प्रवीण होण्याबद्दल आपण आपले प्रयत्न सर्वस्व खर्चिले पाहिजे. नाहीतर आपला तरणोपाय नाही. आपण नामशेष होऊन जाऊ If you don't take to science, you are doomed. पण सध्याचे लोक इतिहास मंडळे काढण्याच्याही लाय-कीचे नाहीत; नुसती निरनिराळ्या जातींची जुनी गाणीही (folk lore) गोळा करण्यास तयार नाहीत मग शास्त्रीय मंडळे काढण्याची गोष्ट लांबच !' राजवाडे यांचा हा भौतिक विद्येचा विचार फार जुना होता. महादेव मोरेश्वर कुंटे यांच्यासारखे त्यांच्या आधीच्या पिढी-तले कर्ते विचारवंत याच मताचे होते, नव्हे, तसे त्यांनी आचरणही करण्याचा प्रयत्न केला. इंग्रजांशी त्यांच्यासारखीच यंत्रे तयार करून व यंत्रे हाताळून औद्योगिक क्षेत्रात सामना देण्याची त्यांची कल्पना होती. त्यांनी काडयाच्या पेटयांचा एक छोटासा कारखाना काढला.




त्याचे एक यंत्र आणले, लाकडाचे तुकडे व त्याच्या लहान लहान काड्या करायचे एक भले मोठे चाक होते. सरकारी नोकरी करून उरलेल्या वेळात कुंटे हे चाक फिरवीत व त्यांच्याकडे येणाऱ्या मुलांनाही फिरवायला लावीत. राजवाडे कुंट्यांच्याकडे नेहमी जात तेही ते चाक नेहमी फिरवीत. पुढे कुंटेही थकले व राजवाडेही थकले. चाक बंद पडले. प्रयत्नाची दिशा चुकली नव्हती, कमी पडला तो पैसा. या काळाला अनुलक्षून राजवाडे कधी म्हणत– 'मी जर श्रीमंत व लखपति असतो तर मोठा रसायनशास्त्रवेत्ता झालो असतो. परंतु भिकारी असल्यामुळे इतिहाससंशोधनाचा व भाषासंशोधनाचा बिनभांडवली धंदा मला पत्करावा लागला.' वैयक्तिकच नव्हे तर राष्ट्रीय मनोरथाच्या बाबतीत सुभाषित खरे बोलते की, 'उत्पद्यन्ते विलीयन्ते दरिद्राणां मनोरथाः !'

राजवाडे चातुर्वर्ण्याचे अभिमानी व पुरस्कर्ते होते व त्यांच्या या अभिमानाला शास्त्रीय दृष्टीचे पाठबळ होते. किंबहुना 'हिंदु समाजात हिंद्वेतरांचा प्रवेश' हा त्यांचा प्रसिद्ध निबंध जातिसंस्थेचा शास्त्रीय महिमाच सांगणारा आहे. ते म्हणतात, 'बुद्धिभ्रंश होऊन ह्या बहुगुणकारी संस्थेचा जर आपण साहसाने त्याग केला तर इतर प्राचीन व अर्वाचीन समाजाप्रमाणेच आपल्या वंशाचा, संस्कृतीचा, आचार–विचारांचा व समाजाचाही नामशेषत्वापर्यंत विध्वंस होईल... युरोपियनांचा मुख्य गुण त्यांची भौतिक, मानसिक व सामाजिक शास्त्रसंपन्नता होय. एकजिनसी जातीबद्धता राखून ही शास्त्रसंपन्नता सध्या आपणास हस्तगत करावयाची आहे.' वाईचे महादेवशास्त्री दिवेकर यांना एकदा राजवाडे म्हणाले की, 'ब्राह्मण योनिभ्रष्ट, तपभ्रष्ट व त्यागभ्रष्ट होत आहे आणि त्यातून स्वाभिमान, ईश्वर भाव हे गुण लुप्त होत आहेत. इंग्रजाला जर घालवायचे असेल तर शास्त्रसंपन्न ब्राह्मण तयार झाले पाहिजेत. इंग्रजांचे राज्य शास्त्रसंपन्नतेवर आहे. पण महाराष्ट्रीय ब्राह्मण शास्त्राकडे दुर्लक्ष करून स्वराज्य मिळवू पाहत आहे हे मूर्खपणाचे आहे. पल्लेदार तोफांच्या अभावी मराठ्यांचे राज्य गेले हे ध्यानात ठेवून शास्त्र

संपन्न समाज तयार करण्याचे काम ब्राह्मण होऊन कायदा तयार केला पाहिजे व क्षत्रिय वर्गाचे पुनरुज्जीवन करून कायदा अंमलात आणणारी सत्ता निर्माण केली पाहिजे. या संदर्भात ते वेळोवेळी शिवाजी व रामदास यांचा उल्लेख अभिमानाने करीत. रामदासांनी विशी–पंचविशीचे ब्राह्मण मराठे तरुण हाताशी धरले तसेच ब्रह्म-क्षेत्रातील तरुण हाताशी धरून त्यांना शास्त्रसंपन्न करावे. इंग्रजाने उत्पन्न केलेली हजारो शास्त्रे आत्मसात करावी आणि शासन शास्त्र निर्माण करावे असे ते नेहमी सांगत. ब्राह्मणाच्या कर्तृत्वाचा, बुद्धिमत्तेचा व त्यांच्या ऋषिपरंपरेचा राजवाडे यांना मोठा अभिमान होता. म्हणून हल्लीच्या कारकून ब्राह्मणांना ते ' नीग्रो ' ' पशू ' म्हणून संबोधीत असत. स्वतःच्या ' ब्राह्मण्या 'बद्दल ते म्हणत. ' मी ब्राम्हण आहे म्हणून मी निस्पृहवृत्तीने व निर्धनतेने राहून ज्ञानार्जनात आयुष्य दवडीत आहे. माझे हे प्राप्त कर्तव्यच आहे. पैशांचा संचय करणे हे माझे काम नव्हे. हांजी हांजी करणे हा ब्राह्मण धर्म नाही, मी वाणी झालो असतो तर वाण्याचे दुकान चालवले असते. मी व्यापार उदीम केला असता. ' राजवाडे यांचे ब्राह्मण धर्माबद्दलचे स्वानुभवाचे बोल ' आधी केले मग सांगितले ' अशा कोटीतले आहेत. त्याचे अंतेवासी चांदोरकर लिहितात, ' पैशाचा संग्रह तर त्यांनी कधीच केला नाही. तथापी स्वतःच्या योगक्षेमापुरती रक्कम त्यांच्या त्या जीर्ण चंचीत अथवा बटव्यात मधून मधून दिसे. महिना दहा रुपयाच्या वर त्यांना शरीरपोषणार्थ जास्त रक्कम लागत नसे. ' त्या चंचीचीही एक मोठी कथाच होती. राजवाड्याची ही चंची अगदी जीर्ण आणि मळकट असे. चंचीत पैसे का ठेवता, असे विचारले तर ते उत्तर देत. ' भिकारड्या चंचीत पैसे असतील असे कोणास वाटत नाही. पाकिटात पैसे असतात असा सर्वसाधारण समज असतो, या कारणास्तव पाकिटात पैसे न ठेवता चंचीत नोटा ठेवितो; म्हणजे त्या चोरीस जाण्याचा संभव कमी. ' कातड्याच्या पाकिटात चार–दोन रुपये व चिल्लर नाण्यापलीकडे रक्कम राज-वाडे ठेवीत नसत. एकदा या चंचीची मोठी गंमत झाली. धुळ्याला

असताना भट व राजवाडे एकदा नदीकाठी वाळवंटात संध्याकाळी फिरायला गेले होते. थोडा वेळ तेथेच गप्पागोष्टी करीत बसले. त्या वेळी राजवाड्यांनी तंबाखू खाण्यासाठी चंची काढली. तंबाखू खाल्ली व चंची तेथेच जवळ ठेवून दिली. रात्र पडल्यावर दोघे घरी आले व जेवले. जेवणानंतर तंबाखू खाण्यासाठी राजवाडे चंची काढू लागले तो त्यांना एकदम आठवले की, चंची वाळवंटात राहिली. ते भटांना म्हणाले, 'आताच्या आता चंची मला पाहिजे.' भटांनी विचारले. 'उद्या पहाटे लवकर मनुष्य पाठवून चंची आणली तर चालणार नाही काय ?' राजवाडे म्हणाले,' 'चंचीत तीस रुपयाच्या नोटा नोटा आहेत. म्हणून चंची तत्काळ आणणे युक्त.' तेव्हा तेवढ्या रात्री एक कंदील घेऊन भट आणि राजवाडे वाळवंटात जेथे संध्याकाळी दोघे बसले होते, तेथे गेले व चंची घेऊन परत घरी आले.

ब्राह्मण हा चातुर्वर्ण्यातला श्रेष्ठ वर्ण. त्यासंबंधाने राजवाडे यांची वृत्ती ही अशी होती. हिंदुसमाजातील बाकीच्या वर्णांबद्दल, त्यांची दृष्टी काय काय होती ? मुंडले म्हणतात, 'सामान्य व अशिक्षित अथवा कनिष्ठ वर्गासंबंधी त्यांना पितृमूलक ममत्व होते, पण आदर नव्हता ! अस्पृश्यांच्या प्रश्नाबद्दल 'अंत्यजोद्धार' या लेखात राजवाडे यांनी म्हटले आहे, 'तात्पर्य, महारांची जात आर्य असून संकरज आहे. हे लोक जर जास्त स्वच्छ राहिले व लिहिणे-वाचणे शिकून स्वधर्म जाणू लागले तर समाजाचे निःसंशय हित होईल. सर्व शुद्ध व संकरज श्रेष्ठ कनिष्ठ आर्यांना अहिंसादिधर्म साधारण आहे, तो त्यांनी निक्षून पाळला असता. स्पृश्या-स्पृश्यत्वाचा प्रश्न सर्वांना सुखकर, अशा पद्धतीने खास सोडविता येईल.' आपल्या या विचारसरणीला अनुसरून नासिकजवळील मसरूळ येथील वडारांना सुधारण्याचा त्यांनी प्रयत्न केला. त्यांना शिक्षण नव्हते. दारू पिऊन भांडणतंटे करीत. त्यांची सुधारणा, त्यांच्या मुलांना शिक्षण देऊन, करण्याचा राजवाडे यांनी प्रयत्न केला. नासिक म्युनिसिपालिटीने त्यांना शाळेसाठी झोपडी बांधून दिली. पाटचा, पेन्सिली, पुस्तके घेण्याकरिता मुंबईच्या एका व्यापाऱ्याने द्रव्य दिले. सहा महिने शाळा चांगली

चालली. पण राजवाडे नासिक सोडून गेल्यामुळे शाळा बंद पडली. ख्रिस्ती धर्माच्या वाढत्या आक्रमणाची त्यांना चिंता वाटे व मिशन-यांप्रमाणे हिंदूमध्येही लहान मुलांच्या संगोपनासाठी ऑर्फनेज काढावे असे त्यांना वाटे.

नासिकजवळच्या खेड्यात राजवाडे यांनी दलितांसाठी शाळा काढली, हा अपवाद समजावा. कारण: सामान्यत: कोणत्याही राज-कीय किंवा सामाजिक चळवळीत ते स्वत: भाग घेत नसत, कारण तसे ते स्वभावाने भित्रेच होते, आणि लोकसंग्रहाला त्यांचा स्वभाव सर्वथैव प्रतिकूल होता. एकदा भट यांना राजवाडे म्हणाले, 'आता मी राजकीय चळवळीत पुढाकार घेणार आहे,' तेव्हा भट त्यांना म्हणाले,

'ही गोष्ट तुमचे हातून होणार नाही. कारण ती साध्य होण्यास जे गुण तुमचे अंगी पाहिजेत, त्यांचा तुमचे ठिकाणी अभाव आहे.' पण या सर्वापेक्षा बलवत्तर कारण होते, ते त्यांच्याच शब्दात सांगा-यचे म्हणजे, 'माझी भूमिका विचारवंताची आहे. कार्यकर्त्याची ऊर्फ चळवळीच्या प्रणेत्याची नाही.' कोणत्याही चळवळीचे किंवा पुढाऱ्यांचे किंवा समाजाचे साधक–बाधक आणि सहृद मूल्यमापन करण्यात त्यांचा हातखंडा होता, आणि ते स्वत: अलिप्त असल्यामुळे त्या मूल्य-मापनाला एक प्रकारचे ऐतिहासिक महत्त्व होते. मुंडले यांच्याशी बोलताना महाराष्ट्रातील व हिंदुस्थानातील नेमस्त पक्ष, जहाल पक्ष, गुप्त संघटना, त्यांचे पुढारी व अनुयायी यांची त्यांनी जी चिकित्सा केली, ती आजही विचार करण्यासारखी आहे. जहाल व नेमस्त व गोखले यांच्याबद्दल ते म्हणाले, 'टिळकपक्षीय जहालांचा जमाव म्हणजे एक बाजारबुणग्यांचेच प्रदर्शन आहे. त्यातले अशिक्षित व अर्धशिक्षित लोक बहुतांशी उत्सवप्रिय व बघे आहेत, व सुशिक्षितांतील बहुतेक लोक कारकुनी बुद्धीचे– खर्डेघाशे आहेत. राजकारणाचा अभ्यास केलेले व त्यातील डावपेचात मुरलेले असे लोक त्यांत बोटाने मोजण्याइतकेही निघणार नाहीत, या बाबतीत मवाळ पक्षातील लोक अधिक सरस आहेत व गोखल्यांनी त्यांची संघटनाही चांगली चाल-

विली आहे. टिळक पक्षात संघटनेचा अभाव असून सर्वच पोरखेळ आहे. उत्साह खूप पण खोलपणा व टिकावूपणा फार कमी. टिळक स्वत: अष्टपैलू, बुद्धिवान, राजकारणपटू, अभ्यासू, धीट, निर्भय व कणखर आहेत, पण ते चतुर संघटक नसून केवळ चळवळचे आहेत. अशा ह्या चळवळीत मुख्य नेता नेतृत्व करण्यास हजर असेल तेव्हा तिचे बाह्य स्वरूप मोठे उग्र व प्रतिपक्षास भीती उत्पन्न करण्याजोगे असते. पण नेता दृष्टीआड झाला की, त्याच्या सैन्यांची बाजार-बुणग्यांप्रमाणे वाताहत होते. ते माघार घेऊन पळ तरी काढते किंवा प्रतिपक्षाच्या दमननीतीमुळे नामशेष तरी होते.' टिळक–पक्षाच्या अत्यंत उज्वल कालखंडात राजवाडे यांनी टिळक पक्षाच्या बळाबळाचे हे निदान केले होते, ते किती अचूक होते हे टिळकांच्या मृत्यूनंतर टिळकपक्षाचा अस्त झाला त्या वेळी दिसून आले. कारण त्या अस्ताची केळकर व दादासाहेब खापर्डे यांनी केलेली मीमांसा राजवाडे यांच्या सारखीच आहे.

टिळकांच्या आठवणीच्या तिसऱ्या खंडाला खापर्डे यांनी प्रस्तावना लिहिली आहे आणि १९३२ साली केळकरांनी मुलाखत दिली आहे, त्यात ही मीमांसा आली आहे. राजवाड्यांचा संचार असल्यामुळे त्यांना तत्कालीन गुप्तमंडळ्यांची व त्यांच्या संघटनांची चांगली माहिती होती. बंगाल्यांतील चळवळीबद्दल त्यांना आशा वाटे, पण महाराष्ट्रातील चळवळीची सूत्रे अनभ्यस्त, उल्लू, उतावळ्या तरुणांच्या हाती असल्यामुळे व वरिष्ट आणि जाणत्या लोकांचा वर्ग त्यापासून अलिप्त किंवा विरोधी वृत्तीचा असल्यामुळे महाराष्ट्रात ही चळवळ कशी काय रुजेल याबद्दल त्यांना चिंता वाटत असे.' १९२१ साली असहकारिते ' ची चळवळ सुरू झाली तेव्हा तिला पोषक असे एक–दोन लेख राजवाडे यांनी ' चित्रमय जगत् ' मध्ये लिहिले होते. गांधींच्या चळवळीबद्दल बोलताना राजवाडे म्हणाले, ' अहिंसावाद्यांची संघटना वेळ येईल तेव्हा हिंसावादी असणार नाही असे थोडेच आहे ? गांधी अमर नाहीत व त्यांची संघटना प्रबळ झाली तरी त्यांचे अनुयायी सर्वच्या सर्व त्यांचेच ब्रीद चालवतील असेही नाही. त्यांच्यातही

भिन्न प्रकृतीचे लोक निघतीलच. गांधींची आजची मनोवृत्ती क्रांति-प्रवण नसेल पण ते प्रामाणिक देशभक्त असल्यामुळे कालांतराने ते त्या मनोवृत्तीचे बनतील व जर योग्य क्रियेच्या वेळी त्यांची अहिंसा-वृत्ती आड आली तर त्यांचे इतर अनुयायी त्यांस दूर सारून, व हे त्यांच्या बाबतीत कठीण नाही, प्राप्तकर्तव्य करतील. कदाचित अशी वेळ येण्यापूर्वी गांधी मरूनही गेले असतील व अशा रीतीने त्यांची आडकाठी दूर होऊन इतरांना मार्ग मोकळा होईल. गांधी गेले तरी राष्ट्र राहणार आहे व त्याची परंपरा चाललीच पाहिजे.' राजवाडे हे शब्द बोलले त्याला आज जवळ जवळ सत्तर वर्षे झाली आहेत, आज राजवाडे नाहीत. पण, गांधीच्या उदयकाळी, राजवाडे यांनी गांधींच्या कारकीर्दीबद्दल जी भविष्ये केली ती किती खरी उतरली हे पाहिले, म्हणजे स्वतः राजकारण न करताही राजकारणातील भवि-ष्याचा वेध घेणाऱ्या त्यांच्या द्रष्टचा प्रतिभेचे आश्चर्य वाटल्याशिवाय राहत नाही, म्हणून, त्याची राजकारणावरील मते ही मते नसून, 'ऋषीणां पुनराद्यानां वाचमर्थोऽनुधावति !' अशा कोटीतील मंत्र-द्रष्टचा ऋषींची भविष्येच वाटतात. याचे आणखी एक उदाहरण देण्यासारखे आहे.

लाला लजपतराय व अजितसिंग यांना सैन्यात क्रांतीचा प्रचार करण्याच्या व परदेशात सैन्य उभारण्याच्या आरोपावरून सरकारने हद्दपार केले होते, राजवाड्यांनी त्यांची प्रशंसा करून म्हटले की, येथील लोकांस जर खरे स्वातंत्र्य व स्वराज्य हवे असेल तर ते त्यांना सशस्त्र क्रांतीनेच मिळविले पाहिजे व त्यासाठी हिंदी सैन्यात देशा-भिमानाचा संचार करून क्रान्तिकारकांनी त्यांचा पाठिंबा मिळविला पाहिजे, अथवा अन्य तऱ्हेने आपले सैन्य उभारले पाहिजे व त्यास इतर देशांतून शस्त्रास्त्रांचा पुरवठा केला पाहिजे.' राजवाडे यांचे हे विवेचन वाचताना सुभाषचन्द्रांच्या 'आझाद हिंद सेने' ची व १९४६ च्या नाविक उठावाची आठवण कोणास होणार नाही ? राजवाड्यांचे भारतीय स्वातंत्र्याचे हे निदान किती अचूक होते, याची साक्ष १९४७ चे ॲटलीने मांडलेले India InPependence billच देत आहे. इंग्लंड

हिंदुस्थानकडे सत्तान्तर करीत आहे, याचे कारण देताना ते विधेयक म्हणते,' Indian mecernary army is no louger loyal to Brtish empire–, १९०९ च्या मे महिन्यांत रियासतकार सरदेसाई यांना राजवाडे यांनी 'ब्रिटिश रियासत' लिहिण्याच्या दृष्टीने अठरा मुद्यांचे एक कालसूचीसारखे टिपण पाठविले होते. त्यातला अठरावा व शेवटचा मुद्दा असा आहे– १९५० यावर्षी ब्रिटिश साम्राज्याचा अस्त होईल.' याला म्हणतात द्रष्टेपणा !

मॅझिनीने म्हटले आहे, 'ज्या राष्ट्रांपुढे भविष्याची स्वप्ने नसतात, ती राष्ट्रे नष्ट होतात.' राष्ट्रापुढे भव्य आणि उत्तुंग स्वप्ने उभे करण्याचे काम अन्तर्भेदी प्रतिभेच्या द्रष्टया पुरुषांचे आणि विचारवंतांचे आहे. राजवाडे हे वस्तुस्थितीची स्वप्ने पाहणारे क्रान्तदर्शी प्रतिभेचे कवीच होते. त्यांचे शिष्योत्तम दत्तोपंत पोतदार यांनी 'अनंत अवकाशात पाहणाऱ्या त्यांच्या स्वप्नाळू डोळयाचा' निर्देश केला आहे, 'डोळे ही आत्म्यांची गवाक्षे होत' या न्यायाने त्यांच्या व्यक्तिमत्त्वाचा वेध घेणारा आहे. शिवाजीच्या महाराष्ट्रात संचार करणाऱ्या रामदासाला 'आनंदवन भुवना' चे भव्य आणि ऊर्जस्वल स्वप्न पडले होते. रामदासाच्या वाटेने जाणाऱ्या राजवाडयांना उद्याच्या हिंदुस्थानचे कोणते बरे स्वप्न दिसत होते ? ज्या काळात राजवाडे राहत होते व मुंडले यांच्याशी सुखसंवाद करीत होते, तो काळ ब्रिटिश साम्राज्यशाहीच्या उत्कर्षाचा होता. पण इंग्लंडशी संबंध येऊनही राजवाडयांना इंग्लंडची लोकसत्ता हिंदुस्थानात यावी असे वाटत नव्हते. कारण अज्ञानी, अशिक्षित व शास्त्राचा संस्कार नसलेली हिंदुस्थानची बहुसंख्य प्रजा, प्रजासत्ताक राज्याला पात्र नाही असे त्यांचे मत होते. त्यांच्या पुढे बिस्मार्क आणि कैसर यांच्या जर्मनीचा आदर्श होता. आपला देश, शस्त्र आणि शास्त्र यांनी संपन्न होऊन जर्मनीप्रमाणे बलाढ्य व्हावा असे, त्यांना वाटत होते. मुंडले म्हणतात, 'व्यक्तिमत्त्वास मत असणारी लोकशाही व तज्जन्य राज्ययंत्र हे त्यांच्या ( राजवाडयांच्या ) विचारकक्षेत केव्हाच नव्हते. फक्त वादविवाद व चर्चा करण्याचा हक्क असणारी लोकशाही लोकसभा,

लोकांच्या आशाआकांक्षा सत्ताधारी अधिकारी वर्गास कळून येण्यासाठी असाव्यात, पण खरी राजसत्ता तज्ज्ञ अशा मंत्री व अधिकारी मंडळाच्या हातीच असावी व त्यास सुसज्ज अशा तऱ्हेचे राज्ययंत्र (ऑलिगार्की) त्यांना पसंत होते व त्यासंबंधी जर्मनीचे उदाहरण देऊन ते आपल्या म्हणण्याचा खुलासा व समर्थन करीत असत. शास्त्र व शस्त्र ही आधुनिक युरोपीय राज्ययंत्राची मुख्य अंगे आहेत, पार्लमेन्टादी इतर अंगे ही केवळ शोभेकरिता आहेत, असे ते म्हणत. फ्रेंच क्रान्तिकारकांनी स्वातंत्र्य, समता व बंधुभाव या तत्त्वांची घोषणा केली ती फक्त युरोपीयन समाजापुरतीच होती; पण तिकडील बहुश्रुत सामान्य जनतेलाही ती तत्त्वे पेलता आली नाहीत. मग या देशातील निरक्षर व अज्ञ जनतेला ती कशी पेलता येणार ? त्यासाठी येथील जनता प्रथम साक्षर व सज्ञान केली पाहिजे व सुशिक्षित वर्गात भौतिक शास्त्रज्ञानाचा व शिस्तीचा जारीने प्रसार केला पाहिजे अशी त्यांची विचारसरणी होती.

संभाषणाइतके क्षणभंगूर दुसरे काहीच नाही. सुदैवाची गोष्ट अशी, की मुंडले यांच्याशी बोलण्यापुरतेच, राजवाडे यांचे हे विचार मर्यादित राहिले नाहीत. १९१५ साली मुंडले यांनी इटालियन देशभक्त कान्हुर यांचे चरित्र लिहिले. त्या चरित्राला राजवाडे यांनी प्रस्तावना लिहिली. त्या छोटया पण मार्मिक प्रस्तावनेत आपले हे राजकीय सिद्धान्त इतक्या सूत्रबद्ध भाषेत व्यक्त केले आहेत की, ती वाचली म्हणजे, 'मितच सारंच वचोही वाग्मिता.' थोडे पण अर्थगंभीर बोलणे यालाच भाषाप्रभुत्व म्हणतात या श्रीहर्षाच्या वचनाची आठवण होते. त्या प्रस्तावनेत राजवाडे म्हणतात,

'नुसत्याच्या एकटया स्वार्थत्यागानेच स्वराज्याची व स्वातंत्र्याची उपलब्धि होते अशी समजूत करून घेण्यात हाशील नाही. स्वार्थत्यागाचा योग्य परामर्श घेणारे कौशल्य जर देशात निपजले नाही, तर त्याग गाभडतो व जिवंत स्वातंत्र्याला प्रसविण्यास असमर्थ ठरतो. मिळविलेले स्वातंत्र्य व उभारलेले स्वराज्य चालविण्याचा एक धोपट मार्ग गेल्या दीडशे वर्षांत युरोपात व अमेरिकेत स्वीकारलेला दिसतो. हा

म्हणजे प्रतिनिधिसत्ताक पद्धतीने राज्य चालविणे. याहून उच्चतर व फलप्रदतर मार्ग अद्याप युरोपियन व अमेरिकन राष्ट्रांनी अमलात आणता येण्यासारखे असून क्वचित अमलात आणलेले दिसतात. वस्तुतः सत्ता तज्ज्ञ अशा निस्पृह कार्यकर्त्या लोकांच्या हाती ठेविली, तर स्वातंत्र्य व स्वराज्य ह्यांचा अवतार राष्ट्रात उत्तमोत्तम तऱ्हेने होईल. प्रतिनिधि सत्तेत जसे लोक, तसे त्यांनी निवडून दिलेले प्रतिनिधी असतात. लोक अज्ञ, दारूबाज, हक्काची जाणीव नसणारे व अशास्त्रज्ञ असले, तर त्यांनी निवडलेले प्रतिनिधी तज्ज्ञ, सद्‌गुणी व शास्त्रज्ञ असू शकणे प्रायः असंभवनीय असते. अशी स्थिती असल्यामुळे, युरोपियन व अमेरिकन राज्यसत्ता व्हाव्या तितक्या कार्यक्षम व प्रगामी झालेल्या दिसत नाहीत. सर्वाधिकारी राज्ययंत्रासुद्धा सर्व खाती जर तज्ज्ञांच्या हाती जातील, व खात्यातील लहानापासून थोरापर्यंत जर आपापल्या कामात आपापल्या पुरते तज्ज्ञ असतील तर महाराष्ट्रात जे एक अलौकिक सामर्थ्य उद्‌भूत होते, ते सामर्थ्य युरोपात एकाद्या देशात थोडे बहुत दिसू लागले असेल नसेल. तात्पर्य, राजसत्ता, महाजनसत्ता, व्यापारीसत्ता, प्रतिनिधिसत्ता इत्यादि सर्व सत्तांहून तज्ज्ञसत्ता ही श्रेष्ठतर आहे व ही उत्पन्न करण्याकडे जो मुत्सद्दी आपली करामत खर्चितो त्याला उत्तम राष्ट्रकार्य धुरंधर म्हणता येईल!'

'yet it cannot at last be confessed that as he owe everything to him, he owes something to us.' शेक्सपिअरचे ज्याप्रमाणे लोकांबरोबर ऋण आहे, त्याप्रमाणे लोकांचेही शेक्सपिअरवर ऋण आहे, असे जॉनसनने शेक्सपिअरबद्दल लिहिताना म्हटले आहे. राजवाडे व त्यांचे हे मुंडले, भट, कुलकर्णी, पंडित, शिराळकर इत्यादि ऋणानुबंधी यांच्या परस्पर संबंधाचे वर्णन याच शब्दांत करावे लागेल. ऋणानुबंध हा शब्दच मुळी सापेक्ष असतो. राजवाड्यांचे ऋण या लोकांवर मोठे होते. पण यांचेही राजवाड्यांवर काही कमी ऋण होते असे नाही. राजवाडे यांचे आयुष्य लौकिकदृष्ट्या सुखाला आणि आनंदाला पारखे झाले होते. मुंडले यांनी त्यांची

पत्रिका करण्यासाठी व फलज्योतिष पाहण्यासाठी त्यांची जन्मवेळ एकदा विचारली. राजवाडे यांनी वेळ सांगितली, पण ते म्हणाले, 'माझा भविष्यावर मुळीच विश्वास नाही. तुम्हाला वाटल्यास तुम्ही माझी कुंडली करून करमणूक करून घ्या.' परंतु, राजवाड्यांचा विश्वास नसला तरी मुंडल्यांनी वर्तवलेल्या त्यांच्या जन्मफलाचा आयुष्यभर त्यांना प्रत्यय येत गेला. मुंडले म्हणतात, 'मंगळ आणि शनि यांच्या दोषामुळे त्यांना नेहमी कष्ट, दारिद्र्य, मानसिक त्रास, संताप, अपमान इत्यादी सहन करावे लागले.' 'मनासारखे काहीच घडत नसल्यामुळे मी दुःखी आहे,' हा टिळकांनी गीतारहस्यांत वर्णिलेला प्रत्येक माणसाचा अनुभव राजवाड्यांनाही येत होता. आणि त्यातल्या त्यात त्यांचे दुःख वैयक्तिक नसून राष्ट्राच्या पारतंत्र्यामुळे आणि अधःपातामुळे निर्माण झाले असल्यामुळे त्यांच्या अपार दुःखाला कधीच अंत नव्हता असें म्हटले तरी चालेल. त्यांच्या संतापी स्वभावाचे हे एक कारण होते. भागवत म्हणतात, 'त्यांचे उदात्त विचार, विषय आक्रमण करण्याची अलोट बुद्धी, त्यांचे बुद्धीचे सर्वगामित्व, त्यांचा निरिच्छ, निर्भीड व निर्भय स्वभाव यायोगे त्यांना बाकीच्या लोकांबद्दल तिरस्कार वाटत होता.' परिस्थितीने मारलेल्या महत्त्वाकांक्षा त्यांनाही छळत होत्या. त्यांना रसायनशास्त्रवेत्ता व्हायचे होते पण दरिद्री पडल्यामुळे त्यांना इतिहाससंशोधक व्हावे लागले. त्याही पेक्षा देशाच्या पारतंत्र्यामुळे त्यांना जे होता आले असते, ते कधीच होता आले नाही याचे दुःख दारूण होते. अनेकदा ते मुंडले यांना म्हणाले, 'देश स्वतंत्र असता तर मी लष्करी पेशा पतकरून सेनापती झालो असतो !'

राजवाडे यांच्या अशा या दुःखमय जीवनात त्यांच्या ह्या मित्रांनी आनंदाचे क्षण आणले. आणि स्नेहाचे मळे शिंपले. त्यांनी त्यांना घरदार पाहून दिले, खाऊ–पिऊ घातले, आजारीपणात शुश्रूषा केली. एकाकीपणात सहवासाने आणि संभाषणांनी सोबत केली, त्यांची पुस्तके प्रकाशित केली. त्यांच्या लेखनासाठी म्हणून मुद्दाम मासिके

सुरू करून दिली. ' संसारताप तप्तानः त्रयो विश्रांति हेतवां । अपत्यंच कलत्रंच संतसंगतिरेवच ॥ असे कवीने म्हटले आहे. संसारतापाने संतप्त झालेल्या जीवांना विश्रांति देणाऱ्या तीन वस्तू आहेत. अपत्य, बायको व सज्जनांची संगती. राजवाड्यांची बायको मेली होती व मुलेही मेली होती. त्यामुळे त्यांच्या बाबतीत अपत्याचा किंवा कल–त्राचा प्रश्नच नव्हता. पण सज्जन संगतीचे सुख मात्र त्यांना भरपूर मिळाले. ते किती, याची इयत्ता करणे खरोखर कठीण आहे. जेथे माणसे जिवंतपणी मित्राला विसरतात, तेथे या लोकांनी राजवाडे जिवंत असताना तर त्यांना सोबत केलीच पण मेल्यानंतरही त्यांना ते विसरले नाहीत. मुंडले यांनी ' ब्राह्मण पत्रिके'चा ' राजवाडे तिलां–जली अंक ' राजवाडे यांच्या मृत्यूनंतर १९२७ च्या जानेवारीत काढला, तो आज साठ वर्षांनंतरही समकालीनाच्या दृष्टिकोनातून राजवाडे या दृष्टीने प्रमाणभूत आहे. भट यांनी तर मित्रऋण फेड–ण्याची सीमा गाठली.त्यांनी ' राजवाडे संशोधन मंदिर ' स्थापन करून राजवाड्यांचे स्मारक निर्माण केले. त्यात राजवाडे यांनी जमा केलेला ऐतिहासिक कागदपत्रांचा प्रचंड संग्रह दहा पेटया भरून सुर–क्षित ठेवला. राजवाडे यांनी लिहिलेले अक्षरन्–अक्षर छापून प्रसिद्ध केले.

रासवाडे यांच्या अखेरच्या इच्छेप्रमाणे ' संशोधन ' त्रैमासिक सुरू केले. ' राजवाडे पीपल्स को ऑपरेटिव्ह बँक ' स्थापन करून ' राज-वाडे संशोधन मंदिरा 'च्या संसार यात्रेची सोय करून ठेवली, आणि राजवाड्यांच्या मृत्यूनंतर वीस वर्षांनी, टिळकांच्या बाबतीत जसे केळकरांचे ' टिळक चरित्र ' त्याप्रमाणे राजवाड्यांच्या बाबतीत संदर्भ-कोशासारखे असलेले सातशे पानांचे ' राजवाडे चरित्र ' लिहून आपल्या ऋणविमोचनाच्या सोहळयावर कळस चढविला. कृ. पां. कुलकर्णी हे राजवाड्यांचे सर्वांत शेवटचे व सर्वांत धाकटे शिष्य. राजवाडे त्यांना म्हणतच, ' कुलकर्णी, तुम्ही माझे सर्वात कनिष्ठ व शेवटचे मित्र आहेत. आता पुढे मला मित्र करावयाचा नाही व कोणीही पण व्हावयाचा नाही.' पहिल्याच भेटीत राजवाडे यांनी

त्यांच्या जवळची व्युत्पत्त्यांच्या पाचणे चिट्ठयांची तीन-चार पुडकी त्यांच्या स्वाधीन केली व त्यांचा अभ्यास करून येण्यास सांगितले. राजवाडे यांच्या व्युत्पत्तीच्या व व्याकरणाच्या महासागरात 'नदीमुखेनत्व समुद्रमाविशत !' अशा नदीमार्गाने कुलकर्णी यांचा प्रवेश झाला. राजवाडे यांच्या मृत्यूनंतर, त्यांचा अपूर्ण राहिलेला 'धातुकोश' कुलकर्णी यांनी आपल्या विद्वत्तापूर्ण प्रस्तावनेसह प्रसिद्ध केला आणि गुरूचे ऋण फेडले. सूर्याच्या प्रखर प्रकाशात नक्षत्रे फिकी वाटावीत, त्याप्रमाणे राजवाड्यांच्या उत्तुंग व्यक्तिमत्त्वापुढे ही माणसे लहान वाटतात पण ती लहान नव्हती. आपापल्या क्षेत्रात ती मोठी व कर्तबगारच होती.

भट नामांकित वकील होते. कुलकर्णी प्राध्यापक व ग्रंथकार होते. देव समर्थ वाङ्मयाचे समर्थ संशोधक होते. मुंडले स्वयंभू राष्ट्रभक्त होते. या मोठ्या लोकात राजवाडे मोठे ठरले हेच त्यांचे मोठेपण होय. मोठ्या प्रतिभेची मोठी माणसे लहान मुलांसारखी अवखळ असतात. त्यांना या लोकांनी मित्राच्या समंजसपणाने व मातेच्या वात्सल्याने, त्यांचे सारे दोष पोटात घालून, अक्षरशः संभाळले आणि माणसाच्या कर्तृत्वाला ग्रासणाऱ्या सर्वभक्षक विस्मृतीपासून राजवाड्यांना वाचविले याबद्दल केवळ राजवाडेच नव्हे तर आपणसुद्धा त्यांचे ऋणी असले पाहिजे. हा भाषेचा अलंकार नाही–ही वस्तुस्थिती आहे. इतिहास, भाषाशास्त्र, व्याकरण, व्युत्पत्ती हे राजवाड्यांचे 'अलोक–सामान्य' विषय आणि 'लोकांस पाहयाचा आदर, तेथे यांचा अनादर' असा त्यांचा लोकविन्मुख स्वभाव. लोकांना सन्मानाचे वेड तर 'सन्मानात् ब्राह्मणो नित्यंमुद्विजेत' हा राजवाड्यांचा बाणा, काशीच्या 'भारत धर्म महामंडळ' ने 'पुरातत्त्व भूषण' म्हणून त्यांना पदवी दिली. तेव्हा त्या पदवीचे प्रमाणपत्र नळकांड्यासकट तिरस्काराने भिरकावून दिले. अशा विषयांना वाहिलेला असा मनुष्य लोकांच्या दृष्टीने जिवंतपणीच खरे बोलायचे म्हणजे मेल्यात जमा होता. मेल्यानंतर तर 'विद्यासेवक' मध्ये चिं. ग. कर्वे यांनी लिहिले आहे. ते वाचले म्हणजे, हे बोलणे कटू असले तरी अतिशयोक्तीचे

नाही, हे लक्षात येईल. 'त्यांच्या एककल्ली व सडेतोड वागणुकीमुळे त्यांचा प्रत्यक्ष परिचय फार थोडया लोकांना असे. चांगल्या सुशिक्षित पदवीधरांनाही राजवाडयांच्या मृत्यूमुळे त्यांचा बोलबाला होण्यापूर्वी त्यांचे नाव माहीत नव्हते किंवा त्यांचे अमोलिक देशकार्य मुळीच महत्त्वाचे असे वाटले नाही असे म्हटले तर पुष्कळांस आश्चर्य वाटले. पण तशी गोष्ट त्यांच्या मृत्यूची बातमी येण्यापूर्वी होती. याचे बव्हंशी कारण, त्यांचे ग्रंथ विद्यार्थ्यांच्या अभ्यासक्रमात पडत नाहीत व फारच थोडे लेखक आपल्या लेखनात 'मराठयांच्या इतिहासाची साधने' आधारादाखल घेतात, अशा स्थितीत 'कापुराची वाती उजळली दीप्ति। तशीच समाप्ती जाळी जैसी॥' अशा प्रकारे उजळलेल्या कापराप्रमाणे राजवाडयांच्या तेजस्वी जीवनाची व कार्याची समाप्ती झाली असती व जग त्यांना विसरूनही गेले असते.पण राजवाडयांच्या ग्रंथाप्रमाणे त्यांच्या ऋणानुबंधी स्नेहयांनी, राजवाडयांच्या मृत्यूनंतर-ही त्यांना जिवंत ठेविले. त्यांच्या शानयशवत स्वतःचे सर्वस्व समर्पण केले. राजवाडयांचे स्मारक झाले. पण या लोकांचे काहीच स्मारक झाले नाही. सैनिक लढतात पण यश सेनापतीला मिळते. 'सेनापति यशोरान्ना न तु योधान कदाचन!' सेनापतीच्या यशात सैनिकाचे यश असते. त्याप्रमाणे राजवाडे यांच्या स्मारकातच यांचे स्मारक आहे. राजवाडयांच्या स्नेहयाचा हा समर्पणशील स्नेहभाव पाहिला की, कविवर्य बोरकरांच्या शब्दात म्हणावेसे वाटते,

यज्ञी ज्यानी देउनि निजशिर।
घडिले मानवतेचे मंदिर।
परी जयांच्या दहनभूमिवर।
नाहि चिरा, नाही पणती।
तेथे कर माझे जुळती॥

राजवाडे यांच्या जीवनात पुण्याच्या 'भारत इतिहास संशोधक मंडळा' चे आणि 'भारत इतिहास संशोधक मंडळा' च्या इतिहासात राजवाडयांचे स्थान केवळ 'अनन्य' साधारण आहे. या मंडळाची निर्मिती

आणि त्या मंडळाचा राजवाडे यांच्या जीवनातील संयोग–वियोग, हा सगळाच प्रकार राजवाडे यांच्या स्वभावावर प्रकाश टाकणारा आहे.

जर कोणा एका ग्रंथकाराचा राजवाडे यांच्या आयुष्यावर दूरगामी आणि चिरस्थायी परिणाम झाला असेल, तर तो म्हणजे रामदास होय. 'रामदासा' वरील त्यांच्या मार्मिक निबंधाने मराठी विचारवंताच्या रामदासाकडे पाहण्याच्या दृष्टीत आमूलाग्र क्रांती घडवून आणली, आणि रामदासाने राजवाड्यांच्याही जीवनात नव्या कल्पनांचे बीजारोपण करून क्रांति घडवून आणली. 'मंडळीकरणा' ची संकल्पना राजवाडे यांनी रामदासाच्या 'दासबोधा' तून घेतली. 'रामदास' या निबंधात ते म्हणतात– 'सिद्धाने, साधकाने किंवा महानुभवाने समुदाय म्हणजे मंडळ्याच कां स्थापाव्यात, एकेकटच्या मनुष्याला उपदेश केला असता कार्य साधणार नाही की काय, असा येथे कोणी प्रश्न करील, तर ही शंका समर्थ पुढील ओवीत फेडतात, 'आपण अवचिते मरोन जावे। मग भजन कोणे करावे। या कारणे भजनास लावावे। बहुत लोक ॥' कोणतेही मत पूर्णपणे पसरण्यास व फलद्रूप होण्यास एकाकी मनुष्यापेक्षा अनेक मनुष्यांकरिता निरनिराळ्या मंडळांचा जास्त उपयोग होतो. एकटच्या दुकटच्या मनुष्याचे मनोगत हाती घेऊन विशेषसा कारभार उरकत नाही. महत्कार्यसिद्धी होण्याला बहुतांचे मनोगत हाती घेतले पाहिजे.' इंग्रजांशी टक्कर देण्यास विद्या व शास्त्रे यांचे ज्ञान आपल्या लोकांनी हस्तगत केले पाहिजे. आणि त्यासाठी मंडळे स्थापन करण्याशिवाय पर्याय नाही असे राजवाडे यांचे ठाम मत झाले होते. 'मंडळीकरणा' स 'यंत्रणा' हा त्याचा पर्याय शब्द आहे. त्यातून निभावण्यास भौतिकशास्त्रज्ञान, शौच धर्म, सुयंत्रणा पाहिजेत अति उत्तम प्रकारच्या, नाहीतर मृत्यू, सामाजिक मृत्यू येत चालला आहे व पूर्ण येईल.' देशस्थिति सुधारण्यासाठी नाना प्रकारच्या कार्यासाठी नाना प्रकारची मंडळे स्थापन करण्याचे व त्यासाठी योग्य व्यक्ती शोधण्याचे विचार त्यांच्या मनात अखंड घोळत असत. 'निरनिराळ्या विषयांविषयी त्यांच्या मनात जे विचार येत त्यांची टिपणे करून ठेवावयाचा त्यांचा परिपाठ होता.' अशा एका

टिपणात त्यांनी जी मंडळे संकल्पिली होती, त्यांची एक यादी दिली आहे. त्यात रसायनशास्त्र संस्था, विज्ञान मंडळ, भूगोल मंडळ, वनस्पती मंडळ, प्राणिशास्त्र मंडळ, मत्स्य मंडळ, स्त्री कल्याण मंडळ, संस्कार मंडळ, प्रवास मंडळ, बलुची टोळ्यांना घालवून देणारे मंडळ, वकील मंडळ, मुख्याध्यापक मंडळ, ब्राह्मण सभा, खोत सभा, सरदार मंडळ, मद्यबंदी मंडळ, अशा निरनिराळ्या एकूण पन्नास मंडळांची नावे आहेत. राजवाडे यांचे सामाजिक निरीक्षण किती सूक्ष्म आणि सर्वंकष होते व त्याची समाजाची विवंचना किती व्यापक होती याची ही यादी निदर्शक समजण्यास हरकत नाही. यातील अनेक मंडळे पुढे राजवाड्यांच्या मृत्यूनंतर निघाली त्यावरून राजवाड्यांची दूरदृष्टी लक्षात येईल.

यादी तर भली मोठी आहे परंतु या यादीतील विज्ञानमंडळ, आरोग्य मंडळ, शासन सूचक मंडळ अशी दोन-तीन मंडळेच राजवाडे काढू शकले आणि तीही मंडळे फार काळ टिकू शकली नाहीत. ' विज्ञान मंडळा ' स राजवाडे ' Poona Science Association ' असे म्हणत. प्रारंभी या मंडळाचे राजवाडे, विजापूरकर, डॉ. हरी श्रीकृष्ण देव, व केशवराव कानिटकर हे सभासद झाले. मंडळाच्या मासिक सभेपुढे भौतिकशास्त्रविषयक संशोधनात्मक लेख वाचण्यात यावे असे ठरले होते. सभासदत्वाची वार्षिक वर्गणी शंभर रुपये होती. राजवाड्यांच्या शिरस्त्याप्रमाणे पहिली शंभर रुपयाची वर्गणी त्यांनी स्वतः दिली. मंडळ वर्षभर चालले व भौतिकशास्त्राचे संशोधक व अभ्यासक नसल्यामुळे ते आपोआप बंद पडले. राजवाड्यांनी पुण्यास ' आरोग्य मंडळ ' काढले होते. त्याचे अध्यक्ष डॉ. देव होते. त्या मंडळाचा उद्देश हिंदी लोकांचे वैयक्तिक व सामुदायिक आरोग्य सुधारून त्यांचे रक्षण करणे व त्याचे द्वारा साथीच्या रोगाचे प्रसारास आळा घालणे, आणि त्याहीपेक्षा विशेष म्हणजे प्लेगसारख्या साथीच्या रोगाचा बीमोड करणारे वैद्यकीय शोध करणारे नामांकित विद्वान निर्माण व्हावेत हा होता.

प्लेग, इन्फ्लूएन्झा इत्यादी साथीच्या रोगांचा प्रसार इंग्लंडसारख्या

साम्राज्यवादी देशाकडून मुद्दाम हिंदुस्थान, चीन, आफ्रिका येथील लोकांस मारण्याकरिता व ते देश गोऱ्या लोकांस बक्षीस मोकळे करण्याकरिता केला जातो, असे राजवाडे यांचे मत होते व आपल्या म्हणण्यास 'Human Nature in politics' या ग्रॅहॅम वॉलेस या इंग्रज मुत्सद्यांच्या ग्रंथाचा ते आधार देत. त्यात तो स्पष्टच म्हणतो की, 'We are nearing the time when the extermination of races, if it is done at all, must be done deiberately.' ह्याही 'आरोग्य मंडळात' राजवाडे फार राहिले नाहीत. कारण त्यांच्या अपेक्षेप्रमाणे वैद्यकशास्त्रातले शोधक ते मंडळ निर्माण करू शकले नाही. डॉ. केतकर म्हणतात, ''आरोग्य मंडळा'च्या उत्पादकात राजवाडे होते. ही गोष्ट पुष्कळांस ठाऊकही नसेल. त्या मंडळातून त्यांनी अंग काढून घेण्याचे कारण, त्या मंडळाने म्युनिसिपालिटीच्या अध्यक्षावर फिर्यादी लावावयास सुरुवात करावी, हे धोरण धोरण इतर सभासदांस पटेना हे होय. त्यांनी शासनसूचक मंडळ काढण्याचे योजिले होते, पण ते निघालेच नाही. त्यांनी 'समाजशास्त्र मंडळ' काढले, ते एक वर्ष टिकले. नासिकला राजवाडे असताना हिंदू देवालयांची स्थिती सुधारण्यासाठी त्यांनी एक 'जीर्णोद्धारमंडळ' काढले. देवळांना सरकारी इमामे आहेत पण इनामदार देवळाची निगा राखीत नाहीत असे चौकशीअती राजवाडे यांना दिसून आले तेव्हा ही देवालये सरकारच्या पुराणवस्तु संशोधन खात्याने ताब्यात घ्यावी अशी त्यांनी खटपट सुरू केली. तेव्हा देवालयाचे इनामदार व वहिवाटदार यांनी विरोध करून राजवाड्यांचे 'जीर्णोद्धारमंडळ' बंद पाडले. राजवाड्यांनी संकल्पिलेल्या पन्नास व प्रत्यक्षात स्थापन केलेल्या चार-पाच मंडळांपैकी एकाच मंडळाने बाळसे धरले व ते आजपर्यंत टिकले, ते म्हणजे पुण्याचे 'भारत इतिहास संशोधक मंडळ' हे होय.

आरोग्यमंडळ, विज्ञानमंडळ, रेल्वे प्रवासी-मंडळ, जीर्णोद्धारमंडळ ही इतर सारी मंडळे राजवाडे यांना महत्त्वाची वाटत असली तरी

त्याच्याशी त्यांचा तसा संबंध, नाही म्हटले तरी, दूरचा व केवळ तटस्थ विचारवंतांचा– फार तर प्रवर्तकाचा होता. इतिहास मंडळाची गोष्ट तशी नव्हती. त्यांचे उमेदीचे सारे आयुष्य इतिहाससंशोधनात गेले होते व ठिकठिकाणच्या भावे, खरे, पारसनीस इत्यादी संशोधकांशी त्यांचा कमी जास्त परिचय होता. त्यामुळे या साऱ्या संशोधकांना एकत्र आणणाऱ्या मंडळाची कल्पना त्यांना विशेष जिव्हाळ्याची वाटणे साहजिकच होते. १९०५ साली त्यांनी ' मराठ्यांच्या इतिहासाच्या साधना 'चा सहावा खंड प्रसिद्ध केला. त्यात ' इतिहासमंडळा'-ची कल्पना त्यांनी प्रथम मांडली– ' एकेकाच्या सांनिपातिक तडफेने काम फार तुटपुंजे, असमाधानकारक व कनिष्ठ प्रतीचे होते, ही गोष्ट आज चाळीस वर्षांच्या अनुभवाने कायम ठरल्यासारखी आहे. तेव्हा संघशक्तीचा आश्रय करण्यावाचून उपाय नाही. ' कलौ संघः प्रकीर्तितः ।' एक इतिहासमंडळ स्थापिले पाहिजे. मंडळासारखा अव्याहतपणे काम चालण्यास दुसरा उपाय नाही. गेल्या वर्षात पाच-पंचवीस गृहस्थ मला असे भेटले की, ज्यांना इतिहासमंडळ स्थापण्याचे अगत्य वाटू लागले आहे व तत्प्रीत्यर्थ अल्पस्वल्पद्रव्य खर्चण्याची इच्छा उत्पन्न झाली आहे. अशा अगत्यवान, तज्ज्ञ व तदभिमानी लोकांनी एखादे इतिहासमंडळ स्थापिले व पै-पैसा फंडद्वारा द्रव्य जमविले तर कार्यभाग होणार आहे.'

मंडळ स्थापण्याचे मनात आल्यावर राजवाडे यांनी त्यासाठी पुणे शहर निवडले आणि पानिपतच्या युद्धात धारातीर्थी पतन पावलेले बळवंतराव मेहेंदळे यांच्या वंशांतील सरदार तात्यासाहेब मेहेंदळे यांचे सहकार्य त्यासाठी मिळविले, त्याबद्दल बोलताना ते एकदा भट यांना म्हणाले, ' भरतखंडाच्या इतिहासाच्या साधनांचे संशोधन करणारी संस्था स्थापन करण्याची आवश्यकता मला वाटू लागल्यावर ती संस्था कोठे व कोणाच्या सहकार्याने स्थापन करावयाची याविषयीची विवंचना माझ्या मनात सुरू झाली. पुणे शहर हे विद्येचे माहेरघर, पूर्वकाळची मराठ्यांची राजधानी व प्रस्तुतचे या शहराचे महत्त्व लक्षात घेऊन संस्था स्थापन करण्यास पुणे शहर हेच योग्य ठिकाण

आहे असे मी आपले मनाशी निश्चित केले. यानंतर सरदार तात्यासाहेब मेहेंदळे यांचा वाडा मंडळाच्या कचेरीकरिता मी पसंत केला. टेबले, खुर्च्या, दिवाबत्ती वगैरे मंडळाच्या कचेरीस लागणारे सर्व सामान त्यांच्या वाड्याच्या दिवाणखान्यात तयार होते. मंडळाच्या कचेरीकरिता ही जागा विनाभाड्याने मिळाल्यास काही एक खर्च नसतो, मंडळाची तात्काळ स्थापना करता येईल असे माझे मनात आले. सर्व पुणे शहरात तात्यासाहेबांइतका मंडळाचा सभासद होण्यास लायक गृहस्थ पुष्कळ विचाराअंती मला आढळला नाही. निरनिराळ्या विषयांवरील नामांकित ग्रंथांचे तात्यासाहेबांचे वाचन गाढ होते. इतिहासप्रसिद्ध आप्पा बळवंत मेहेंदळे, पेशव्यांचे नातेवाईक यांचे तात्यासाहेब हे वंशज होते.'

राजवाडे व मेहेंदळे हे डेक्कन कॉलेजात सहाध्यायी होते. पुढे आयुष्यात त्यांचे मार्ग भिन्न झाले. अनेक वर्षांनंतर त्यांची गाठ पडली ती पुण्याला नंदर्गीकर शास्त्र्यांच्या घरी, राजवाडे यांना भेटायला म्हणून मेहेंदळे गेले तेव्हा राजवाडे, शास्त्रीबुवा वगैरे मंडळी जेवत होती म्हणून मेहेंदळे माडीवर जाऊन बसले. थोड्या वेळाने जेवून राजवाडे वर आले, ते ढोपरापर्यंत लहानशी धाबळी नेसले होते. ते मेहेंदळे यांना म्हणाले, ' विजापूरकर कैदेत गेले; त्यांची मासिके बुडाली. ' सरस्वती मंदिर ' ही द्रव्याभावी बंद पडले. पारसनीसांचे व आमचे फारसे सख्य नाहीच. ' महाराष्ट्र कवी 'ही बंदच आहे. तेव्हा हे इतिहासाचे काम आता मरते. तेव्हा तुम्ही काही द्रव्य खर्चता व काही मेहनत करता का ?' राजवाडे व मेहेंदळे यांची ही मंडळाच्या बाबतीत पहिली भेट. दर आठ-पंधरा दिवसांनी राजवाडे पुण्यास येत व मेहेंदळ्यांशी चर्चा करीत. यापुढे उद्योग करावयाचा तो एकट्याचा नसावा व त्यात राजकारण, सामाजिक सुधारणा वगैरे कसलीही भेसळ असू नये असे ठरले. मतभेदाला आमंत्रण देणारे मत प्रकाशनसंशोधनात नसावे व खरा भर फॅक्ट-फाइंडिंगवर द्यावा हेही ठरले. दर आठ-पंधरा दिवसांनी निरनिराळ्या व्यक्तींशी चर्चा करून राजवाडे मेहेंदळ्यांकडे येत व निरनिराळ्या कल्पना काढीत. पण

मंडळ काही निघेना. अखेर एक दिवस अचानक राजवाडे आले व म्हणाले, ' मंडळ स्थापावयाचे. निदान आपण दोघांनी काय करायचे ते करू लागायचे म्हणून ठरले ना ?' मेहेंदळे म्हणाले, ' हो,' ताबडतोब राजवाडे म्हणाले, ' मग आजच मंडळ स्थापू !' मेहेंदळ्यांना हे सर्वस्वी अनपेक्षित होते. ते थोडे गडबडले. चार-दोन माणसे बोलावून मग मंडळ सुरू करावे ही त्यांची कल्पना. पण राजवाडे म्हणाले, ' आपल्या दोघांचा एक विचार ठरण्यास इतके दिवस लागले. तेव्हा आम्ही विचार ठरवून काय करावयाचे ते सुरू केले आहे. आता तुम्ही हे पटत असेल तर आत या, असे दुसऱ्यास सांगू.' मेहेंदळे यांनाही ते म्हणणे पटले. त्या दिवशी गुरुपुष्य होते. दिनशुद्धीही होती. म्हणून राजवाडे व मेहेंदळे त्यांच्या दिवाणखान्यात समोरासमोर बसले. राजवाडे यांनी खिशात ' कर्तरित्रय ' हा निबंध आणला होता, तो वाचला. याच वेळी विनायक नीळकंठ नातु आले होते. त्यांस मंडळाचे सभासद करून घेण्यात आले. अशा प्रकारे आज वटवृक्षाप्रमाणे विस्तृत आणि ख्यातकीर्त झालेल्या ' भारत इतिहास संशोधक मंडळा 'चा एक वक्ता आणि एक श्रोता, अशा सुसज्ज सामग्रीनिशी, त्या ऐतिहासिक क्षणी प्रारंभ झाला.

' इवलेसे रोप लावियेले दारी । त्याचा वेलु गेला गगनावरी ' ही ज्ञानेश्वरांची प्रसिद्ध उक्ति भारत इतिहास संशोधक मंडळाचा जो पुढे विस्तार होत गेला त्याला चांगली लागू पडते. राजवाडे व मेहेंदळे या दोघांपासून सुरू झालेल्या त्या मंडळास पुढे ग. त्र्यं. जोशी, न. चिं. केळकर, ल. रा. पांगारकर, हरिभाऊ आपटे, दत्तोपंत आपटे, हरिभाऊ लिमये, वासुदेवशास्त्री खरे, गुप्ते प्रभृति त्यावेळचे पुण्यातले नामांकित लोक येऊन मिळाले. रावबहादुर काशिनाथ नारायण साने हे अध्यक्ष झाले. दत्तोपंत पोतदार हे राजवाडे यांचे डेक्कन कॉलेजातील सहाध्यायी वामनराव पोतदार यांचे चिरंजीव. राजवाड्यांचा त्यांच्यावर पुत्रवत लोभ होता. राजवाडे यांनी भट यांना एकदा सांगितल्याप्रमाणे इतिहास संशोधनाच्या कार्याप्रीत्यर्थ शिष्य या नात्याने दत्तोपंतांना त्यांच्या वडिलांपासून, राजवाड्यांनी, मागून, घेतले

होते. त्यांनी या मंडळाच्या कामास स्वतःस वाहून घेतले होते. १९१० साली मंडळ स्थापन झाले होते. त्या काळी पुण्यात जहाल आणि नेमस्त हा पक्षभेद विकोपाला पोचला होता. पण त्याची कसलीही बाधा मंडळाला झाली नाही. कारण अशा मंडळाच्या बाबतीत राजवाडे यांचा दंडकच होता, की, 'देशातील राजकीय पक्षांच्या तंट्यात निष्कारण न पडता मंडळाच्या सभासदांनी लोकजागृतीचे व लोकशिक्षणाचे काम हाती घ्यावे,' मंडळाचा दुसराही दंडक असाच होता. पुराव्याशिवाय काही बोलण्याला व लिहिण्याला बंदी होती. 'ना मूलं लिख्यते किंचिन्नानपेक्षितमुच्यते।' ही मल्लिनाथाची प्रतिज्ञा मंडळाचीही होती. त्यामुळे थोड्या पुराव्यावर भरमसाट विधाने करणाऱ्यांची मोठी पंचाईत होत असे. पांगारकरांना अशीच थोड्या पुराव्यावर फार व्याख्यान करण्याची सवय होती. ती सवय वस्तुनिष्ठ संशोधनावर कटाक्ष ठेवणाऱ्या मंडळात त्यांना नडू लागली. त्यामुळे चार-पाच सभांनंतर त्यांनी मंडळाच्या पाक्षिक सभांना येणेच बंद करून टाकले. मंडळ सहकारी मदतीवर न चालता सभासदांच्या वर्गणीवर चालणार होते. शके १८३५ च्या पहिल्या संमेलनात शंकरराव देव यांनी वर्गणी जसविण्यासंबंधीचा ठराव मांडला. त्या ठरावावर राजवाडे यांनी भाषण केले. संस्था स्थापू इच्छिणाऱ्या इतिहाससंशोधकाच्या मनोव्यापारांचे चित्रण या दृष्टीने राजवाडे यांचे हे भाषण महत्त्वाचे आहे. ते म्हणाले, 'रा. कीर्तने यांची बखरीवरील टीका प्रसिद्ध झाल्यावर 'विविधज्ञान विस्तारा'तून दोन बखरी प्रसिद्ध झाल्या. त्यानंतर आपले सन्माननीय अध्यक्ष यांनी कोणापासूनही कसल्याही मदतीची अपेक्षा न करता ४०।४२ बखरी छापल्या. त्यानंतर मिरजेचे रा. खरे आले. त्यांनी आपले घरदार विकून पटवर्धनी दप्तर छापण्याचा स्तुत्य उद्योग सुरू केला. रा. ब. पारसनीस हे आपला संसार करून हे कार्य करीत आहेत. मीही माझ्या मित्राच्या मदतीने वर्ष-दोन वर्षांनी एकादा खंड काढतो. परंतु हे सर्व प्रयत्न सर्वांशी तुटक झाले व या कार्यात आम्हास त्यावेळी प्रसिद्ध असलेल्या अशा कोणाही मोठ्या मनुष्याचे अगर संस्थानिकांचे अगर इतर

कोणाचे साहाय्य झाले नाही. आम्हा प्रत्येकास कागदपत्र उठवून काढण्यापासून तो पुस्तके विकून पैसे वसूल करीपर्यंतच्या सर्व विवंचना कराव्या लागल्या आहेत. यामुळे वेळाचा कितीतरी अपव्यय होतो व प्रगति तर अति मंद गतीने होते. तेव्हा आपला झाला परंतु आपणा पाठीमागून जे गृहस्थ हे कार्य करण्यास प्रवृत्त होतील त्यांच्या कालाचा अपव्यय होऊन आयुष्य फुकट जाऊ नये व कार्य तर त्वरित व्हावे, अशासाठी काय योजना निर्माण करावी या विवंचनेत मी असता, माझी व मेहेंदळे यांची गाठ पडली; व चमत्कार असा की त्यांनीच होऊन मला विचारले की, संघटित स्वरूपाचे काम करण्यासारखी एखादी संस्था निर्माण करता येईल का ? वस्तुत: हे इतिहासाचे काम पूर्वीच्या इतिहासप्रसिद्ध लोकांच्या वंशजांचे आहे. हे एक प्रकारचे पितृकार्य आहे; व ते करण्यास त्यांच्यातीलच एक मनुष्य तयार झाल्याचे पाहून मला आनंद झाला. अशा रीतीने आम्हा उभयतांच्या विचाराने व आपले पहिले अध्यक्ष रा. ब. गणपतराव जोशी व आपले सध्याचे सन्माननीय अध्यक्ष यांच्या प्रोत्साहनाने सदरहू संस्था स्थापन झाली. रा. ब. रानडे यांनी अनेक संस्था निर्माण केल्या. परंतु त्यांनी आपल्या मंडळासारखी संस्था निर्माण केली नाही. हे खरोखरच, आपले, आपल्या देशाचे दुर्दैव होय. अशी जर एखादी संस्था त्या वेळी निर्माण झाली असती व जर अशा संस्थेच्या कृपेच्या छत्राखाली माझ्यासारख्यास काम करावयास मिळून जितके जरूर तितके स्वास्थ्य असते तर आपणास अतिशयोक्ती वाटेल म्हणून सहस्रपट म्हणत नाही, पण शतपट काम मी सहज उरकले असते. यद्यपी आपण आजवर केलेले काम अति अल्प आहे, तरी संशोधकांनी आपली जबाबदारी ओळखून सुव्यवस्थितपणे काम केले तर आपण खचितच हे कार्य चांगल्या नावारूपास आणू. अद्यापी माझी प्राप्ती अति अल्प आहे, वस्तुत: काही नाही म्हटले तरी चालेल, परंतु माझ्या बंधूंच्या कृपेने मला जो अल्पस्वल्प पैसा मिळतो, त्यातून माझ्या पाठीमागून येणाऱ्या संशोधकांचा मार्ग सुलभ व्हावा, म्हणून मी सालांत २५ रुपये कार्यास देतो.'

मंडळाची स्थापना झाली तेव्हा राजवाडे पुण्याजवळील तळेगाव दाभाडे येथे राहात असत. धुळ्याला उन्हाळा सुरू झाला की, ते तळेगावला तेथील हवा थंड असल्याकारणाने प्रयाण करीत. परत जून जुलैमध्ये धुळ्याला येत ते फेब्रुवारी-मार्चपर्यंत धुळ्यास राहात. धुळ्यालाही दोन-तीन महिने झाले की त्यांना कंटाळा येई व दीड-दोन महिने दूरचा प्रवास करून येत व परत दोन-तीन महिने राहत. वीस वर्षांत फक्त एक वर्ष ते भर उन्हाळ्यात धुळ्यास राहिले. त्या वेळी कुंभाराच्या भट्टीची उपमा धुळ्याच्या उन्हाळ्यास देऊन ते म्हणाले, 'सर्व शरीर विटंसारखे भाजून निघते.' तळेगावला नाना मास्तर नावाचे एक गृहस्थ होते. ते राजवाड्यांची सर्व व्यवस्था त्यांच्या मनाजोगती करीत. ते १९१८ साली इन्स्फ्ल्युझाने मृत्यू पावले. तोपर्यंत राजवाडे यांचा मुक्काम तळेगावी वर्षांतून वरेच दिवस जाऊन-येऊन होत असे. राजवाड्यांना मूलबाळ नव्हते. मंडळ हेच त्यांचे अपत्य होते. कासवीचे आपल्या पिलांवर लक्ष असते तसे कोठेही असले तरी राजवाड्यांचे लक्ष मंडळावर असे. एकदा ते भट यांना म्हणाले, 'मी तळेगाव दाभाड्यास राहात असे. आपल्या पदरचे भाडे खर्च करून मंडळांच्या पाक्षिक सभेस नियमितपणे हजर राहून निबंध वाचीत असे. याप्रमाणे मी पदरची झीज सोसून मंडळाचा उत्कर्ष केला.' पहिल्या पाच वर्षांत मंडळाच्या निरनिराळ्या सभासदांनी ५५४ निबंध वाचले. त्यातील एकट्या राजवाड्यांचे निबंध दोनशे आहेत. थोड्या काळात मंडळाला जो श्रेष्ठ दर्जा प्राप्त झाला, त्याचे मोठे श्रेय राजवाड्यांचे आहे, कारण राजवाड्यांचे हे निबंध केवळ संख्येनेच नव्हे तर गुणवत्तेनेही श्रेष्ठ दर्जाचे आहेत.

१९१६ च्या मे महिन्यात मंडळाचे मोठ्या थाटाने तीन दिवस वार्षिक संमेलन झाले. देव, भट, चांदोरकर हे राजवाडे यांचे धुळेकर स्नेही प्रथमपासून मंडळाचे सभासद होते. त्यांनी व इतरांनी व राजवाडे यांनीही निबंध वाचले. या संमेलनास पुण्यातील व पुण्याबाहेरील अनेक प्रसिद्ध संशोधक सभासद व प्रतिष्ठित उपस्थित होते. संमेल-

नाच्या शेवटच्या दिवशी तात्यासाहेब मेहेंदळे यांनी उपस्थितास थाटाची मेजवानी दिली. समारोपाच्या प्रसंगी राजवाडे यांनी भाषण केले, त्यात ते म्हणाले, की, ' एकंदरीने पाहता, जगातील इतर ऐतिहासिक संस्थांच्या निबंधाच्या तोलाचे निबंध आपल्या संमेलनात वाचण्यात आले. नवीन मंडळीची कामगिरी पाहून थट्टेने नव्हे तर परमार्थतः बोलतो, की, जुन्यांनी संस्था सोडली तरी चालेल. आपले चिटणीस श्री. तात्यासाहेब मेहेंदळे यांचे काम फार उत्तम झाले. आपले अध्यक्ष रा. ब. साने यांचे आपण अवश्य आभार मानले पाहिजेत. असले अध्यक्ष दहावीस वर्षे असावेत, आपल्या संशोधकांनी साठ साठ वर्षे कामे करावीत व इतिहाससंशोधनच करावे असे नाही, तर इतिहास करून दाखवावे.'

स्तुती करण्याच्या बाबतीत राजवाडे कृपण नव्हते तरी, कोणाचीही अवाजवी स्तुती करणे त्यांच्या, ' यदृच्छा लाभतुष्टस्य तेजो विप्रस्य वर्धते ।' अशा निःस्पृह स्वभावात बसण्यासारखे नव्हते. त्यामुळे, भारत इतिहास संशोधक मंडळाच्या कार्याचा व कार्यकर्त्यांचा या भाषणात जो त्यांनी मुक्त कंठाने गौरव केला, यावरून गेली अनेक वर्षे त्यांनी स्वप्न पाहिले होते, व नंतर ज्याच्यासाठी हाडाची काडे केली होती, त्या इतिहाससंशोधनाच्या संस्थेला आलेल्या फलप्राप्तीमुळे, त्यांच्या मनाला जो संतोष आणि जी कृतार्थता वाटत होती, ती त्यांच्या या भाषणातून व्यक्त होत होती, अशी कुणी कल्पना केली असती, तर ती चुकीची ठरली नसती. पण दुर्दैवाने वस्तुस्थिती अगदी उलट होती. संमेलन मे महिन्यात आटोपून राजवाडे, आणि भट, देव, आणि चांदोरकर ही मंडळी धुळयास परत आली आणि राजवाडे यांनी मंडळाच्या अंतःस्थितीविषयी कित्येक गोष्टी धुळेकर मंडळीस सांगितल्या. त्यांपैकी मुख्य ही होती की, मंडळाचे सभासद जरी वाढत गेले होते तरी सभासदांची वर्गणी व संस्थेचा जमाखर्च व इतर व्यवहार याबाबत अत्यंत गोंधळ होता. मंडळाच्या स्थापनेपासून आजतागायत मंडळाचे हिशेब ठेवण्यात आले नव्हते. कित्येक सभासदांकडे वर्गण्यांच्या दोन-दोन वर्षांच्या

थकबाकया राहिल्या होत्या व त्या वसूल करण्याची कोणतीही व्यवस्था होत नव्हती. मंडळाचे चिटणीस तात्यासाहेब मेहेंदळे होते व त्यांच्या विश्वासातल्या एका आश्रित विद्यार्थ्याच्या हाती हा सर्व आर्थिक कारभार होता. त्या विद्यार्थ्याबद्दल तक्रार करणे म्हणजे मेहेंदळ्यांवर गैरविश्वास दाखविण्यासारखे होते व त्यांना दुखवायचे नसेल, तर मंडळाच्या आर्थिक कारभाराचा ब्रह्मघोळ निस्तरणे दुरा-पास्त होते. त्यामुळे आपल्या भाषणात जरी राजवाडे म्हणाले, की 'आपले चिटणीस तात्यासाहेब मेहेंदळे यांचे काम फार उत्तम झाले' तरी मेहेंदळे यांच्या कामाविरुद्ध त्यांचे मत झाले व नानासाहेब देव यांनी चिटणीस व्हावे असा हट्ट त्यांनी धरला. देवांनी त्याला संमती दिली नाही. ते म्हणाले, 'संस्था पुण्यास, मी रहाणार धुळ्यास, ही गोष्ट लक्षात घेता मला मंडळाचे चिटणीस होणे अशक्य आहे.' राजवाडे यांच्या मनाचा संबंध अनुकूलतेपासून प्रतिकूलतेच्या दुसऱ्या टोकाला, मंडळाच्या बाबतीत कसा गेला होता, हे यावरून दिसून येईल, भट म्हणतात ते खरे आहे–'एखाद्या नादिष्ट लहान मुला-सारखा राजवाड्यांचा स्वभाव होता. एकदा एखादी गोष्ट त्याच्या मनांत आली की, रात्रंदिवस उठल्या बसल्या मंडळी एकत्र जमली की त्या गोष्टीशिवाय ते दुसरे बोलणे काढीत नसत–'

राजवाडे यांची आणखी एक तक्रार होती. ती म्हणजे, ते जे निबंध व टिपणे लिहीत, त्यांच्या प्रकाशनाबाबत मंडळाकडून अक्षम्य दिरंगाई होई. त्या बाबतीत मंडळाच्या पदाधिकाऱ्यांशी राजवाड्यांची धुसफूस गेले वर्षभर चालू होती. राजवाडे म्हणत, 'मी काही स्वतःच्या चरितार्थाचा धंदा करीत नाही. नाना विषयांवरील ग्रंथांचे वाचन, मनन व विचार हा माझा व्यवसाय आहे. माझ्या मननात व चिंतनात मला सुचलेल्या अनेक विषयांवर लेख, निबंध व टिपणे मी लिहीत असतो. या लेखाची तत्काल प्रसिद्धी होऊन देशा-तील संशोधकांस त्याची ओळख व्हावी व त्याचे योगाने संशोधनाची प्रगती व्हावी अशी माझी अपेक्षा व उत्कट इच्छा असते. परंतु मंड-ळाचे प्रकाशनकार्य रेंगाळत संथपणे चालत असल्यामुळे ही माझी

इच्छा सफल होत नाही. मी लिहिलेले लेख सहा सहा महिने मंडळाच्या दप्तरात धूळ खात पडून राहतात. ते लेख प्रसिद्ध न झाले तर त्यांचा उपयोग काय ?'

राजवाड्यांची ही तक्रार दुर्लक्ष करण्यासारखी नव्हती. त्यांच्यासाठी मंडळाने मंडळाचे इतिवृत्त धुळ्यास आतमाराम मुद्रणालयात चांदोरकरांच्या देखरेखीखाली छापण्याचा व ते इतिवृत्त छापून प्रसिद्ध करण्याकरिता देव, भट, चांदोरकर यांची समिती नेमण्याचा ठरावही केला. पण या तात्पुरत्या उपाययोजनेने मूळ मतभेद मिटले नाहीत. विशेषत: राजवाडे यांनी मंडळाच्या आर्थिक वैगुण्यावर जे बोट ठेवले व मेहेंदळे यांच्यावर जो अविश्वास व्यक्त केला, आणि त्यांच्या धुळेकर मित्रांनी राजवाड्यांची जी बाजू घेतली, त्यामुळे पुणेकर मंडळींची मने दुखवली गेली. त्यात आणखी एका प्रकरणामुळे भर पडली. १९१६ च्या मंडळाच्या संमेलनात राजवाडे यांनी यांनी 'गागाभट कृत शिवराजप्रशस्ति व कायस्थ धर्मदीप' हा निबंध वाचला. त्या निबंधामुळे कायस्थ प्रभू समाजात मोठीच खळबळ माजली व काहींनी हा निबंध मंडळाच्या सभेत राजवाड्यांना वाचू दिल्याबद्दल भारत इतिहास संशोधक अधिकाऱ्यास जाब विचारला. असाच प्रसंग 'हिंदु समाजात हिंद्वेतरांचा प्रवेश' या राजवाड्यांच्या निबंधामुळे आला. त्यातील विधानामुळे दुखावलेल्या काही मुसलमान मंडळींनी मंडळाकडे तक्रार केली. मंडळावर संकट आणणारे असले अनवस्था प्रसंग टाळण्यासाठी मंडळाने, मंडळापुढे वाचल्या जाणाऱ्या निबंधाची तपासणी करणारी एक उपसमिती नेमली व या समितीने पसंत केलेले निबंधच मंडळापुढे वाचण्यात यावेत व प्रसिद्ध करण्यात यावेत असा ठराव केला. मंडळाच्या सुरक्षिततेच्या दृष्टीने हा ठराव योग्यच होता, पण राजवाडे यांच्यासारख्या 'सर्वतंत्र स्वतंत्र' माणसाला असले 'प्रसिद्धीपूर्व नियंत्रण' कधीच मान्य होण्यासारखे नव्हते. अशा स्थितीत, राजवाडे यांच्याकडे वर्गणीची बाकी रुपये पस्तीस होती, ती ताबडतोब देण्यात यावी, असे मंडळाचे चिटणीस मेहेंदळे व पोतदार यांच्या सहीचे पत्र

राजवाडे यांना आले. राजवाडे यांची आर्थिक स्थिती सर्वांना माहीत होती. पण मंडळाच्या सभासदांकडे थकलेल्या वर्गणीच्या बाक्या ताबडतोब वसूल करण्याचा चिटणीसांनी प्रयत्न करावा, अशी राजवाडे यांनी जी सूचना केली होती, तिला मंडळाचे हे उत्तर होते. पुढे राजवाड्यांना वर्गणीची माफी असणारे 'सन्माननीय सभासद' करून घेण्याचा ठराव मंडळाने केला हे खरे आहे. पण या एकंदर प्रकारावरून परस्परांची मने एकमेकांबद्दल किती कलुषित झाली होती हे दिसून येते. राजवाड्यांचे मन तर मंडळावरून पार उडाले. त्यांचे शिष्योत्तम दत्तोपंत पोतदार यांनी मंडळाची स्थिती सुधारली. हिशेब मार्गी लावले, कचेरीसाठी स्वतंत्र जागा पाहिली, आणि राजवाडे यांचे मन प्रसन्न करण्याची पराकाष्ठा केली. पण काही उपयोग झाला नाही. १९१६ पासून अखेरपर्यंत राजवाडे मंडळाच्या वार्षिक अगर पाक्षिक सभेस उपस्थित झाले नाहीत व मंडळाच्या कोणत्याही कार्यांत त्यांनी भाग घेतला नाही. 'फुटले मोती तुटले मन। साधू न शके विधाता।' असे मुक्तेश्वराने म्हटले आहे, ते त्यांच्या बाबतीत खरे झाले.

अशा प्रकारे राजवाडे यांचा भारत इतिहास संशोधक मंडळाशी असलेला संबंध संपला. झाला हा प्रकार, राजवाडे आणि मंडळ या दोघांनाही मोठ्या दुःखाचा आणि दुर्दैवाचा ठरला. संस्था राजवाड्यांना अपत्यवत् असल्यामुळे, तिचा निरोप घेताना, जन्मदात्या बापाला गृहकलहामुळे व मतभेदामुळे मुलापासून विभक्त होताना ज्या यातना होतात, त्या राजवाड्यांना झाल्या असणे साहजिक आहे. पण शांतपणे विचार करिता टाळी एका हाताने वाजत नाही या न्यायाने, या ताटातुटीला संस्थाचालकांइतकेच राजवाडेही काही प्रमाणात जबाबदार आहेत असे म्हणणे भाग आहे. कारण प्रारंभापासून तेही संस्थाचालकांपैकीच एक होते आणि मेहेंदळे यांना चिटणीस करण्यात व त्यांच्या वाड्यात मंडळाची कचेरी ठेवण्यात त्यांचाच आग्रह होता. मेहेंदळे यांचा व त्यांचा परिचय चांगला होता व त्यामुळे त्यांच्या आर्थिक कारभाराबद्दल एखाद्या अनभिज्ञाप्रमाणे

तक्रार त्यांनी करणे तरी वाजवी नव्हते. केळकर वगैरे मंडळातले काही लोक त्यांना आवडत नव्हते पण म्हणून एका व्यक्तीच्या, मग ती व्यक्ती कितीही मोठी असो, रागद्वेषावर संस्था चालवणे काही योग्य नव्हते. ज्या वर्गणीच्या थकबाकीबद्दल राजवाड्यांनी तक्रार केली होती, ती थकबाकी त्यांच्याकडेही निघत होतीच. दत्तोपंत पोतदारांचे वर्तन राजवाडे यांना पसंत नसले तरी पोतदारांची संस्था सुधारण्याची इच्छा प्रामाणिकपणाची नव्हती असे कसे म्हणता येईल ? मेहेंदळे, केळकर, साने ही पुण्यातील प्रतिष्ठित माणसे होती. त्यांना न दुखविता संस्था चालवणे पोतदारांना भाग होते, नव्हे, तेच बरोबर होते. संस्था चालवणाऱ्या माणसाला दहा प्रकारची माणसे सांभाळावी लागतात. 'अति सर्वत्र वर्जावे । प्रसंग पाहोनी वर्तावे । हट निग्रही न पडावे । विवेकी पुरुषि ॥' हा संस्था चालकांचा विवेक पोतदारांनी सांभाळला म्हणून भारत इतिहास संशोधक मंडळाला अखिल भारतीय प्रतिष्ठा मिळाली आणि शं. ना. जोशी, शेजवलकर, द. वि. आपटे, य. न. केळकर, ग. ह. खरे असे नामांकित संशोधक संस्थेने निर्माण केले.

किंबहुना, राजवाडे यांनी एके ठिकाणी काढलेले उद्गार राजवाडे यांच्यापेक्षाही पोतदार यांना चांगले लागू पडतात.' केवळ संस्था काढणाऱ्यापेक्षा ती उमेदीने, विनयाने व इष्ट हेतू साधण्याच्या कामी अविरत श्रमसायासाने चालविणाऱ्याची थोरवी बेसुमार असते. भिक्षेकऱ्यांना पोरे फार निपजविण्याची शक्ती व सोय असते म्हणतात, पण त्याचे उत्तम नागरिक बनविणारे आचार्य दुर्मिळ असतात.' म्हणून राजवाडे यांचे एकनिष्ठ पण डोळस भक्त असलेले पोतदार यांनी राजवाडे यांच्याबद्दल या प्रकरणात जे उद्गार काढले आहेत, तेच अखेर समर्पक आहेत, असे म्हणणे भाग आहे. ' राजवाडे माझे गुरु आहेत, मला वंद्य आहेत, विद्वान आहेत, थोर आहेत, कष्टाळू आहेत, स्वार्थत्यागी आहेत, बुद्धिमंत आहेत, निश्चयी आहेत, एकनिष्ठ आहेत, विभूती आहेत, अद्वितीय आहेत, त्यांच्या राष्ट्रसेवेला तोड नाही, त्यांचा मी कट्टर भक्त आहे हे किती वेळा लिहू ? त्यांच्या

संगतीत मी कित्येक वर्षे काढलेली आहेत. इतके आहे तरी त्याचे दोष हेही गुणच आहेत असे म्हणण्यास मी तयार नाही. त्यांचा संशय-खोरपणा, त्यांचा एककल्लीपणा, त्यांचा हट्ट हे नेहमीच चांगले असे मी म्हणणार नाही.'

खरी गोष्ट अशी होती की अगदी संशोधकाची आणि अभ्यास-कांची संस्था असली तरी अशाही संस्थेला लोकव्यवहाराचे अष्टाव-धान संभाळणारा जो अष्टपैलू स्वभाव संस्थाचालकाचा असावा लागतो, तो राजवाड्यांचा नव्हता. त्यांचा पिंड वाचन, लेखन, चिंतन यात जीवन वेचणाऱ्या अंतर्मुख व आत्मनिष्ठ एकांतप्रिय अभ्यासकाचा व विचारवंताचा होता. त्यामुळे संस्था काढण्यामागची त्यांची तळ-मळ उत्कट असली व संस्थेच्या सुधारणेसंबंधी त्यांनी केलेल्या सूचना प्रामाणिक असल्या तरी अखेर 'प्रकृतित्वा नियोक्ष्यति' या गीता-वचनाप्रमाणे राजवाडे यांचा हा मूळ स्वभाव निर्णायक ठरला आणि स्वतः स्थापन केलेल्या मंडळातून जवळ जवळ स्वेच्छेनेच ते बाहेर पडले. २१ एप्रिल १९१७ रोजी भट यांना लिहिलेल्या पत्रात राज-वाडे म्हणतात, मंडळासंबंधाने मी पूर्ण उदास आहे, व ते मी बहुतेक सोडल्यासारखेच आहे. एकंदरीत सर्वच प्रकार विचित्र आहे व तो मंडळ चालविण्याची हिंदूंची गैरलायकी जाहीर करतो. मंडळाच्या आळशी हवेतून मी मोकळा झालो याचे मला सदुःख समाधान वाटते. या मंदगतीने मी फार हैराण झालो. भिकार टिपणातच सर्व वेळ जात असे. तो प्रकार आता राहिला नाही. इतिहास मासिक चालल्यास त्यात स्वतंत्रपणे लिहिता यावे असे वाटते.' २० जून १९१७ च्या पत्रात राजवाडे म्हणतात, 'माझ्याशिवाय मंडळ चालावे अशी माझी इच्छा आहे. असोसिएटेड लाइफसंबंधी लिहिले, पण अनुभव असा आला की, हे लोक आळशी, अनुत्साही, अपराक्रमी, अशोधक आणि क्षुद्र आहेत. अशांशी असोसिएशन कसले ? असोसिएशन बरोबरीच्या माणसाशी होत असते. ह्या अव्यवस्थितांना सुधारावयाचे आहे. यांच्याशी असोशिएट करण्याची गोष्टच नाही. आहेत त्या लोकातून विद्वान, शोधक कोणी निपजेल असे मला दिसत नाही. तेव्हा त्यांच्या-

बरोबर रेंगाळत बसणे म्हणजे महत्त्वाचा काळ गमाविणे आहे. शोधाची, विद्वत्तेची, स्वार्थत्यागाची किमत त्यांच्याजवळ शून्य आहे. ऐहिकाकरिता गडबड करणाऱ्या लोकांपैकी हे लोक आहेत. शोधकर्म करण्याची ऐपत नाही, विद्वत्ता जाणण्याचा अभ्यास नाही, आणि स्वार्थत्यागाचे वारेही नाही.'

राजवाडे यांच्या लोकविन्मुख आणि एकांतप्रिय अभ्यासकाच्या वृत्तीमुळे भारत इतिहास संशोधक मंडळापासून ते दुरावले, हे सत्य असले तरी ते पूर्ण सत्य नाही. राजवाडे, पोतदार म्हणतात, त्याप्रमाणे स्वार्थत्यागी, विद्वान, थोर, वंद्य आणि विभूती असले तरी अखेर ते माणूसच होते. त्यांच्या आवडी-निवडी व रागद्वेष जितक्या उत्कट तितकेच चंचल होते. ज्या तात्यासाहेब मेहेंदळ्यांबद्दल भटांपाशी ते म्हणाले की, 'सर्व पुणे शहरात तात्यासाहेबांइतका मंडळाचा सभासद होण्यास लायक गृहस्थ पुष्कळ विचाराअंती मला आढळला नाही, त्याच मेहेंदळ्यावर पुढे त्यांचा इतका राग झाला की एकवचनाशिवाय ते त्यांचा उल्लेख करीनात. तात्यासाहेब केळकर यांना ते 'धंदेवाईक अध्यक्ष' म्हणत व त्याची मीमांसा अशी करीत की, 'धंदेवाईक अध्यक्ष प्रगतीचा अभिमानी नसतो तर प्रगति आणि गावढळपणा या दोन्ही बाजूच्या लोकांस खूष ठेवून आपले अध्यक्षत्व कसे राहील या फिकीरीत पडलेला मनुष्य असतो. हा मनुष्य प्रगतीचा प्रवर्तक होईल ही कल्पना फोल आहे.' मंडळामधील ज्या मंडळीचा राजवाडे यांना राग येत असे तो म्हणजे मेहेंदळे व केळकर होत. त्यांच्याबद्दल राजवाडे यांचे मत असे होते, की, 'ह्या दोघांसही शास्त्रवृद्धीची चाड मुळीच नाही. संशोधन वाढावे म्हणून काय केले पाहिजे, ह्याची कल्पना ह्या दोघासही नाही. तथापि संस्था चालविण्यासाठी चार चांगल्या माणसांबरोबर चार केवळ सहानुभूतीची पण संशोधनाच्या व्यवसायाबाहेरची मंडळी गोळा केली तर ही मंडळी आपल्याला त्यात काही विशेष समजते असेच समजू लागली व इतिहास संशोधनाच्या वाढीसाठी काय केले पाहिजे, ह्याविषयी सहज ऐकेनाशी झाली.'

भारत इतिहास संशोधक मंडळ काढताना राजवाडे यांनी ज्या उंच अपेक्षा ठेवल्या होत्या, त्या अपेक्षांना त्यांना मिळालेली माणसे त्यांच्या मताप्रमाणे उतरली नाहीत. त्यामुळे त्यांना वैफल्य आले. त्यांनी मंडळ सोडले. त्यांच्या मुळाशीही विफलता होती, असे त्यांचे याबाब-तीत डॉ. केतकर यांच्याशी बोलणे झाले त्यावरून दिसून येते. ते म्हणाले, 'इतिहास संशोधन म्हणजे काय हे ज्याला समजले असा एकही मनुष्य मला तयार करता आला नाही. दत्तोपंत आपटे बऱ्या लायकीचा मनुष्य आहे व थोडेबहुत काम करीलसे वाटते. दत्तोपंत पोतदार अभ्यासक होईल असे वाटले होते पण ती आशा व्यर्थ झाली आहे. तो केवळ कारकून बनला आहे व इतिहाससंशोधक मंडळाचे सेक्रेटरीपण करतो म्हणून आपण इतिहास संशोधक आहोत, अशी कल्पना करीत असावा. काय करावे, मनुष्य तयार होईलसे वाटत होते, लग्न केले नाही, त्याच्या पाठीमागे पाश नाही, तर हे अवि-वाहिताचे आयुष्य सर्वस्वी कारकुनीवजा चिटणिशी आणि मास्तरकी-वजा प्रोफेसरी करण्यात ह्याने व्यर्थ घालवावे, अशी त्यास बुद्धि झाली आहे. आणि ती कां, तर प्रोफेसर असल्यामुळे मुंबईच्या ह्या न्हावगंड युनिव्हर्सिटीशी संबंध येतो म्हणून, आणि 'प्रोफेसर' ह्या शब्दाला, मूर्ख लोकांच्या मताने किंमत आहे, म्हणून पोतदाराच्याही मनात अभ्यासाविषयी मी प्रेम उत्पन्न करू शकलो नाही. ज्या अर्थी मी एकही अभ्यासक उत्पन्न करू शकलो नाही, त्या अर्थी माझा परि-श्रम व्यर्थच झाला, असे नाही का म्हणता येणार? सरदार मेहेंदळे ह्याला ह्या कामात घातल्याने काय फायदा झाला? हा काय आता संशोधक बनणार आहे? तसाच तो नरसोपंत केळकर. ह्याला इति-हासाची गोडी आहे आणि ह्याला एकदा एक काम देऊन पाहिले. तोतयाच्या संबंधाची पत्रे दिली होती, पण त्याचा सरातिपूर्वक ऐति-हासिक अर्थ लावण्याची अक्कलही त्यास दाखविता आली नाही. आले ह्या मंडळींना एवढेच प्रथम सांगितले की, जुने पत्र मिळाले, तर ते आणून वाचून दाखवावे. तितपतच मंडळी शिकली. त्यांना उत्तेजन देण्यासाठी त्यांचे रडके कागदही छापविले. पण काय

उपयोग झाला ? मंडळी जास्त शिकत ना, अभ्यास करीत ना, मेहनत करीत ना. तीन वर्षे ह्यांच्यापाशी स्वतःचे पैसे खर्च करून यावे, ह्यांच्या बैठकांना हजर राहावे, नव्या सापडलेल्या साहित्यापैकी काही स्वतः वाचून दाखवावे, काही साहित्य दुसऱ्यास द्यावे, त्याने त्याला काही प्रस्तावनारूपी चार ओळी लिहाव्यात व त्याचे ते संशोधन म्हणून प्रसिद्ध व्हावे असा प्रकार चालला; पण कोणीही खऱ्या अभ्यासास प्रवृत्त होईना; तेव्हा ह्या लोकांबरोबर आपला वेळ तरी का घालवावा, असे वाटू लागले व काहीतरी कुरापत काढली पाहिजे व संबंध तोडला पाहिजे असे वाटे. अभ्यासकांची परंपरा उत्पन्न व्हावी ह्यासाठी जीव तुटे, पण ती परंपरा उत्पन्न करण्यास तीन वर्षांपेक्षा जास्त वेळ कशाला द्यावयाला पाहिजे ? त्यात असे दिसून आले की, प्रथम सेक्रेटरी सरदार मेहेंदळे ह्यांनी हिशेबही बरोबर ठेवला नव्हता आणि ते पाहिले तेव्हा म्हटले की ही पंचाईत होणार. ह्या नालायक मंडळींच्या संगतीत राहिल्याने ही मंडळी इतिहास–संशोधन–शास्त्र तर शिकणार नाहीतच, पण हिशेबही नीट ठेवणार नाहीत. त्यामुळे इतर अभ्यासक मंडळींना देखील गोत्यात आणतील–तेव्हा आता ह्या मंडळीला सोडून देऊन आपला अभ्यास तेवढा आपण करीत राहावे, अशी मनात योजना केली आणि कुरापती काढल्या व मी बाहेर पडलो.'

मेहेंदळे, केळकर, पोतदार यांच्याबद्दल राजवाड्यांनी जे मत प्रदर्शन भट यांना लिहिलेल्या पत्रात व केतकरांशी झालेल्या बोलण्यात व्यक्त केले, त्याप्रमाणे ते लोक होते असा अर्थ अर्थातच नाही. राजवाड्यांचा त्यांच्याकडे पाहण्याचा दृष्टिकोन काय होता, याच दृष्टीने व एवढ्यापुरतीच त्यांची मते निर्णायक समजणे इष्ट होईल. आणि निर्णायक तर खरीच. कारण मंडळातल्या व्यक्तीबद्दलची राजवाड्यांची प्रतिकूल मते व त्यांची अभ्यासकाची प्रवृत्ती याची प्रतिक्रिया राजवाड्यांनी मंडळ सोडण्यात झाली. नियतीचा उपरोध असा की, ज्या मंडळावर रागावून राजवाडे यांनी मंडळ सोडले, तेच भारत इतिहास संशोधक मंडळ त्यांचे एक प्रकारे चिरंतन स्मारक झाले.

राजवाडे यांच्या 'मंडळी करणा'च्या संकल्पनेची अशी ही कथा आणि व्यथा आहे. एक 'भारत इतिहास संशोधक मंडळ' सोडले तर आरोग्यमंडळ, समाजविचार मंडळ, विज्ञान मंडळ इत्यादी त्यांनी काढलेल्या मंडळांपैकी एकही मंडळ चिरस्थायी झाले नाही. मंडळे चालवण्यासाठी लागणारी लोकसंग्रहाची वृत्ती राजवाड्यांपाशी नव्हती, त्यामुळे त्यांना या बाबतीत अपयश आले हे उघड आहे. पण याचा अर्थ असा नव्हे, की, राजवाड्यांची मंडळीकरणाची कल्पनाच सदोष होती. बव्हंशी व्यक्तिनिष्ठ असलेल्या हिंदी समाजात 'मंडळीकरण'च्या रूपाने संस्थाजीवनाची क्रांतिकारक कल्पना रूढ करण्याचे पहिले श्रेय 'मंडळचा आणि समुदाय मेळवण्या' असे म्हणणाऱ्या रामदासाचे आहे व अर्वाचीन काळात राजवाड्यांचे आहे. पाश्चात्य आणि पौर्वात्य समाजात त्यांच्या भवितव्यतेवर परिणाम करणारा हाच मोठा भेद आहे. वासुदेवशास्त्री खरे यांनी म्हटल्याप्रमाणे, 'चारचौघांनी मिळून एखादी संस्था चालविण्याची अगर एखादा कारभार पार पाडण्याची आम्हाला सवय नाही. –समूहरूपाने आम्ही केलेली कार्ये यशस्वी होत नसल्यामुळे आमचे राज्यतंत्र पाश्चात्त्यांप्रमाणे संस्थाप्रधान असू शकत नाही; तर ते व्यक्तिप्रधानच असावे लागते.' पौर्वात्यसमाजाला जडलेला व्यक्तिप्राधान्याचा छद्रोग, मंडळीकरणा–च्या उपायाने दुरुस्त करण्याचा प्रयत्न राजवाडे यांनी केला, हे यश त्यांच्या खाती अवश्य जमेस धरले पाहिजे. त्यामुळे मंडळाची निर्मिति, त्यांचा उत्कर्ष व अपकर्ष याबद्दल त्यांनी वेळोवेळी केलेले प्रकट चिंतन चिरंतन महत्त्वाचे समजले पाहिजे. भट यांना एकदा ते म्हणाले, 'आपल्या लोकांचे आळस, औदासीन्य, राष्ट्रकार्याविषयी खऱ्या कळकळीचा व चिकाटीने काम करण्याच्या ऐपतीचा अभाव इत्यादि दुर्गुण संस्था नाश पावण्याच्या मुळाशी असतात. मोठ्या कार्यात क्षुद्र माणसास कधी घेऊ नये. घेतल्यास संस्था नाश पावते.' क्षुद्र बुद्धीच्या माणसास underling हा शब्द राजवाडे वापरीत.' underling च्या योगाने मोठ्या कार्याचा नाश होतो. त्यांच्या लुडबुडीमुळे व चुगल–

खोरपणामुळे चांगल्या माणसाची मने कलुषित होऊन संस्थेत भांडणे व तंटे उत्पन्न होतात. संस्थारक्षण व तिची प्रगती यापेक्षा व्यक्ति-विषयक मानापमानास अधिक महत्त्व देण्याच्या आपल्या लोकांच्या वाईट खोडीमुळे त्याचप्रमाणे मत्सर, वैयक्तिक द्वेष इत्यादी क्षुद्र मनो-वृत्तीस बळी पडून महत्कार्याचा नाश करण्याच्या आपल्या दुष्टप्रवृत्ती-मुळे संस्था हीनबल होतात. कोणत्याही संस्थेत दोष उत्पन्न होताच तो लपवून न ठेवता ताबडतोब चव्हाटयावर आणून त्याची दुरुस्ती करणे संस्थेच्या कल्याणाच्या दृष्टीने अत्यंत इष्ट आहे. त्याप्रमाणे तजवीज न करणे हे आत्मघातकीपणाचे आहे.' भारत इतिहास संशो-धक मंडळावर एक सविस्तर परामर्श घेणारा लेख लिहिण्याचा राज-वाडे यांचा विचार होता. तो त्यांनी लिहिला नाही. पण त्यासाठी केलेल्या एका टिपणात त्यांनी हेच विचार व्यक्त केले आहेत--'जाती, व्यक्ति इत्यादींच्या क्षुद्र व्यंगांकडे आम्ही अक्ष देत नाही. तथापि अनुभव म्हणून इतके सांगतो की, क्षुद्र माणसे संगतीस घेतली तर संस्थेला क्षुद्रत्व येते. सामग्रीची हानी होते व लघुत्व प्राप्त होते. बगलबच्च्यांपासून इजा होते व चहाडीने फाटाफूट होते.'

'तेव्हा आता ह्या मंडळीला सोडून देऊन, आपला अभ्यास तेवढा आपण करीत रहावे अशी योजना केली व मी बाहेर पडलो.' अशा शब्दात राजवाडे यांनी भारत इतिहास संशोधक मंडळ सोडण्याचे कारण दिले असले व त्यांच्यापुरते ते खरे असले, तरी मंडळात अस-तानाही त्यांच्या अभ्यासात खंड नव्हता. ७ जुलै १९१० रोजी मंड-ळाची स्थापना झाली आणि १९१७ च्या सप्टेंबर-ऑक्टोबरात राज-वाडे यांनी मंडळाला रामराम ठोकला. पण त्या काळांतही इतिहास संशोधनासाठी ते कोकणात, वऱ्हाडात, मूर्तिजापूर व कारंजे, व कर्ना-टकात बल्लारी , बदामी या बाजूला प्रवासास गेले होते. 'मराठ्यां-च्या इतिहासाची साधने' या त्यांच्या ग्रंथांचे १२, १५, १६, १७, १८, १९ व २० हे खंड याच काळात प्रसिद्ध झाले. 'सुबंत विचार' व 'संस्कृत भाषेचा उलगडा' हे ग्रंथ अनुक्रमे १९१२ व १९१६ साली

प्रसिद्ध झाले. तरीही मंडळामुळे आपल्या अभ्यासात विक्षेप होतो, अशी राजवाडे यांची तक्रार होती. याचा अर्थच असा की, राजवाडे हे जातिवंत अभ्यासक होते व मंडळामुळे अपरिहार्य असणारे कमीजास्त सामाजिक व्यवधानही त्यांना खपणारे नव्हते.

राजवाडे यांचा अभ्यास उदंड होता आणि अभ्यासाची क्षेत्रेही उदंड होती. मराठ्यांच्या इतिहासाच्या साधनांचे संशोधन आणि प्रकाशन हा तर त्यांचा जन्माचा व्यवसाय होता. तो आजपर्यंत एक हाती म्हणजे सर्वस्वी त्यांच्या तंत्राने व सोयीने चालत होता. १९१८ नंतर त्यात थोडा बदल होण्याचा संभव निर्माण झाला. केतकरांनी ज्ञानकोशमंडळ काढले. केतकरांना राजवाड्यांविषयी नितांत आदर होता आणि ज्ञानकोशाच्या कामात राजवाडे यांचे सहकार्य मिळविण्याचा त्यांनी प्रयत्न केला. प्रथम त्यांनी 'ज्ञानकोश' मंडळाच्या उपसंपादक वर्गास शिक्षण देण्यासाठी राजवाडे यांना नागपूरला बोलाविले. राजवाडे त्याप्रमाणे आले, सात-आठ दिवस मार्गदर्शनपर व्याख्याने दिली व नंतर परत गेले. त्यांच्या जाण्या-येण्याचा खर्च पन्नास रुपये झाला. तो खर्च 'ज्ञानकोशमंडळा'ने केला नसून स्वतः केतकरांनी केला. त्याचे कारण असे झाले, की राजवाडे यांना मंडळाचे एक डायरेक्टर म्हणाले, 'तुमच्या येण्यास आम्ही मंजुरी दिलेली नाही. तेव्हा राजवाडे संतापले आणि केतकरांना म्हणाले, 'मंडळाशी माझा संबंध नको. तुम्ही स्वतः वाटल्यास खर्च द्या, नाहीतर देऊ नका.' राजवाड्यांच्या या भेटीत मराठ्यांच्या इतिहासावरील ज्ञानकोशांतील सर्व लेख त्यांनी लिहावे अशी इच्छा केतकरांनी व्यक्त केली. राजवाडे यानी ते कबूल केले व म्हटले, 'हे काम करण्यास पाच हजार किंवा सहा हजार रुपये पडतील,' केतकरांनी, अनेकांचा विरोध असताही राजवाडे यांना सहा हजार रुपये कबूल केले, कारण केवळ व्यवहारदृष्टीनेच पाहावयाचे झाल्यास, ह्यातील ऐतिहासिक मजकूर राजवाडे लिहिणार, म्हणूनच कित्येक लोक 'ज्ञानकोशा'चे ग्राहक झाले असते ह्यात शंका नाही.' केतकरांचा राजवाड्यांच्या मराठ्यांच्या इतिहासावरील अधिकाराबद्दल दृष्टिकोन हा असा होता.

'ज्ञानकोशमंडळा 'त राजवाडे काम करणार हे अशा प्रकारे नक्की झाले. ८ ऑक्टोबर १९१८ रोजी ज्ञानकोशमंडळाचे संपादकीय व्यवस्थापक रा. रा. दाते यांनी मराठ्यांच्या इतिहासाचे 'रचना पत्रक' राजवाडे यांच्याकडे पाठविले. या पत्रकांप्रमाणे एकंदर दीड हजार पृष्ठांचा मजकूर राजवाडे ज्ञानकोशासाठी लिहिणार होते. त्यात शक पूर्व काळापासून तो इंग्रज अंमलापर्यंत मराठ्यांचा राजकीय इतिहास, देवधार्मिक इतिहास, राज्यव्यवस्था, शिल्प, भाष्य, वाङ्मय, व्यापार, भूवर्णन, चरित्रे, इतिहाससंशोधन व लेखन इतके विषय येणार होते. राजवाड्यांनी आपल्या अटी कळविल्या. १) १००० रुपये दर सहामाहीच्या आरंभी द्यावे. २) मजकुरात फेरफार करू नये. ३) तीन वर्षांच्या शेवटी असे आढळून आल्यास की, सहा हजार रुपयांहून जास्त खर्च आला तर तो द्यावा व तो तीन हजार रुपयाहून जास्त कधी नसावा. ४) वय ५५ वर्षे ५) कालगणना शकाने करीन. ६) जसे कच्चे शुद्धलेखन लिहीन तसे छापावे. ७) अस्मानी सुलतानीने पैसे व हप्ते बंद पडल्यास पैसे परत देणार नाही. ज्ञानकोशात प्रसिद्धीस देण्यात येणाऱ्या लेखांचा नमुना म्हणून 'विकार विचार प्रदर्शनाच्या साधनांची उत्क्रांति' हा नामांकित निबंधही राजवाड्यांनी तयार केला. सर्व गोष्टी अशा प्रकारे सिद्धीच्या मार्गावर असता, एकाएकी राजवाडे यांनी 'ज्ञानकोशमंडळा 'ला लेख लिहून देण्याच्या कामातून अंग काढून घेतले.

'पण एकटे राहण्याचे सर्वात मोठे कारण म्हणजे स्वातंत्र्य होय. विशेष काही स्वच्छंदी व एककल्ली माणसे अशी असतात की, त्यांना कोणते बंधन म्हणून सहन होत नाही. इतके की, कमरपट्टा आणि पायमोज्याचा बंदसुद्धा त्यांना बेड्या आणि साखळचाप्रमाणे वाटू लागतात.' असे बेकनने म्हटले आहे ते राजवाड्यांना बऱ्याच प्रमाणांत लागू पडते. त्यांचा स्वभाव पहिल्यापासून सर्वस्वी स्वतंत्र. स्वातंत्र्याची आवड इतकी अनिवार व बेसुमार की कॉलेजात तासांचे बंधन नको, आयुष्यात नोकरीचे बंधन नको, संसारात बायकोची बेडी नको. बायको मेल्यावर ते एकटे राहिले व एकटेच जेवण शिज-

वीत, त्यात जेवढी उदात्तता होती तेवढीच स्वातंत्र्याची प्रबळ इच्छा-ही होती. ज्ञानकोशाचे काम त्यांनी नाकारले, त्याचे मूळ त्यांच्या या स्वभावात होते. ज्ञानकोशमंडळाच्या अटी त्यांना जाचक होत्या असे नाही. कामाला ते अपात्र होते असे नाही. केतकर त्यांना मागितलेला पैसा देत नव्हते असेही नाही. पण त्यांना ते नकोच होते. कुबेराने आपले भांडार त्यांच्यापुढे ओतले तरी त्या मोबदल्यात ते स्वातंत्र्याचा सौदा करायला तयार नव्हते. या प्रकरणानंतर वर्ष-दीड वर्षाने केत-करांची व राजवाड्यांची भेट झाली. तेव्हा राजवाडे म्हणाले, 'मी सहा हजार रुपये मागितले, त्या वेळेस तुमची छाती दडपून जाऊन, तुम्ही गप्प बसाल असे वाटले होते; पण तुम्ही अट कबूल करून ते घोंगडे आमच्या गळ्यात अडकविण्याचाच प्रयत्न केलात, पण मी सुटलो की नाही ?' व ते पुढे म्हणाले की, 'मी हिशेब करून पाहिला तो ते काम दहा हजारांच्या खाली झाले असते असे मला वाटत नाही.' राजवाडे यांनी सहा हजारांपैकी तीन हजार आगाऊ मागितले व केतकर त्यांना फक्त पाचशे रुपये देण्यास तयार होते व पाचशे पृष्ठे म्हणजे ज्ञानकोशाची सव्वाशे पाने राजवाड्यांकडून आल्यानंतर अधिक रक्कम देणार होते. राजवाड्यांनी हे कबूल केले नाही. पण हे केवळ वरवरचे कारण होते. खरे कारण त्यांचा स्वभाव. केतकर त्यांना म्हणाले, 'तुम्ही अगोदर कामास लागावयास हवे होते. झालेल्या खर्चाचा हिशेब ठेवावयाचा होता. आणि नंतर काम करू लागल्यावर खर्च जास्त कसा येतो हे कळवावयास हवे होते. किंवा स्वतःची पगारी नेमणूक करून घेण्यासंबंधीनेही सूचना करावयाची होती. अजून करीत असाल तर करा.' पुढे केतकर म्हणतात, 'पण राजवाडे ह्यांनी पगारी नोकर राहण्याची गोष्टच नाकारली. त्यांना एक वर्षभर कमीत कमी अडीचशे रुपये पगार देण्यास, 'ज्ञानकोश' च्या चालक मंडळाने नाकारले असते असे वाटत नाही; पण त्यांस अडीचशे रुपये महिन्याची फिकीरच नव्हती.' केतकरांचे हे विधान अगदी बरोबर आहे. ज्ञानकोशमंडळाशी पत्रव्यवहार चालू असता राजवाडे एकदा भट यांना म्हणाले, 'दुसऱ्याचा पगारदार नोकर म्हणून हुकमी काम

करण्याची मला सवय नाही. ज्ञानकोशाकरिता ज्या प्रकारचे लेख लिहावयाचे तसे लेख चुटकीसरसे लिहिता येत नाहीत. एखाद्या विषयाचे बराच काल चिंतन करून त्या विषयाचे निरनिराळे मुद्दे मनात पक्के झाले व मनाची प्रसन्नता लाभली म्हणजे नामांकित लिखाण होते. ठराविक कालमर्यादेत असले लेख तयार होऊ शकत नाहीत. केतकरांच्या शर्ती मला मान्य होणार नाहीत व त्यांची या बाबतीत कितीही आतुरता असली तरी ती सफल होणार नाही.' आपल्या साहित्याच्या निर्मितीची प्रक्रिया राजवाडे यांनी भटांना जी सांगितलेली आहे, ती अत्यंत महत्त्वाची आहे. त्यांच्या साऱ्या लेखनातले रेखीव, घोटीव आणि चिरेबंद विचारशिल्पाचे रहस्यच त्यांनी या उत्स्फूर्त आत्मनिवेदनात सांगितले आहे.

'आत्मरतः आत्मक्रीडा' अशा राजवाड्यांचे व केतकरांचे जमले नाही तरी राजवाडे यांच्या इतिहाससंशोधनाला खळ नव्हता, याच काळात १९१८ साली 'मराठे व इंग्रज' या केतकरांच्या पुस्तकाचा परामर्श घेण्याच्या निमित्ताने राजवाड्यांनी जो टीकालेख लिहिला, त्यात मराठ्यांचे राज्य जाण्याचे एकच एक कारण पल्लेदार हत्यारांचा अभाव हे होय, हा आपला सिद्धांत मांडला, कारण 'राष्ट्रांचे स्वातंत्र्य व राष्ट्राचे पारतंत्र्य पल्लेदार हत्यारावर अवलंबून असते.' याच सुमारास एकाएकी राजवाड्यांचे लक्ष मराठ्यांच्या इतिहासावरून उडाले असे वाटावे असा प्रकार घडला. ते पदार्थविज्ञान व रसायनशास्त्र यांच्यावरची पुस्तकेच सारखी वाचू लागले, इतकेच नव्हे तर, कित्येकापाशी ते म्हणालेसुद्धा की, 'इतिहाससंशोधन व भाषाशास्त्रसंशोधन टाकून देऊन फिझिसिस्ट किंवा केमिस्ट बनण्याचा माझा विचार आहे.' राजवाडे यांनी सारे जीवित इतिहासाला अर्पण केले असले तरी त्यांच्या मनातली सुप्त महत्त्वाकांक्षा शास्त्रज्ञ होण्याची होती. इतिहाससंशोधन ही अपरिहार्य परिस्थितीशी नाइलाजाने त्यांनी केलेली तडजोड होती, यात शंका नाही. एकदा भटांनी त्यांना इतिहाससंशोधनालाच त्यांनी का वाहून घेतले, असे विचारले होते. त्यावेळी राजवाडे त्यांना म्हणाले, 'वाटेल त्या विषयाच्या

संशोधनाकडे मी लक्ष द्यावयाचे ठरविले असते तर त्यात मला खात्रीने यशःप्राप्ती झाली असती. केमिस्ट्रीचा मी अभ्यास व संशोधन करण्याचे ठरविले असते तर त्या विषयात मी उत्कृष्ट प्रकारचे शोध केले असते.

'परंतु या विषयाचा अभ्यास व संशोधन करणे फार खर्चाचे काम आहे. मी पडलो निर्धन. इतिहास संशोधनाचे काम बिनखर्चाचे आहे व माझ्यासारख्या निर्धन माणसास हेच कार्य हाती घेणे संभवनीय होते. म्हणून मी इतिहास संशोधनाच्या कामास वाहून घेतले. पण हे विज्ञानाचे अध्ययन चालू असतानाही त्यांच्या मनाच्या एका कप्प्यांत मराठ्यांच्या इतिहासाचा आणि विज्ञानाचा संबंध जोडण्याची प्रक्रिया चालूच होती. १९२२ च्या सुमाराला ते चिंचवड येथे विष्णुपंत खरे यांच्या घरी गेले होते. तेथे त्यांच्या घराच्या तिसऱ्या मजल्यावरील पोथ्यांच्या व कागदपत्रांच्या अस्ताव्यस्त गळाठ्यात शेकडो संस्कृत व मराठी पोथ्या त्यांना आढळल्या. त्या कौलारू छपराखाली भिजून भाकरीप्रमाणे घट्ट झालेल्या व उंदरांच्या लेंड्यांनी भरलेल्या होत्या. त्यातून त्यांनी पाचपन्नास लहानमोठे ग्रंथ निवडून व झाडून पुसून एकीकडे काढले. त्यात अडीचशे वर्षांपूर्वीची 'राधामाधवविलास चम्पू'ची जीर्ण पोथी त्यांना आढळली आणि सामान्य माणसाने जी पोथी निरुपयोगी म्हणून टाळून दिली असतील, त्या या रद्दीतील रत्नांतून राजवाड्यांच्या अपूर्व वस्तुनिर्माणक्षम प्रतिभेने तीनशे वर्षांपूर्वीचा शहाजीचा काळ आणि त्यांची व्यक्तिरेखा यांची पुनर्निर्मिती केली. इतकेच नव्हे तर त्याच्या इतरांहून वरचढ असणे ह्या यशाचे रहस्य सांगताता, त्याच्या श्रेष्ठतर हत्यारांचा निर्देश केला. हत्यार चोख पाहिजे आणि ते प्रतिपक्षाच्या हत्याराहून श्रेष्ठतर पाहिजे, ह्या बाबीची जाणीव शहाजीच्या ठाई स्वकालीन अनुभवाने अत्युत्कट बाणलेली होती–' पण श्रेष्ठ हत्यार बाळगणारा शहाजी त्यांच्या इतर समकालीन व पश्चात्कालीन शत्रू–मित्राप्रमाणेच ते हत्यार निर्माण करणाऱ्या पाश्चात्यांपेक्षा कमी दर्जाचा का होता हे हे सांगताना आध्यात्मिक पौर्वात्य संस्कृती व शास्त्रीय युरोपियन

संस्कृती यांची मीमांसा करून पुन्हा ते शास्त्रीय संशोधनाच्या निष्कर्षावर येऊन ठेपले-' उत्तम, रेखीव व नेमके हत्यार बनविण्याची कला पैदा होण्यास शास्त्रीय ज्ञानाची जी पूर्वतयारी राष्ट्रात व्हावी लागते ती त्या काली महाराष्ट्रात नव्हती. शहाजीच्या हयातीत युरोपात डेकार्ट, बेकन इत्यादि विचारवंत सृष्ट पदार्थ संशोधन कार्याचे वाली ज्या रीतीने पंचभूतांचा शोध लावण्यास लोकांना प्रोत्साहित करीत होते आणि आपल्या इकडे एकनाथ, तुकाराम, दासोपंत, निपट निरंजन इत्यादि संत पंचभूतांना मारून ब्रह्मसाक्षात्कारात राष्ट्राला नेऊन मुक्त करण्याच्या खटपटीत होते. अशांना स्क्रू, टाचणी, बंदूक व तोफ यांचा विचार वमनप्राय वाटल्यास त्यात नवल कसचे ? थोडक्यात ऑगस्टस कोंट यांच्या भाषेत सांगावयाचे म्हणजे महाराष्ट्र त्याकाळी Meta-physical अवस्थेत होते. आणि Positive अवस्थेत येण्याला त्याला अद्याप पाचशे वर्षे अवकाश होता. अनेक शोधांच्या साहाय्याने सिद्ध झालेली जी लांब पल्ल्याची कारीगार हत्यारे म्हणजे युरोपियन शास्त्रीय संस्कृतीचा केवळ निष्कर्ष होत.' १९१८ साली त्यांनी विचार मांडला होता, की, ' राष्ट्राचे स्वातंत्र्य व पारतंत्र्य पल्लेदार हत्यारांवर अवलंबून असते ' तो १९२२ साली अधिक सूक्ष्म झाला, व राष्ट्रांचे स्वातंत्र्य व पारतंत्र्य केवळ पल्लेदार हत्यारांवर नव्हे, तर ती निर्माण करणाऱ्या शास्त्रीय संस्कृतीवर अवलंबून असते या निष्कर्षावर ते आले. इतकेच नव्हे, इतिहास हा वर्तमानाचा भाष्यकार आहे, ' इतिहासप्रदीपेन मोहावरण घातिना । लोकगर्भगृहं कृत्स्न यथावत् सं प्रकाशितम् ॥' या भरत वचनाप्रमाणे, वर्तमानकालात राष्ट्राच्या पुनरुज्जीवनाचा एकमेव अशा तंतु असलेल्या शास्त्रीय ज्ञानाची उपासना केल्याशिवाय तरणोपाय नाही या ठाम निष्कर्षाप्रत ते येऊन पोचले. ह्याच काळात त्यांनी ' महाराष्ट्रातील बुद्धि व प्रतिभा यांचा ऱ्हास ' नावाचे एक टिपण लिहिले आहे. ते अपूर्णच आहे. त्यात ते म्हणतात-' युरोपियन राष्ट्रे हिंदू राष्ट्राहून अंतर्बाह्य सृष्टीचा अभ्यास करण्यात श्रेष्ठ आहेत. असल्या ह्या कसोशीने काम करणाऱ्या पाश्चात्य राष्ट्रांशी आपली गाठ पडली आहे. तीत आपला

निभाव लागावयाचा म्हणजे त्या राष्ट्रांइतक्या किंबहुना, त्याहून जास्त कसोशीने व शास्त्रीय पद्धतीने आपण कामाला लागले पाहिजे. टंगळमंगळ करून भागणार नाही. टंगळमंगळ करून बहुतेक सर्वस्वाला मुकलो. फक्त वंशक्षय व्हावयाचा राहिलेला आहे. तो ही चालू होऊन कित्येक वर्षें लोटली. तथापि आपण व आपले पुढारी अद्यापि शुद्धीवर आले नाहीत. आपण भलत्याच लहानसहान बाबीत घुटमळत आहोत...एका बाबी संबंधाने सर्वांचे एकमत असावे. कसोशीने भौतिक व मानसिक शास्त्रांचा अभ्यास व शोध करण्यात सर्वस्वाचा विनियोग करण्याची वेळ शंभर वर्षांपूर्वीच आलेली होती व आता तर बिल करणे म्हणजे मरणे, राष्ट्रीय रूपाने मरणे आहे. तेव्हा शास्त्रशोधाकडे सर्व लक्ष, अवसान व द्रव्य खर्चिले पाहिजे.' भूत आणि वर्तमान आणि भविष्य, इतिहास आणि विज्ञान, पौर्वात्य आणि पाश्चात्य राष्ट्रांचा उत्कर्षापकर्ष यांची सांधेजोड राजवाडे यांच्या मनात अशा चपखल आणि अविभाज्य रीतीने झाली होती.

याच सुमारास पंडित सातवळेकर यांचा व राजवाड्यांचा परिचय झाला व समानशीले व्यसनेषु सख्यम्' या न्यायाने त्या परिचयाचे रूपांतर ऋणानुबंधात झाले. कारण, सातवळेकरांनी वेदविद्येच्या विवेचनास, प्रकाशनास व आचरणास आपले सारे आयुष्य वाहिले होते आणि वेदांवर ग्रंथलेखन करण्याचा राजवाडे यांचा पूर्वीपासून विचार होता. या काळात म्हणजे १९२० च्या सुमारास त्यांनी जे संकल्पित ग्रंथांचे टिपण केले आहे, त्यात 'वेदार्थयत्न' या ग्रंथाचे नाव आहे. 'ऋग्वेदाचे संशोधन करणाऱ्या विद्वानास ज्या कित्येक ऋचांचे अर्थ बरोबर समजले नाहीत, ते मला बरोबर समजले आहेत.' असे राजवाडे म्हणत. त्यांच्या मताने वैदिक ऋचांचा अर्थ शुद्ध ऐतिहासिक पद्धतीने लावणे जरूर होते, कारण ऋग्वेदाची रचना ज्या काळात झाली त्या काळचा इतिहास या ग्रंथात समाविष्ट करण्यात आला आहे असे त्यांचे मत होते. तो इतिहास विचारात न घेता ऋचांचे अर्थ केले तर तो शुद्ध निराधार कल्पनाविलास होय. उदाहरणार्थ, ऋग्वेदांतील प्रसिद्ध इंद्र-वृत्र युद्धाबद्दल त्यांचे मत असे होते,

की, मध्य आशियात तैग्रीस व युफ्राटीस या नद्या लगत 'उरुत्रु' नावाचा प्रदेश होता. त्या प्रदेशाच्या राजास 'उरुत्रु' या नावावरून 'वृत्र' असे म्हणत. आर्यांच्या राजास 'इंद्र' अशी संज्ञा होती उरुत्रु प्रांत वर असून त्यांच्या खालच्या प्रांतात आर्यांची वस्ती होती. उरुत्रु प्रांतातून वाहणाऱ्या नद्यांचे पाणी आर्यांच्या वस्तीच्या प्रदेशात येत असे. ते पाणी हा उरुत्रु प्रांताचा राजा वृत्र वाहाण्याचे बंद करी व त्यामुळे उभयतात युद्धे होत. व त्यांची वर्णने ऋग्वेदात तत्कालीन ऋषींनी केली आहेत. अर्थातच इंद्र व वृत्र म्हणजे आकाशातील ढग व पावसाळ्यांत या ढगात युद्धे होतात या कल्पना राजवाडे यांच्या मताने कपोल–कल्पित होत, इंद्र–वृत्र युद्धाबद्दलची आपली ही उपपत्ति 'उरुत्रु' या नावाचा लेख लिहून 'चित्रमय जगता'त राजवाडे यांनी प्रसिद्धही केली होती. या ऋचांचे जे 'ऋषि' त्यांच्यावर तर राजवाड्यांनी स्वतंत्र लेखच लिहिलेला आहे. त्यात 'ऋषि' या शब्दांचा मूळ अर्थ अंगात संचार होऊन विलक्षण सैरावैरा गति करणारा माणूस, दैवी स्फुरण झालेला माणूस असा होता...सारांश' 'दैवी स्फूर्ति झालेली प्रतिभावंत व्यक्ति' असा ऋषि या शब्दाचा अर्थ आहे. भूतकाळी वैदिका समाजात प्रतिभावंत, विचारकर्ते, देवस्तवक व वक्तृत्वसंपन्न बुद्धिमान व्यक्ति म्हणजे ऋषि अशी प्रख्या झाली.' अशी ऋषि ह्या शब्दाची त्यांनी शुद्ध बुद्धिवादी उपपत्ति व्युत्पतीच्या आधारे दिली आहे. या विषयाचे राजवाड्यांच्या मनात मनन व चिंतन अखंड चालू असे. आणि त्या चिंतनाला अनुकूल वातावरण सातवळेकरांच्या औंधाला होते. म्हणून राजवाडे यांच्या तेथे वारंवार फेऱ्या होत.

तेथे सातवळेकरांचे स्वाध्याय मंडल होते, आणि वैदिक वाङमयाचे पुष्कळ ग्रंथ होते. तेथे एकांत होता. त्यामुळे त्या जागेवर त्यांचे विशेष प्रेम होते व त्यांचे मन तेथे रमत असे. तेथे कायम येऊन राहण्याची इच्छाही त्यांनी व्यक्त केली होती व त्यांच्या इच्छेप्रमाणे सातवळेकरांनी त्यांच्यासाठी स्वाध्याय मंडलाच्या उद्यानात लहान आश्रम बांधण्यासाठी जागाही घेतली होती. स्वाध्याय मंडळात राहून राज-

वाडे यांना एक मासिक काढावयाचे होते व त्यात वैदिक, पूर्ववैदिक उत्तरवैदिक, सामाजिक व ऐतिहासिक विषयाचा ऊहापोह करण्याचा त्याचा विचार होता. ' वेदमंत्रांचे वर्गीकरण करून, संगती लावून, आपण स्वत: बसविलेल्या उपपत्तीप्रमाणे वेदांचा खरा अर्थ करून दाखवावा व या विषयावर हजार दोन हजार पानांचा ग्रंथ लिहावा, असा त्यांचा मनोदय त्यांनी सातवळेकरांपाशी अनेक वेळा व्यक्त केला होता. हा संकल्पित ग्रंथ म्हणजेच ' वेदार्थयत्न ' हा उपरोक्त टिपणातील ग्रंथ असावा याशिवाय महाभारतातील व ब्राह्मण कालांतील सामाजिक व्यवस्थेसंबंधाने शेकडो निबंधांची रूपरेखा त्यांनी आखून ठेविली होती. व औंधला वास्तव्य करावयास गेल्यावर त्यांचे लिखाण ते करणार होते. हिंदु समाजाच्या रचनेबद्दल स्मृतीसारखा ग्रंथ लिहिण्याचा त्यांचा विचार होता. ब्राह्मणांनी ब्राह्मण होऊन कायदा तयार केला पाहिजे ह्या त्यांच्या मताप्रमाणे, ते महादेवशास्त्री दिवेकर यांना म्हणाले होते, की, ' मला आणखी आठ वर्षे जगावयाचे आहे. चार वर्षात मी भाषाशास्त्रावरचा ग्रंथ पुरा करतो आणि पुढे चार वर्षांत समाजशास्त्रावर ग्रंथ लिहून तुमच्या कार्याला स्मृति तयार करून देतो. कुलविषयक इतिहास तयार करण्यासाठी नाशिकच्या तीर्थोपाध्यायांच्या वह्या तपासून आडनावे गोळा करण्याचा दीर्घोद्योग त्यांनी आरंभला होता व सुमारे दोन हजार नावे गोळा केली होती. १९२० सालचे राजवाडे यांच्या हातचे एक टिपण आहे. त्यात त्यांच्या संकलिपत ग्रंथांच्या विषयाची विविधता पाहण्यासारखी आहे. १) मराठी भाषेचा कोश, २) मराठी भाषेचे व्याकरण, ऐतिहासिक तौलनिक, ३) संस्कृत भाषेचा उलगडा, ४) मराठ्यांचा इतिहास. १) संक्षिप्त गोषवारा, २) सादीत तपशील, ५) महाराष्ट्र सारस्वतचा इतिहास ६) महाराष्ट्रातील आडनावे, कुळ्या, व गोत्रे, ७) वेदार्थयत्न, ८) महाराष्ट्र समाजशास्त्र, ९) विवाहसंस्थेचा इतिहास.

पण, खरे सांगावयाचे म्हणजे राजवाड्यांचे खरे लक्ष या काळात ' धातुकोश ' च्या रचनेकडे लागले होते. त्यांचे हे काम १९०१ सालापासून थोड्या थोड्या प्रमाणावर चालूच होते. शब्दांच्या व्युत्पत्तीचा

त्यांचा विचार नेहमी चालू असे. एखाद्या शब्दाची व्युत्पत्ती सापडली की ती लगेच एका चिठ्ठीवर लिहून पेटीत टाकीत. 'व्युत्पत्ती आढळली रे आढळली की लगेच ती पेटीत गेलीच, ही चिठ्ठी दोन बोट रुंदीची नावाची असे. तीवर प्रथम मराठी धातु, नंतर संस्कृत धातु नंतर जुन्या मराठी ग्रंथातील अवतरण अशी मांडणी असे. एखाद्या धातूचे विवरण फार मोठे असले तर ते मोठ्या कागदावर लिहीत. काही काही चिठ्ठ्यातील सदरे तर सत्तावीसपर्यंत गेली होती. भटांनी लिहिलेल्या 'राजवाडे चरित्रां'त या धातुकोशाच्या चिठ्ठ्याचे नमुने दिले आहेत सकाळी उठल्यावर कोऱ्या कागदाच्या लांबोड्या दोन बोटे रुंदीच्या कपट्यांची गड्डी ते तयार करीत. त्यानंतर हाताशी लागेल ती पुस्तकं मनातल्या मनात वाचण्यास सुरुवात करीत. वाचीत असता कागदाच्या कपट्यावर शब्द टिपून त्यांची व्युत्पत्ती लिहीत. दिवसभर हे काम चालूच असे. रात्री झोपण्यापूर्वी दररोज मराठी धातूच्या व्युत्पत्तीच्या ज्या चिठ्ठ्या तयार होत असत त्या अकारादि विल्हेप्रमाणे ते लावून ठेवीत. दोन–तीन मोठ्या ट्रंका त्यांच्याजवळ असत. त्यात या चिठ्ठ्यांच्या गड्ड्या ते ठेवीत. याशिवाय पाणिनीची अष्टाध्यायी व व्युत्पत्तीदृष्ट्या महत्त्वाचे वाटणारे अन्य संदर्भग्रंथ ते या ट्रंकात ठेवीत. पुढे या चिठ्ठ्यांवरचे शब्द व त्यांच्या व्युत्पत्त्या वाड कागदांवर लिहून काढण्याचे काम त्यांनी सुरू केले. त्या कामी कृ. पां. कुलकर्णी व वा. गो. मायदेव यांनी त्यांना मदत केली. यानंतर या चिठ्ठ्यांचे त्यांनी मराठी धातूच्या चिठ्ठ्या व अन्य शब्दांच्या चिठ्ठ्या असे दोन गट तयार केले. या दिवसात राजवाडे यांचे हेच काम चालू होते. आत्तापर्यंत राजवाडे यांनी तीस हजार धातूच्या व्युत्पत्त्या बसविल्या होत्या. या धातुकोशाची रचना कोणत्या प्रकारे करावयाची याबद्दलही त्यांचे चिंतन चालू होते. त्यासंबंधीच्या एका टिपणात ते म्हणतात, 'कोणत्याही शोधाची लोकांकरिता मांडणी दोन तऱ्हांनी करता येते. शोधकाच्या मनात शोध ज्या सरणीने होत गेला त्या सरणीने एक एक धागा उकलीत उकलीत शोधाची मांडणी करणे ही पहिली पद्धती आणि संबंध शोध शोधकाच्या मनात बहुकाल मुरून

सिद्धांतरूपाने त्याची मांडणी लोकांकरिता ऊर्फ इतरांकरिता करणे ही दुसरी पद्धती, पहिलीस सिपधायंप पद्धती व दुसरीस सिद्धांत पद्धती म्हणता येईल. पहिल्या पद्धतीने विषयांची मांडणी करण्यात विस्तार फार होतो व मुद्रणखर्च व वाचनखर्च बेसुमार वाढतो. दुसऱ्या पद्धतीने म्हणजे सिद्धांत पद्धतीने विषय थोडक्यात सूत्ररूपाने सांगता येऊन मुद्रणखर्च व वाचनखर्च अगदीच स्वल्प लागतो. पहिल्या पद्धतीने मांडणी केली असता शोधकर्मातील सुखदुःखे व डावपेच सामान्य मानवी मनाला आल्हादक व आकर्षक होतात. दुसऱ्या पद्धतीत हा मनोरंजक भाग बिलकूल गळाल्यामुळे, विषय मांडणी सामान्य जनांना रुक्ष परतु तज्ञांना आदरणीय होते. भारत वर्षात पूर्व ॠषींनी हीच सूत्रपद्धती अवलंबिली. करिता प्रस्तुत त्याच श्रेष्ठ पूर्वज पद्धतीचा मीही अवलंब करितो, या 'धातुकोशा' चा हजार पानांचा ग्रंथ होऊन त्याला पाचशे पृष्ठांची प्रस्तावना लिहिण्याचा त्यांचा विचार होता. काही काळ ज्ञानकोशकार केतकर यांच्याशी हा 'धातुकोश' प्रसिद्ध करण्याबद्दल त्यांचे बोलणेही चालले होते केतकरांना किंवा 'ज्ञान-कोश' मंडळाला राजवाड्यांनी 'धातुकोश' तयार करून द्यावा आणि त्याला व्याकरणशास्त्रीय व भाषाशास्त्रीय प्रस्तावना लिहून द्यावी व त्या बद्दल केतकरांनी किंवा 'ज्ञानकोश' मंडळाने राजवाड्यांना दोन हजार रुपये द्यावेत, असे ठरले होते. पण तो व्यवहार सिद्धीस गेला नाही. तथापि १९२७ चे जानेवारीपासून 'धातुकोश' छापण्याच्या कामास सुरुवात करण्याचा त्याचा निश्चय कायम होता, व त्या दृष्टीने ते काम करत होते.

व्याकरण आणि भाषाशास्त्र या क्षेत्रात राजवाडे यांनी आजपर्यंत केलेले काम मोठे होते. त्यांच्या ज्ञानेश्वरीच्या व्याकरणाने मराठी ऐतिहासिक व्याकरणाचा पाया घातला. 'संस्कृत भाषेचा उलगडा' या ग्रंथात पाणिनीच्या सूत्राच्या व त्यावरील वार्तिकांच्या आधारे पाणिनी पूर्व संस्कृत आद्य आर्यभाषा यांचे स्वरूप अजमाविले आहे. त्या प्राचीन वेदपूर्वकालीन आर्य भाषेची वर्णप्रक्रिया त्यांनी गुण व वृद्धि या प्रबं-धात विशद केली आहे. या सर्व भाषिक संशोधनाचा 'धातुकोश' हा

'कलशाध्याय' म्हटला पाहिजे.

मराठ्यांच्या इतिहासाच्या खंडोगणती साधनांचे संशोधन करणारे राजवाडे, त्या साधनांना प्रदीर्घ आणि विवेचक प्रस्तावना लिहिणारे तत्त्वविवेचक राजवाडे, विज्ञानाची उपासना करणारे राजवाडे, भाषाशास्त्राचे विश्लेषण करणारे व धातुकोश रचणारे राजवाडे, 'सत्यशवती, आमची पुराणे व असीरियातील शोध' 'भारतीय विवाहशास्त्र.' 'वेदार्थयत्न' यातून वेदेतिहास पुराणांचे ऐतिहासिक व वस्तुनिष्ठ बुद्धीने परीक्षण करणारे राजवाडे, समाजशास्त्र रचू पाहणारे राजवाडे, महाराष्ट्रातील कर्त्या पुरुषांची मोजदाद, बडोद्यांतील सुधारणा अशा लेखातून प्रचलित समाजस्थितीची चिकित्सा करणारे राजवाडे, मंडळीकरणाचा आग्रह धरणारे व विज्ञानमंडळापासून रेल्वे पॅसेंजर्स असोसिएशनपर्यंत नाना प्रकारची मंडळे स्थापणारे राजवाडे, अशी राजवाडे यांची ही अनेक रूपे आहेत. ती पाहिल्यावर असा प्रश्न मनापुढे उभा राहतो, की ह्यातील खरे राजवाडे कोणते? डॉ. केतकरांनी म्हटले आहे की, 'साहित्यशोधक या नात्याने राजवाड्यांचे काम झाले, तेदेखील एका मनुष्याने केले, तर त्या मनुष्याने मोठी सेवा केली, असे होईल. बावीस खंडांचे प्रकाशन करणारा एखादा पुस्तक प्रकाशनाच्या धंद्यातला मनुष्य घेतला तरी, त्याची कामगिरी लहान-सहान होईल असे नाही. आणि राजवाड्यांची भाषाशास्त्रविषयक कामगिरी लक्षात घेतली तर तीपुढे अनेक मोठमोठ्या अभ्यासकांचे प्रयत्न फिके पडतील. राजवाड्यांच्या अनेक कामगिऱ्यांपैकी सर्वांत अधिक मोठी कोणती हे ठरवून राजवाड्यांचे वर्णन करावयाचे झाले तर त्यांस भाषाशास्त्रज्ञ म्हणावे लागेल आणि त्यांची गणना अत्यंत मोठ्या वैय्याकारणात करावी लागेल. हेमचंद्र आणि वररुचि ह्यांचे प्रयत्न राजवाड्यांच्या प्रयत्नांच्या दृष्टीने काहीच नाहीत. इतिहासाचार्य किंवा इतिहाससंशोधक हे नाव राजवाड्यांस देण्यात आपण त्यांच्या कार्याचे अज्ञान दाखवू. त्यांच्या कार्याचे गुरू लघुत्व माझ्या मते (१) भाषाशास्त्रज्ञ (२) वैय्याकरण (३) शब्दसंग्राहक, (४) इतिहाससंशोधक ह्या अनुक्रमाने आहे.' केतकरांचे

म्हणणे अगदी खरे आहे आणि 'इतिहासाचार्य' म्हणून आपणांपैकी बहुसंख्यांस राजवाडे जरी माहीत असले, तरी तो म्हणजे त्यांच्या विराट व्यक्तिमत्त्वाचा प्रकट झालेला केवळ एक अंग आहे. हे निरंतर लक्षात ठेवले पाहिजे. 'एतावानस्य महिमा । अतो ज्यायांश्च पुरुषः ।' या 'पुरुषसूक्त'तल्या वचनाप्रमाणे प्रकट मनापेक्षा अप्रकट मन व समुद्राच्या पृष्ठभागावर दिसणाऱ्या हिमनगापेक्षा, त्याचा पृष्ठभागाखाली असलेला भाग अमर्याद व अथांग असतो, त्याप्रमाणे राजवाड्यांच्या प्रकट झालेल्या व्यक्तिमत्त्वाच्या मानाने त्यांचे अप्रकट व अज्ञात राहिलेले व्यक्तिमत्त्व व्यापक आणि अनंत होते. हे व्यक्ताच्या पलीकडे असलेले अव्यक्त रूप हेच राजवाडे यांचे खरे रूप होय. ब्राउनिंगने एका ठिकाणी काढलेले उद्‌गार राजवाडे यांना चांगले लागू पडतात. 'All I could never be, All, men ignored in me, This I was worth to God, whose wheel the pitcher shaped.'

राजवाडे यांच्या साऱ्या आयुष्यात परिस्थिती त्यांना नेहमीच प्रतिकूल राहिली, त्यामुळे त्यांच्या संपूर्ण व्यक्तिमत्त्वाचा आविष्कार त्यांच्या हयातीत काही झाला नाही. सातवळेकरांनी त्यांच्याबद्दल म्हटले आहे, 'त्यांस आपण निदान पंचाण्णव वर्षे तरी जगणार असे खात्रीने वाटत असे व त्या हिशेबाने ते आपल्या कामासंबंधाने बोलत असत. माझ्याजवळ त्यांनी कित्येकदा म्हटले होते की, 'आपण ८५ वर्षांचे वय होईपर्यंत इतके लिहून संपविणार व मग पुढे अगदी एकांत सेवन करणार आहोत.' त्याचमुळे कोणतेही काम कसेतरी वेळेच्या आत संपविण्याची घाई त्यांना कधी नव्हती. 'He that runs against time has an antagonist that saffers on caesalities हे जॉनसनचे वचन त्यांना लागू नव्हते. कारण त्याचा दिवस मोठा होता व रात्र पडायला अजून फार फार अवकाश होता. म्हणून ते इतिहासाच्या प्रस्तावना लिहोत की, धातुकोशाची रचना करोत, काळ वेळ विसरून ते तन्मय होत. त्यांच्या ऐतिहासिक प्रस्तावनांबद्दल कृ. पां. कुलकर्णी म्हणतात, 'ह्या प्रस्तावना लिहिताना त्यांची जशी

काही त्या विषयात समाधी लागत असे. अष्टौप्रहर दुसरा विषय डोक्यात नसे. ते अंगमोजक्या बाकांवर उताणे निजून वर आढ्याकडे दृष्टी लावून लेख्य विषयाचा विचार करित. अशी एखादी प्रस्तावना लिहून झाली म्हणजे मग त्याचा त्यांना शिणोटा येई व तो घालवण्या-साठी मग ते कुठेतरी विश्रांतीसाठी जात. ते नेहमी म्हणत की, श्रमाने झालेली झीज मला भरून काढली पाहिजे ! 'धातुकोशा'च्या रचनेत त्यांच्याबरोबर काम केलेले मायदेव यांनी राजवाड्यांबद्दल म्हटले आहे की, 'खाटेवरच्या फळ्यावर उताणे निजून ते एखादा कोश चाळू लागले की, तासच्या तास त्यांची तंद्री लागे.' पण राजवाड्यांचे दुर्दैव हे की, त्यांच्या अपेक्षेइतके आयुष्य त्यांना लाभले नाही. त्यांचा दिवस त्यांच्या कल्पनेपेक्षा फार लवकर मावळला.

ज्याचे भरले त्याचे सरले. आयुष्य ही काही कुणाच्या हातातली गोष्ट नाही. यामुळे आपल्या स्वतःच्या जीवनाबद्दलचा राजवाडे यांचा हिशेब चुकला, याला त्यांचा काय किंवा इतरांचाही काय, काही फारसा इलाज नाही. पण वैयक्तिक जीवनाप्रमाणे प्रतिकूल देशस्थि-तीही त्यांच्या व्यक्तिमत्त्वाच्या संपूर्ण आविष्काराला मारक ठरली असण्याची शक्यता नाकारता येत नाही. शेजवलकरांनी एके ठिकाणी म्हटले आहे, 'मला काय बाधले ? काळा आदमी झालो हे बाधले; हिंदुस्थानात जन्मलो हे बाधले; महाराष्ट्रात जन्मलो हे बाधले; ब्राह्मण जन्मणे हेही बाधले, फार काय, कऱ्हाडा जन्मलो तेही बाध-ल्यावाचून राहिले नाही !' वैयक्तिक दुःखाला सामाजिक स्वरूप देण्याची शेजवलकरांची सवय प्रसिद्धच होती. पण काही प्रमाणात का होईना, त्यांच्या बोलण्यात सामाजिक सत्य जरूर होते. राजवाड्यांना या न्यायाने काय बाधले याचा विचार केला तर ते काळा आदमी म्हणून जन्मले व परतंत्र हिंदुस्थानात जन्मले ही गोष्ट फार बाधली हे कबूल करण्यावाचून गत्यंतर नाही. ते पारतंत्र्यात जन्मले, पार-तंत्र्यात जगले व पारतंत्र्यात मेले. कोणत्याही युरोपियनांशी टक्कर देण्याइतकी त्यांच्या बुद्धीची झेप होती. पण पारतंत्र्यामुळे तिचे चीज झाले नाही. त्यांच्या व्याकरणांचा उपयोग फ्रेंच पंडित करतात. पण

स्वदेशात ते समजाण्याची पात्रता नाही. अज्ञानात बुडालेले बहु-जन आणि विद्वानाला कवडीची किंमत न देणारे श्रीमंत ह्या खिन्न करणाऱ्या वस्तुस्थितीची राजवाडे यांना जाणीव होती. आपली योग्यता जाणणारे विद्वान नाहीत म्हणून राजवाडे खिन्न होत. आज-पासून वीस वर्षांनी माझे ग्रंथ समजू लागतील असे ते म्हणतात. उपेक्षे-इतके प्रतिभेला मारक काहीच नाही. त्या उपेक्षेचा अनुभव राजवाडे यांना फार आला.' बोद्धारो मत्सरग्रस्ता: प्रभवो स्मयदूषित: । अपे-धोपश्ताश्चान्ये जीर्णमङ्गे सुभाषितम् ॥' मत्सराने ग्रासलेले बुद्धिमान, गर्वाने माजलेले राजे, अज्ञानाने गारठलेले बाकीचे लोक या परिस्थि-तीत सारे शहाणपण जागीच जिरून जाते. म्हणून राजवाड्यांनी एके ठिकाणी उद्वेगाने म्हटलेले आहे, ' विद्यावृद्धयर्थ द्रव्य का, कसे व कोठे खर्चावे हे समजण्याची अक्कल अद्याप लोकांना, राजांना, परिषदांना व सभांना पुरावयाची आहे, कबुतरे, वारवयोषिता, पहिलवान, तमाशे-वाले यांची पारख धनिकांना होऊ शकते. विद्वान, संशोधक, व विचार द्रव्ये यांना ओळखण्याची इंद्रिये अद्याप राजांना व परिषदांना आलेली नाहीत. ती आली म्हणजे वागीश्वरांची ओळख धनेश्वरांना पटून शास्त्रे, कला, ज्ञानप्रसार व विदग्ध वाङमय यांनी भूमी फुलून जाईल. वागीश्वरांची ओळख धनेश्वरांना पटण्याचा हा योग राजवाडे यांच्या हयातीत काही आला नाही. त्यांचे स्वप्न स्वप्नच राहिले. अनुकूल परिस्थिती असल्याशिवाय म्हणजे घनोदय झाल्याशिवाय मोरासारख्या तिर्यक योनीतल्या प्राण्यालासुद्धा पिसारा उभारून नाचावेसे वाटत नाही व केकारव करावासा वाटत नाही. राजवाडे तर माणूस होते-वैयक्तिक आणि सामाजिक जीवनात जन्मभर राहिलेल्या या प्रतिकूल परिस्थितीमुळे राजवाड्यांच्या प्रतिभेचा पिसारा पूर्णपणे कधी उभा-रला गेला नाही व तिच्या नयनमनोहर मयूर–नृत्याने रसिकांच्या डोळ्याचे पारणे कधी फिटले नाही. त्यामुळे आज जे राजवाडे आप-णांपुढे आहेत, ते केवळ अंशमात्र आहेत. परिस्थितीच्या बंधनामुळे शेक्सपिअरसारख्या अव्वल दर्जाच्या प्रतिभावंताच्या स्वैरसंचाराला

जी बंधने पडतात व त्याची जी शोकांतिका होते, तिचे विवेचन करताना कार्लाईलने काढलेले उद्‌गार राजवाड्यांसारख्या प्रतिभावंताच्या शोकांतिकेलाही तितकेच लागू आहेत.

मला असे म्हणावयाचे आहे की, शेक्सपिअरच्या साहित्यात त्यांचे संपूर्ण प्रतिबिंब पडलेले नाही. त्यांच्या कृती म्हणजे त्यांच्या अंतरंगातील विश्वाचे ओझरते दर्शन घडवणारी काही गवाक्षे आहेत. त्यांच्या सर्व कृती मोहक, अपूर्ण, चिरडणाऱ्या परिस्थितीत लिहिलेली वाटतात. फार क्वचित त्याच्या अंतःकरणाचा उद्‌गार त्यात उमटतो अरेरे! शेक्सपिअरला ( सुद्धा ) ग्लोब थिएटरसाठी लिहिणे भाग पडले. त्यांच्या थोर आत्म्याला त्याच साच्यात जगु काही] मोडतोड करून बसविणे त्याला भाग होते. दुसऱ्या कोणत्याही नाही. म्हणजे जसे आपणा सर्वांच्या बाबतीत तसे त्याच्या बाबतीत होते. परिस्थितीला टाळून कोणी काम करू शकत नाही. शिल्पकार त्यांचा मुक्त विचार व्यक्त करू शकत नाही. जसा दगड दिला असेल त्या दगडात आणि जशी साधने उपलब्ध असतील, त्या साधनांनी त्याला विचारांचा आविष्कार करणे भाग असते. कोणताही कवी घ्या की कोणताही माणूस घ्या, त्याचे फक्त काही भाग तेवढे आपल्याला उपलब्ध होऊ शकतात.' )

प्रभाकर वासुदेव बापट यांना एकदा टिळक म्हणाले, 'मी दोन दोन तास एक एक विषय करतो. विषयाची आलटापालटही मला विश्रांतीसारखी होते.' राजकारण, तत्त्वज्ञान, गणित, वेद, ज्योतिष या टिळकांच्या अभ्यासाच्या भिन्न क्षेत्रांप्रमाणे, इतिहास, भाषाशास्त्र, व्युत्पत्ती, भौतिकविद्या, वेदपुराणे, अशी राजवाडे यांची अभ्यासाची क्षेत्रे भिन्न आणि व्यापक होती, पण अभ्यासाच्या क्षेत्रात बदल करण्याचे त्यांचे कारण टिळकांप्रमाणे कामात बदल म्हणजे विश्रांती अशा प्रकारचे मानसिक विश्रांतीचे नव्हते. त्यांची दृष्टि वेगळी होती. विद्या हे त्यांच्या मनोविनोदनाचे साधन नव्हते. ज्ञानासाठी ज्ञान अशी त्यांची कल्पना नव्हती, तर जीवनासाठी ज्ञान अशी त्यांची भूमिका होती.' जॉन्सनचे वचन त्यांच्या बाबती फार खरे होते. विद्येबद्दलच्या या

समाजाभिमुख दृष्टीमुळे आपल्या देशात ज्ञानाच्या प्रत्येक क्षेत्रात कर्त्या माणसांचा अत्यंताभाव त्यांना दिसे व तो दूर करण्यासाठी ते स्वतःपासूनच सुरुवात करू लागत. 'महाराष्ट्रातील कर्त्या पुरुषाची मोजदाद' या निबंधात ते म्हणतात, 'शेकडो तात्त्विक व व्यावहारिक हालचालीचा पत्ताही आमच्या समाजाला नाही. १९ मुख्य शास्त्रात आपला एकही शोधक प्रतिनिधी नाही. इतकेच नव्हे तर मुख्य शाखांच्या ज्या अनेक शाखोपशाखा आहेत, त्यातही आपला कोणी कर्ता प्रतिनिधी नाही.' 'कादंबरी' या त्याच्या प्रसिद्ध निबंधात देशातील ज्ञानार्जनाच्या अक्षम्य हेळसांडी-बद्दल हीच व्यथा प्रकट झाली आहे.' आपल्या इकडील सरस्वतीच्या राज्यातील बहुतेक एकूण एक क्षेत्रे लागवडीवाचून आज शेकडो वर्षे रिकामी पडलेली असता, अमुक क्षेत्र नापीक व अमुक क्षेत्र सुपीक, असे आम्ही काय म्हणून म्हणतो ? गोष्ट अशी आहे की, आपल्या इकडील सरस्वती प्रदेशातील सर्व क्षेत्रे भरपूर पीक देण्याला, खपून मेहनत करणाऱ्या व शास्त्राचा गात्रांचा उपयोग करणाऱ्या उद्योगी कृषीवलाची उत्सुकतेने नुसती वाट बघत आहे. ही फार दिवसांची आशा सफल झाली तर ही क्षेत्रे जे सफल पीक देतील ते घेऊन महा-राष्ट्रातील लोक आपल्याला धन्य मानतील व पाहून पृथ्वीवरील सर्व राष्ट्रे कौतुकाने माना तुकवतील ! परंतु हे व्हावे कसे ? हाच प्रश्न आहे !' दामले यांच्या व्याकरणाचा उपसंहार करताना ते म्हणतात, 'प्रत्येकाने आपापले काम स्वतःच करावे हे श्रेयस्कर. का की, प्रस्तुत काळी आपल्या देशातली परिस्थितीच अशी आहे. कोणतेही शास्त्रीय काम करण्याला या देशात प्रायः अनेक तर सोडून द्या पण अर्धाही माणूस तयार झाला नाही. तेव्हा श्रमविभाग होण्याची आशा करणे आणखी पन्नास शंभर वर्षे या देशात अशक्य होय. कधी काळी चुकून-माकून काही शास्त्रीय कृत्य उठविण्याचे सुदैवाने एखाद्याच्या मनात आले व मनात येऊन त्या कृत्याचा अंत पाहण्याचा उत्साह त्याच्या ठायी वर्षानुवर्ष कायम राहील तर त्याने ह्या देशात कोणाच्याही साहाय्याची अपेक्षा करू नये हे उत्तम. कारण साहाय्य होण्यासारखी

परिस्थिती नाही. एका काळच्या ह्या शास्त्रीय भूमीत सध्या शास्त्राचा अत्यंत लोप झालेला आहे. प्राय: ह्या देशातील यच्चयावत लोकांची स्थिती आफ्रिकेतील निग्रोंच्या स्थितीच्या जवळ जवळ झालेली आहे. ज्यांना ग्राज्युएट म्हणून म्हणतात. त्यांच्याजवळही शास्त्र नाही व ज्यांना शास्त्री म्हणतात, त्यांच्याजवळही शास्त्र नाही. एक पाश्चिमात्य सटरफटर पुस्तके वाचून-घोकून खर्डेघाशा गुलाम बनलेला आहे व दुसरा पौर्वात्य ग्रंथ घोकून मंद झालेला आहे. अशा ह्या दुहेरी कंगाल समाजाला सुधारण्याचे म्हणजे शास्त्रीय स्थितीत नेण्याचे बिकट कृत्य कोणाचेही सहाय्य मिळण्याची आशा न करिता पार पाडावयाचे आहे.

राजकीय, सामाजिक, वाङमयीन वगैरे कोणतेही कृत्य ह्या देशात ज्या कोणाला करण्याची उमेद झाली असेल, त्याने अंगीकारले ह्या कृत्याच्या विस्ताराचा अंदाज घ्यावा, त्यात व्यंगे व दोष कोठे आहेत त्याची विचक्षणा करावी, व ते दोष, व्यंगे काढण्यास स्वत:च लागावे, इतर कोणाची वाट पाहू नये. कारण ममतेने धावून येण्यास कोणीच नाही. स्वजनही नाहीत व परजन तर नाहीतच नाहीत. अशी एकंदर फार हलाखीची स्थिती आहे, आणि ही स्थिती काही उत्साह विघातक नाही. संकट यावे तर असेच यावे ह्या संकटांतच आपल्या कर्तबगारीची खरी परीक्षा आहे, ' देशात सर्वत्रच अशा प्रकारे नकारघंटा वाजत असल्यामुळे, राजवाडे यांना स्वत: पुढाकार घेऊन इतिहास–संशोधनापासून ते विज्ञानापर्यंत आणि भारत इतिहास संशोधक मंडळापासून ते देवळांच्या जीर्णोद्धार मंडळापर्यंत कामे करावी लागली. माणूस एकटा, त्याचे आयुष्य मर्यादित, कार्याची क्षेत्रे अमर्याद त्यामुळे राजवाड्यांपाशी अलौकिक एकाग्रतेचा दुर्मिळ गुण असूनही त्यांना ' एकव्यवसायनिरत ' राहता आले नाही व त्यामुळे कोणत्याही एका कार्याची तड गाठता आली नाही. सरदेसाई यांनी त्यांच्यावर आक्षेप घेतला आहे की, ' ज्याच्या बुद्धीची अव्यवहारिकता ती यातच आहे.हल्लींच्या शास्त्रीय युगात विषयांची विशिष्टता इतकी वाढली आहे की एखाद्या लहानशा आकुंचित विषयात

एक जन्म कधीच पुरणार नाही. मग राजवाड्यांनी तर अनेक मोठमोठ्या विषयांचे प्रचंड ओझे एकट्याने उचलण्याचा प्रयत्न केला. त्यांत त्यांच्या प्रखर बुद्धीचा विस्तार आपणास दिसला तरी एका अर्थाने त्यांचे श्रमही वाया गेलेले वाटतात.' सरदेसाई यांचा हा आक्षेप खरा आहे, पण त्यांचे कारण या फुलावरून त्या फुलांकडे धाव घेणाऱ्या भ्रमराप्रमाणे, या विषयाहून त्या विषयाकडे झेपावणाऱ्या राजवाड्यांच्या चंचल बुद्धीची रसलोलुप भ्रमर वृत्ती हे नसून, 'अंध अंधारी बैसले' या वचनाप्रमाणे पारतंत्र्याच्या अंधारात ज्ञानाचे डोळे हरवून बसलेल्या आंधळ्या स्वजनांच्या सर्वांगीण प्रबोधनाची रात्रंदिवस लागलेली जिवंत तळमळ हे आहे, हे एवढा वेळ राजवाड्यांच्या वाङ्‌मयांतले जे उतारे दिले, त्यावरून स्पष्ट होईलच.

या संदर्भात डॉ. केतकर यांनी राजवाड्यांच्या अभ्यास–क्षेत्राच्या विविधतेचे केलेले स्पष्टीकरण मूलगामी आहे–' 'एका क्षेत्राचा अभ्यास करून ते टाकून दुसरे क्षेत्र घ्यावे ही त्यांची वृत्ती होती. त्या वृत्तीची कारणे फार खोल होती. त्यांच्याशी गप्पा मारताना त्यांच्यात एका गोष्टीची जाणीव दिसे व ती जाणीव म्हटली म्हणजे आपणच पहिले राष्ट्रविकासाच्या भावनेने कामात पडलेले संशोधक आहोत ही होय. ह्या प्रकारच्या जाणीवेमुळे महाराष्ट्राच्या बुद्धीस सर्व प्रकारे चालना देण्यासाठी, त्यांनी अनेक क्षेत्रात संशोधन स्वत: आपल्या अंगावर घेतले असावे आणि ज्या विषयामध्ये पारंगतता मिळविली, ज्या क्षेत्रातच कार्य ते करीत, त्या क्षेत्राचाही त्याग करावयास त्यांचे मन तयार झाले असावे. अर्थात राजवाडे हे आपल्या आयुष्याकडे इतिहास–संशोधक ह्या नात्याने पाहात नसून, संस्कृती विकास प्रवर्तक ह्या नात्याने पहात होते आणि त्यांची खरी किंमत ओळखणाऱ्याने, त्यांच्या आयुष्याचे, ह्याच दृष्टीने अवलोकन केले पाहिजे.'

ही गोष्ट अर्थात, चांगलीच होती. आपल्या राष्ट्रांचा संस्कृती विकास प्रवर्तक होणे ह्यापेक्षा मातृभूमीचे पांग फेडणारे पुण्य कृत्य

दुसरे कोणते असेल बरे ? पण ' विचित्ररूप: खलु चित्तवृत्तय: ' या न्यायाने या चांगल्या गोष्टीचा परिणाम राजवाड्यांच्या स्वभावावर विपरीत झाला. त्यांच्या मनाचे ' झाड ' अहंकाराने झपाटले. त्यांच्या या ' कोऽन्योऽस्ति सदृशो मया–माझ्या सारखा दुसरा कोण?' दृष्टीला, जी खरोखर मोठी माणसे होती, ती लहान दिसत आणि जी बिचारी लहान होती ती तर त्यांना कस्पटासमान वाटत. त्यांचा स्वभाव फटकळ, मनात येईल ते सरळ ठोक बोलणारा, त्यामुळे त्यांच्या मनांतली तुच्छताबुद्धि कसलाही पडदपोशीचा विधिनिषेध न बाळगता, अगदी नि:संकोचपणे आहे तशा स्वरूपात प्रकट होई. ' संस्कृती विकास प्रवर्तक ' म्हणून गौरव करतानाच केतकरांनी राजवाड्यांच्या या व्यंगावर अचूक बोट ठेवले–' ' अभ्यासक या नात्याने ते फक्त भांडारकर, टिळक व रावबहादुर जोशी ह्यांचाच उल्लेख थोडासा आदरपूर्वक करीत; पण संशोधनाच्या कार्याकडे प्राधान्याने पडलेले पहिले आपण, हीच जाणीव ते दाखवीत, ' आदरणीय अनादरणीय होत, इतक्या मर्यादेपर्यंत की, त्यांचा उल्लेख बेधडकपणे एकवचनाने केला जाई. पुण्याला असताना मायदेव त्यांच्या बरोबर काम करीत असत. त्यांनी राजवाड्यांच्या असल्या इरसाल बोलण्याचा नामी मामला दिला आहे–' आम्ही स्वत:ला सिंह मानतो व बाकी सारी माणसे क्षुद्र जनावरे समजतो ' असे उद्गार. ते काढीत. ते बोलताना माधवराव रानडे, बळवंतराव टिळक व नरसोपंत केळकर यांचा उल्लेख महाद्या, टिळक्या व नरशा अशा शब्दांनी करीत. संशोधनाचे काम टाकून दत्त्या (दत्तोपंत पोतदार) नुसत्या सभा घेतो व तू तर बोडक्यांना शिकवीत, बसला आहेस, असे ते मलाही म्हणत–' सरदेसाई म्हणतात–' प्रत्यक्ष रानडे किंवा टिळक यांचे संबंधाने बोलताना किंवा लिहिताना ते अनुदार एकेरी उल्लेख करीत तो मला खपला नाही. ' त्यांचे शिष्योत्तम कृ. पां. कुलकर्णी यांनी त्यांचे चांगले वर्णन केले आहे. ' जी चालण्याची गत तीच बोलण्याची. मी म्हणजे कोणीतरी विशेष, इतर सर्व माझ्यापुढे तुच्छ अशी जाणीव क्षणोक्षणी होत असे. हे पुढे वावरणारे सर्व लोक

कारकुंडे मरण्यासाठीच जन्माला आलेले, मीच तेवढा द्रष्टा, अशी बेपर्वाईची भावना असे. आदरयुक्त कुणासंबंधी उल्लेख मिळण्याचा नाही. त्यांचे परममित्र मुंडले यांनीही म्हटले आहे की, राजवाड्यांनी ज्याला मनसोक्त शिव्या तोंडावर किंवा माघारी त्यांच्याविषयी चर्चा निघाली असता दिल्या नाहीत अशी त्यांच्या काळी एकही ठळक व्यक्ति महाराष्ट्रात उरली नव्हती.' मुंडले असेही पुढे म्हणतात की, 'पण तो क्षण निघून गेला की, जे सर्व विसरून जात. त्यांचा राग किंवा शिव्या ह्या स्वतंत्र वृत्तीच्या किंवा राष्ट्रस्वातंत्र्याच्या ध्येयास अनुसरून सापेक्ष असत. त्यात त्यांचा लेशमात्रही स्वार्थ नसे. ज्या व्यक्तीला ते शिव्या देत तिचे गुणवर्णन करण्यासही ते कचरत नसत. तसेच टिळक, गोखले, भांडारकर व रानडे ह्या महाराष्ट्रीय थोर पुरुषांसंबंधाने—जरी त्यांच्या मतासंबंधी व कार्यपद्धतीसंबंधी मतभेद असला तरी नेहमी आदरानेच बोलत असत व त्यांच्या गुणदोषांचे मार्मिक रीतीने पृथक्करण करून दाखवीत असत.' मुंडले यांचे हे म्हणणे अगदी खरे आहे पण ते फक्त त्यांच्या पुरतेच आहे. कारण मायदेव, सरदेसाई, केळकर, कुलकर्णी यांचा अनुभव दुर्दैवाने या बाबतीत वेगळा होता. आणि दुर्दैवाने राजवाड्यांची स्तुती लोक विसरत व शिव्या तेवढ्या लक्षात ठेवत. त्याला काय करणार? मायदेव म्हणतात, की, राजवाडे यांच्याजवळ एक कारकून काम करीत होता. त्याला ते सांगत, 'तू मेलास तर जगाचे नुकसान होणार नाही. आम्हांला जगले पाहिजे. तेव्हा ह्या पाच रुपड्या घे व त्यांचे आमच्यासाठी लोणी आण!'

आता हे खरे आहे की, डॉ. केतकर यांचा राजवाड्यांच्या बाबतीत अनुभव इतरांपेक्षा अगदी वेगळा होता. दोघेही सारखेच विद्वान, दोघेही सारखेच 'क्षुद्रजनक्षुण्ण' मार्गाने न जाणारे, दोघेही सारखेच सडेतोड व रोखठोक व दोघेही सारखेच विक्षिप्त, म्हणूनही दोघांचे गोत्र जमले असेल. कसेही असो, पण १९२५ च्या ऑक्टोबरपासून १९२६ च्या मार्चपर्यंत राजवाडे केतकरांच्या शेजारी भाड्याने बंगला घेऊन राहिले होते व दोघांच्या कसल्याही कुरबुरी झाल्या नाहीत.

'आपली उपजीविका कशी करता ?' असा प्रश्न यत्किंचित माणसाला विचारला तरी त्याला राग येईल. पण राजवाड्यांसारख्या जमदग्नीला असा प्रश्न केतकर अगदी बेधडकपणे विचारीत आणि राजवाडेही त्याचे प्रांजलपणे उत्तर देत. समकालीन व्यक्तींची कादंबऱ्यात पात्रे घालण्याची केतकरांची पद्धत प्रसिद्धच आहे. 'गोंडवनातील प्रियंवदा' या आपल्या कादंबरीत केतकरांनी राजवाड्यांवरून 'वैजनाथशास्त्री' या नावाचे एक पात्र घातले होते व हा वैजनाथशास्त्री पुढे एका विधवेशी पुनर्विवाह करतो असे दाखविले होते. राजवाड्यांचे नाव विश्वनाथ, त्यांच्या भावाचे नाव वैजनाथ. त्यामुळे वैजनाथशास्त्री म्हणजे एक प्रकारे राजवाड्यांचे विडंबन, निदान प्रतिबिंब तरी वाटण्यासारखे होते. या विडंबनाने भले भले फसले. जदुनाथ सरकारांनी सुतावरून स्वर्ग गाठला व या कादंबरीच्या आधारे राजवाड्यांचा वृद्धापकाळी विधवेशी पुनर्विवाह करण्याचा विचार होता, असे विधान त्यांच्या मृत्युलेखात केले. केतकरांचा कादंबरीतला परिहास परमार्थाने घेतल्याचा हा परिणाम होय.

पण सरकारांसारखे 'नामूलं लिख्यते किंचित्' असा सावधपणा असलेले इतिहासकारही चकले, यावरून राजवाड्यांची किती हुबेहूब नक्कल केतकरांनी कादंबरीत उठवून दिली होती, याचा अंदाज येण्यासारखा आहे. राजवाड्यांनी पैसे खर्च करून ही कादंबरी विकत घेतली, ती वाचली आणि वैजनाथशास्त्री ही कोणाची प्रतिकृती आहे हे आपण ओळखले आहे असे त्यांनी केतकरांना दाखविले. केतकरांचे 'निःशस्त्रांचे राजकारण' हेही पुस्तक त्यांनी विकत घेऊन वाचले व म्हणाले, 'तुमचा या प्रकारच्या राजकारणावर विश्वास आहे, माझा नाही. माझी ही समजूत आहे की, इंग्रजांना लाथा मारण्याची शक्ती आपल्यात आल्याशिवाय इतर सर्व राजकारणे व्यर्थ आहेत आणि ही लाथा मारण्याची शक्ती जर शास्त्राचा अभ्यास आणि संशोधन यांच्या बाबतीत आपण इंग्रजांच्या पुढे गेलो तरच उत्पन्न होईल आणि ही शक्ती उत्पन्न झाल्याशिवाय काहीएक होणार नाही. इंग्रज इथे चरण्यासाठी आला आहे.' लोकांकडचे जेवण त्यांना आवडत

नसे. जेवण चांगले मिळत नाही ही त्यांची तक्रार सदैव असे. म्हणून ते स्वयंपाक हाताने करीत व शक्यतो कोणाकडे उतरत नसत. त्या संदर्भात एकदा ते केतकरांना म्हणाले, 'सामान्य मनुष्याच्या घरात चार-पाच माणसे असावयाची आणि पगार शंभर रुपयाच्या आत-बाहेर असावयाचा. अशी स्थिती असली म्हणजे वीस-पंचवीस रुपयांचा ऐवजदेखील सामान्य महाराष्ट्रीय ब्राह्मणाच्या पोटात जायचा नाही. अशांच्या घरी उतरणे म्हणजे आपल्या खाण्यापिण्याची आबाळ करून घेणे आहे,' या दृष्टीने 'स्वार्थत्यागाची मीमांसा' हा केतकरांचा लेख त्यांना विशेष आवडत असे. त्यांना कोणी 'स्वार्थत्यागी' म्हटले की ते रागावत. 'स्वार्थत्यागी म्हणजे खराब जेवण जेवून आत्महत्या करून घेणारा माणूस' अशी 'स्वार्थत्यागी' या शब्दाची व्याख्या राजवाडे करीत. केतकरांच्या घरीही राजवाडे जात आणि मोठ्या विनोदी गृहस्थाप्रमाणे बोलत. त्यांचे हास्ययुक्त बोलणे पाहून सौ. शीलवतीबाईंना मोठा आनंद होई. राजवाडे त्यांच्याशी नेहमी मराठीत बोलत. कारण प्रथम राजवाडे शीलावतीबाईंशी फ्रेंचमध्ये बोलू लागले तेव्हा ते बोलणे कुणालाच समजेना. कारण राजवाड्यांचे उच्चार चुकले होते. त्यांचे फ्रेंचचे ज्ञान सारे पुस्तकी आणि शीलवतीबाई इंग्रजी बोलू लागल्या तेव्हा ते इंग्रजांचे इंग्रजी उच्चार राजवाड्यांना कळेनात. केतकरांकडे केळी किंवा संत्री यांनी आतिथ्य होई आणि केळी असली म्हणजे राजवाडे त्याचा परामर्श 'मुक्तहस्ताने' घेत. राजवाडे यांच्याविषयी त्यांच्या आनंदी स्वभावामुळे आमच्या घरातल्या सर्व मंडळींचे चांगले मत झाले होते.' असे केतकरांनी म्हटले आहे. केतकरांसारखाच अनुभव सातवळेकरांचाही होता. नेहमी रुद्रस्वरूपात वावरणाऱ्या राजवाड्यांचे शिवस्वरूपच सातवळेकरांच्या प्रत्ययाला आले.त्यांच्याकडे राजवाडे नेहमी आनंदाने आपल्या घराप्रमाणे राहत. सातवळेकरांच्या मुलावर आपल्या मुलाप्रमाणे प्रेम करीत. केव्हा केव्हा आठवणीने त्यांना पुस्तके बक्षीसही देत व नेहमी सौम्यपणाने वागत. पण केतकर काय किंवा सातवळेकर काय, अशा अपवादात्मक विरळ भाग्यवंतांपैकी होते की, ज्यांना

राजवाड्यांचा अनुभव चांगलाच आला. बहुसंख्य लोकांचा अनुभव अगदी उलट होता. 'हे राजवाडे तुमच्या येथे येतात पण त्यांच्या तिरसट वृत्तीने तुम्हास त्रास कसा नाही होत ?' म्हणून कित्येकांनी सातवळेकरांना विचारलेही होते, असे सातवळेकरच म्हणतात. या प्रश्नातच सारे उत्तर आहे. राजवाडे यांनी केलेले पर्वतप्राय कष्ट, त्यांच्या पाठीशी सदैव लागलेली पायपीट आणि दगदग, त्यांनी जन्मभर भोगलेले दारिद्र्य व जेवण्याचे हाल, संशोधनाच्या कामी ज्यांची त्यांच्या पासंगाला लागण्याची योग्यता नव्हती, त्यांच्याकडून सोसावे लागलेले अपमान, त्यांच्या साहित्याची व बुद्धिमत्तेची झालेली उपेक्षा यांची भर त्यांच्या मूळच्या संतापी स्वभावात पडून त्यांच्या व्यक्तिमत्त्वाचे सारे रसायनच कडू जहर झाले असेल, हे अगदी शक्य आहे. हेही शक्य आहे की, सकारण किंवा अकारण राजवाड्यांवर नाराज असलेल्या लोकांकडून जाणून किंवा नेमून केल्या गेलेल्या प्रचाराचा भागही त्यांच्याविषयी प्रचलित असलेल्या प्रतिकूल लोकमताचा असू शकेल.

हेही खरे आहे, की रिकामटेकड्या जिज्ञासूना ते थारा देत नसत पण विद्येची खरी आस्था दिसली तर प्रसन्न वृत्तीने तासन् तास त्यांच्याशी ते बोलत. कृ. पां. कुलकर्णी यांना पहिल्या सपाट्यात त्यांनी चमकावले की, 'काही खराच अभ्यास करायचा आहे का कायमची सरकारी नोकरीच करायची व जन्मभर कारकुंडाच राहायचंय ? काय तुमच्या मनात आहे ? हे अगोदर ठरवा व नंतर माझ्याकडे या. उगाच येण्यात काही अर्थ नाही.' कुलकर्ण्यांनी राजवाड्यांच्या या प्रश्नाला समाधानकारक उत्तर दिले व त्यांच्या सच्च्या शिष्यधर्माची प्रचीतीही आली, तेव्हाच राजवाडे यांनी त्यांना कायमच्या अन्तेवासीपणाचा दुर्मिळ बहुमान दिला. अशा कडक परीक्षेला उतरणारे लोक थोडेच असल्यामुळे बहुसंख्य लोकांना राजवाड्यांच्या या सौजन्याची प्रचीती येणे दुरापास्तच होते. त्यामुळे 'अंतरी निर्मळ' असले तरी 'वाचेचे रसाळ' नसल्यामुळे राजवाड्यांबद्दल गैरसमजाचे पीक येणे शक्य होते. पण राजवाड्यांच्या बाबतीत त्यांच्या

बाजूने या सर्व गोष्टी सहानुभूतीने जमेला धरल्या तरी, त्यांच्या ठिकाणी उग्र आणि दुर्दम्य अहंकाराचा स्वभावदोष मोठाच होता हे नाकारण्यात काही अर्थ नाही. त्यामुळे, त्यांच्याबद्दल आदर वाटून त्यांना मदत करू पाहणाऱ्या लोकांना कोठून हे नसते घोंगडे गळयात घेतले असे म्हणायची वेळ येई. धुळयाच्या भटांनी चोवीस वर्षे त्यांची देखभाल केली व मैत्री संभाळली, यांचे श्रेय राजवाडयांपेक्षा भटांच्या सहनशीलतेला आहे. काही काही प्रसंगी आपल्या कटकटींनी व बड-बडीने राजवाडे भटांना इतके सळो की पळो करून सोडीत की, त्यांना भेटणे नको असे भटांना वाटे. पण तसे त्यांच्याकडून घडले नाही. त्याचे कारण भटांनी दिले आहे ते लक्षात घेण्यासारखे आहे. ते म्हण-तात, 'कारण राजवाडयांविषयी सहानुभूती बाळगणारा आमच्या शिवाय दुसरा कोणी नव्हता.' भटांप्रमाणे मायदेवांनीही राजवाडयांची सेवा करण्याचा व त्यांच्याशी जुळवून घेण्याचा फार प्रयत्न केला कारण, त्यांचा प्रखर मानीपणा, अभ्यासनिष्ठा, अलौकिक भेदक दृष्टी व श्रीमंतीबद्दल तुच्छता या दुर्लभ गुणसंपदेबद्दल मायदेवांना निःसीम आदर वाटत होता. ते रोज हिंगण्याहून सकाळी डेक्कन जिमखान्यावर राजवाडयांकडे काम करण्यासाठी येत.

राजवाडयांना धातूच्या छोटया पत्रिकांवरून मोठया कागदावर अलग पत्रिका करावयाच्या होत्या. त्यासाठी माणूस पाहण्यास त्यांनी मायदेवांना सांगितले व बजावले की, हे काम व्याकरणासारख्या विष-याचे असल्याने शुद्ध तऱ्हेने काम करणाराकडूनच ते व्हावयास हवे. ते ऐकून मायदेवांनी स्वतःच त्यांना मदत करण्याचे ठरविले. एकदा राज-वाडे यांनी हिंगण्यास राहण्याचे ठरविले. त्यांनी एक झोपडी निवडली व मायदेवांना ती नीट करायला सांगितली. मायदेवांनी त्याप्रमाणे झोपडी स्वच्छ केली, सफेती केली पण तेवढयात राजवाडयांचा बेत फिरला, कारण कोणीतरी त्यांना सांगितले की, हिंगण्यास मलेरिया आहे. मायदेवाचे सारे श्रम वाया गेले. राजवाडयांना जेवणात खोडी फार. कधी ते स्वतः स्वयंपाक करीन तर कधी स्वयंपाकी म्हणून ठेवीत. पण स्वयंपाकाला शुभारंभ होण्यापूर्वी स्वयंपाकाची भांडी व

स्वयंपाकी याची बारीक डोळयांनी ते करून परीक्षा करीत. त्याच्या हाताला खरूज वगैरे असेल तर त्याला ते निरोप देत. जेवणाबद्दलच्या त्यांच्या या अशा चिकित्साखोर वृत्तीमुळे त्यांच्या संशोधनाचे गाडे वेळोवेळी अडे. कारण 'जेवणाच्या बाबतीत मी फार दक्ष असतो.कारण माझे मत असे आहे की, ज्याला स्वतःच्या जेवणाची पर्वा नाही, त्याला कशाचीच पर्वा असणे शक्य नाही' असे म्हणणाऱ्या जॉनसनच्याच पथांतले होते. राजवाडयांच्या मागचे हे स्वयंपाकांचे तापत्रय टळावे म्हणून मायदेव हिंगण्याहून येताना रोज चार घडीच्या पोळया आणि चटणीचा मोठा गोळा राजवाडे यांच्यासाठी आणत असत. पाच महिने मायदेवांनी राजवाडयांची अशी सेवा केली पण शेवटी ते थकले आणि हरले. राजवाडे यांच्या अहंकारी आणि घमेंडखोर स्वभावाला आणि अद्वातद्वा बोलण्याला ते पुरे पडेनात. त्यांनी कंटाळून राजवाडयांची संगती सोडून दिली. संगती थोराची खरी पण म्हणून तिचा जाच होत नाही असे थोडेच आहे? 'No man is well pleased to have his at neglected, be it ever so little.' असे जॉनसनने म्हटले आहे ते खरे आहे.

'अमितगुणोऽपि पदार्थः दोषेणैकेन निन्दितो भवति। निखिल रसायनराजा गन्धेनोग्रेण लशुन इवां' असे कवीने म्हटले आहे, त्याची प्रचीती राजवाडयांच्या स्वभावाचा विचार केला म्हणजे आल्याशिवाय राहत नाही. त्यांचे गुण मोठे होते पण त्यांच्या उर्मट स्वभावामुळे व ज्याच्या त्याच्या अंगावर वसकन ओरडण्याच्या खोडीमुळे, दुधात मीठ पडावे, त्याप्रमाणे त्यांच्या सगळया गुणांवर पाणी पडल्यासारखे झाले होते.

संभाषणाप्रमाणे भाषण किंवा वक्तृत्व हेही विकार - विचार प्रदर्शनाचे व स्वभावदर्शनाचे जबरदस्त साधन आहे. राजवाडयांच्या काळात दादासाहेब खापर्डे, शिवरामपंत परांजपे व अच्युतराव कोल्हटकर हे पट्टीचे वक्ते होऊन गेले. विनोदाने खापर्डे, उपरोधाने शिवरामपंत परांजपे व कल्पकतेने अच्युतराव कोल्हटकर सभेला वश करून

घेण्याच्या कलेत सारखेच प्रवीण होते. या जातीचे फड मारणारे किंवा सभा गाजविणारे वक्ते राजवाडे नव्हेत. पण उलटपक्षी, व्यासपीठावर चढल्याबरोबर, 'सीदन्ति मम गात्राणि मुखंच परिशुष्यति' म्हणून कुरुक्षेत्रावरच्या अर्जुनाप्रमाणे हातपाय गाळण्याइतके व अंगाला कापरे सुटण्याइतके ते मुखदुर्बळ व भित्रेही नव्हते, तसे ते निर्भय आणि बेडरच होते आणि जसे ते लिहीत तसेच ते बोलत आणि तर्कशुद्ध विचार व उत्कट भावना त्यांच्या लिहिण्याप्रमाणे बोलण्यातही पदोपदी व्यक्त होत असे. पण त्यांचे वक्तृत्व म्हणजे 'अंतरी कल्पना केली येकांती बोलिलो बहु' अशा जातीचे, मनात दीर्घकाळ मुरलेल्या विचारांचे जनसमुदायापुढे केलेले एक प्रकारचे 'प्रकट चिंतनच' होते. भाषणाचा सारा थाट एकजात गंभीर आणि रोखठोक असे. रामदासांचे राजवाडे भक्त असले तरी 'टवाळा आवडे विनोद' या समर्थवचनाप्रमाणे विनोदावर त्यांचा अगदी कटाक्षच असे असे नाही पण त्यांचा विनोद हलका–फुलका, खेळकर किंवा प्रसन्न नसे. पावसाळ्यात काळ्या ढगानी दाटलेल्या आभाळात एखादी विजेची शलाका चमकून जावी, त्याप्रमाणे त्यांच्या वैराग्याचा आणि गांभीर्याचा मूर्तिमंत अवतार असलेल्या भाषणात एखादी उपरोधाची स्मितरेषा लकाकून जाई. चार लोकांत बसले म्हणजे जसे ते बोलत, तसे चारशे लोकांपुढे उभे राहिले म्हणजेही बोलत, 'सत्यं ब्रूयात प्रियं ब्रूयात न ब्रूयात्सत्यमप्रियम्' हा मनूचा दंडक त्यांना परवडण्यासारखा नव्हता. त्यांच्या भाषणाचा उद्देश लोकांचे रंजन करणे हा नसून लोकांचे प्रबोधन करणे हा होता. आणि म्हणून त्यामुळे, एकान्ताप्रमाणे लोकान्तातही बोलताना 'जग काय म्हणेल' यांची त्यांनी कधीच पर्वा केली नाही. माटे यांनी त्यांच्या वक्तृत्वाचा एक मासला दिला आहे. दिवस स्वदेशी कापड व स्वदेशी साखर यांचे होते. शनिवारात कन्याशाळेजवळ राजवाडे व्याख्यान देत होते. ते म्हणाले, 'साखर कशाला हवी आहे? गेल्या वीस वर्षात मी पेढा खाल्ला नाही, म्हणून मी काही मेलो आहे काय?'

२३ जुलै १९०२ रोजी ठाणे मराठी ग्रंथ संग्रहालयाच्या नवव्या

समारंभाच्या वेळी अध्यक्ष म्हणून राजवाडे यांनी केलेले भाषण प्रसिद्ध आहे. त्या भाषणाच्या इतिवृत्तामधील एक गोष्ट राजवाड्यांच्या व्यक्तिमत्त्वावर प्रकाश टाकणारी म्हणून लक्षात ठेवण्यासारखी आहे. रा. रा. राजवाडे बोलावयास उठले. ते उभे राहिल्यावर प्रसिद्ध इतिहास संशोधक रा. रा. विश्वनाथ काशिनाथ राजवाडे बी. ए. हे हेच गृहस्थ असतील काय असा पुष्कळांस भ्रम पडला. कारण त्यांचा पोषाख अतिशय साधा होता.पण असे एखादे भाषण सोडले तर त्यांची बाकीची भाषणे आज उपलब्ध नाहीत. असे म्हटले तरी चालेल. पण आजमितीस त्यांचे जे एकच भाषण सुरुवातीपासून शेवटपर्यंत काना-मात्रेसकट इतकेच नव्हे तर त्यांच्या विशिष्ट शुद्धलेखन पद्धतीसह उपलब्ध आहे, ते मात्र 'एकश्चन्द्रस्तमो हन्ति न च तारांगणोऽपि वा' या उक्तिप्रमाणे त्यांच्या इतर फुटकळ भाषणांच्या अनुपलब्धीबद्दल वाटणाऱ्या खंतीचा परिहार करणारे आणि त्यांचे नाव अजरामर करणारे आहे. हे प्रसिद्ध भाषण म्हटले म्हणजे पुणे येथील शके १९४७ म्हणजे १९२५ च्या पहिल्या शारदोपासक संमेलनाच्या अध्यक्षपदावरून त्यांनी केलेले भाषण होय. हे व्याख्यान राजवाडे यांनी दिले, त्यावेळी त्यांचे वय बासष्ट वर्षांचे होते. त्यांचे विचार परिणतावस्थेला पोचले होते. त्यांचे हे भाषण म्हणजे त्यांच्या मानसिक उत्क्रांतीचा एक आलेखच आहे. ते जेव्हा तरुण होते आणि डेक्कन. कॉलेजात विद्यार्थी होते, तेव्हा इंग्रजीत विचार करण्याच्या आणि इंग्रजीत बोलण्या-चालण्याच्या दुष्ट खोडीने त्यांना अतोनात ग्रासले. सतत पंधरा वर्षे बारा आणि बारा चोवीस तास सर्व कामे मी इंग्रजीत करू लागलो ह्या एवढ्या अवधीत मी मराठी बहुतेक विसरून जायचा पण 'आंग्लशूद्र' होण्याच्या या घोर आपत्तीतून विष्णुशास्त्री चिपळूणकरांच्या कृपेने राजवाडे वाचले. त्यांच्यानंतर त्यांनी सारे जीवित स्वदेशाच्या आणि स्वभाषेच्या संशोधनात आणि साहित्यात खर्च केले त्या इतिहासाच्या परिशीलनातून मराठ्यांची तात्त्विक संस्कृति युरोपच्या भौतिक संस्कृतीहून कमी दर्जाची असल्यामुळे त्यांना स्वराज्याला मुकावे लागले, हे सत्य त्यांना प्रतीत झाले. अर्थातच भौतिक शास्त्राच्या उपा-

सनेशिवाय स्वराज्याची उपलब्धी कदापि शक्य नाही असा त्यांचा सिद्धांत झाला होता. काँग्रेस, राष्ट्रीयसभा, कौन्सिले हे स्वराज्य मिळविण्याचे मार्गच नव्हेत, असे त्यांचे मत झाले होते. पण खेदाची गोष्ट अशी की, पोटाच्या पाठीमागे लागलेली बहुसंख्य प्रजा करायला पाहिजे ते करीत नव्हती आणि नको ते करत होती. दिवसा इंग्रजांच्या राज्ययंत्राला तेल घालणारे व रात्री त्यांचा द्वेष करणारे,हे उभयान्वयी व इंग्रजांचे गुलाम असलेले लोक इतिहासमंडळेसुद्धा धड चालवू शकत नाहीत मग शास्त्रीयमंडळे काढण्याची गोष्ट तर दूरच. सकारण किंवा अकारण सभा भरवणे व अध्यक्षस्थान मंडित करणे एवढ्यापुरतेच या वाचिवीरांचे कर्तृत्व मर्यादित होते. अशा या गुलामांच्या देशाचे आणि भाषेचे भवितव्य काय हे सांगण्यास कोणा ज्योतिषाची जरूर नव्हती, आणि या दुर्दशेला परकीय राज्यकर्त्यांपेक्षा त्यांच्याशी लांगूलचालन करणारे, स्वदेशाशी भाकरीसाठी आत्मा विकणारे आपलेच लोक जबाबदार आहेत, हे पाहिले, म्हणजे त्यांचे अंतःकरण उद्वेगाने आणि असंतोषाने भरून जाई. दारूने ठासून भरलेल्या कोठाराला पेटलेल्या मशालीचे निमित्त व्हावे, त्याप्रमाणे शारदोपासक संमेलनाच्या अध्यक्षपदाचा प्रसंग राजवाड्यांना प्राप्त झाला आणि त्यांच्या अंतःकरणात इतकी वर्षे धगधगत असलेल्या त्या उदात्त असंतोषाचा भयचकित करणारा स्फोट झाला. ते चिरस्मरणीय भाषण म्हणजे राजवाड्यांच्या प्रतिभेचे केवळ निःश्वास नव्हेत, तर त्यांच्या अंतरंगातल्या ज्वालामुखीचे उच्छ्वास होत.

प्रारंभीच अध्यक्षपदाचा बहुमान दिल्याबद्दल चालकांचे आभार मानण्याचा शिष्टसंप्रदाय बाजूला ठेवून राजवाडे यांनी सांगितले की, ' संमेलनावरचा माझा विश्वास प्रायः सपशेल उडून जात चाललेला आहे. अध्यक्ष होण्याचीही अलीकडे मला फार भीती वाटू लागली आहे. कारण सभांना ऊत आलेला आहे, वाचाळतेलाही उकळी आली आहे व अध्यक्षही सभा भरते केव्हा यासाठी आतुर झालेले आहेत. त्यावरून रंग दिसतो की, अध्यक्षपणा करण्याचा पुण्यात लवकरच धंदा होऊन जाईल. पशूत जशी सिंहाची स्वयमेव मृगेन्द्रता, तशीच

सभात धंदेवाईकाची स्वयमेव अध्यक्षता असा मनूच झालेला दिसतो, तेव्हा अध्यक्षस्थान पतकरले व धंदेवाईक अध्यक्षाने ऐन वेळी येऊन हक्क सांगितला तर कलागत मात्र निर्माण व्हावयाची या शंकेने अध्यक्ष-स्थान नाकारण्याकडे राजवाड्यांचा कल होऊ लागला. पण सभेच्या चालकांनी धंदेवाईक अध्यक्षाची धंदेवाईक तालीमबाजाकडून जिरवण्याचे आश्वासन दिले व राजवाड्यांना धीर आला.

पण नंतर शारदोपासक संमेलनाच्या स्वतःच्या अध्यक्षपदाच्या पात्रतेबद्दल स्वतःच शंका प्रदर्शित करून त्या साऱ्याच भाषणाचा आत्मा असलेल्या जळजळीत आणि प्रच्छन्न उपहासाच्या सुरात, जन्म-भर सरस्वतीची उपासना केलेला हा थोर सरस्वती भक्त म्हणाला,

'परंतु पुनः एक शंका आली. आपले हे शारदामंडळ आहे आणि शारदेची उपासना मी गद्यात किंवा पद्यात कधीच केलेली मला स्मरत नाही. माझा सारा जन्म जुनाट रद्दी विसकटण्यात गेला. वृत्तबद्ध शब्द-रचनेला किंवा तालबद्ध संगीत कल्पनेला मी आजपर्यंत कधीच शिव-लेलो नाही तेव्हा शारदेच्या ठेकेबाज मंडळात घुसण्याचा आणि त्यात-ल्यात्यात अध्यक्ष म्हणून घुसण्याचा मला दूरचाही हक्क पोहोचत नाही.'

राजवाड्यांच्या ह्या शंकेचे समाधान चालकांनी कसे केले, हेही हसता हसता रडवणाऱ्या आणि चिमटे घेणाऱ्या गंभीर आणि अंतर्मुख करणाऱ्या आपल्या खास उपरोधिक शैलीत राजवाड्यांनी सांगितले आहे.

'ह्यावर माझी अशी समजूत काढली गेली की, तुम्ही गद्यकातही मोडत नसला व पद्यकातही मोडत नसला, तथापी माणसात खचित मोडता ह्यात तर संशय नाहीच नाही. हे बोलणे ऐकून मी आश्चर्याने थक्क होऊन गेलो. आपण माणूस नाही, गुलाम आहो, अशी माझी मनोदेवता मला स्पष्ट सांगत होती. इतकेच नव्हे तर पिढ्यान पिढ्या अशी माझी समजूत होती. पोट बांधून धनी सांगेल ते काम करावे' व अंगावर फेकील ते उष्टेमाष्टे चाटावे, इतर सजातीय गुलामांवर वारंते बजवावी, असे धंदे करण्यात गढलेला मी गुलाम नव्हे हे मला बिल-

कूल पटेना. पशूतदेखील गणना करून घेण्यास मी लाजत होतो. त्या माझी गणना ह्या शारदा मंडळवाल्यांनी माणसात करावी, ह्या गोष्टीचे मला आश्चर्य वाटले.'

मराठी भाषेचा उत्कर्षापकर्ष अजमाविणे हा 'शारदामंडळा'चा उद्देश आहे, हे समजल्यावर राजवाड्यांनी त्या स्तुत्य हेतूबद्दल मंडळाचे मनःपूर्वक अभिनंदन केले आणि मराठी भाषेच्या उत्कर्षापकर्षाच्या मीमांसेपासूनच आपल्या भाषणाला प्रारंभ केला. आणि त्या मीमांसेच्या प्रारंभीच त्यांनी उपस्थित केलेला प्रश्न, आज इतकी वर्षे होऊन गेली, तरी मराठी साहित्यात गाजत राहिलेला आहे.

'मीमांसेला प्रारंभ करताना, पहिले भय मनापुढे उभे राहते ते असे की, जिचा उत्कर्षापकर्ष आपण अजमावू पाहणार, जिच्यात ग्रंथ-संपत्ती ऊर्फ विचारसंपत्ती आपण निर्मिणार, किंवा निर्मिण्याची दिशा दाखविणार, ती ही आपली मराठी भाषा आपले उदात्त हेतू सहन करण्याला व सफलतेस आणण्याला सध्या लायक आहे की नाही? उदात्त हेतू जिच्या द्वारा तडीस न्यावयाचे ती ही आपली मराठी भाषा मरण्याच्या पंथास तर लागली नाही? आणि मरण्याच्या पंथास जर लागली असेल तर त्या मढ्याला सजवीत बसण्यात कोणता शहाणपणा आहे?'

गरुडाच्या उड्डाणाप्रमाणे राजवाड्यांच्या निरंकुश कल्पनाशक्तीचे उड्डाण होते. पण राजवाड्यांना वाटलेले मराठी भाषेच्या भवितव्याबद्दलचे भय हा मात्र त्यांचा कल्पनाविलास नव्हता. ती उद्वेगजनक वस्तुस्थितीच होती. कारण असे की देशातली सर्वात मोठी व अत्यंत महत्त्वाची संस्था म्हणजे राज्यसंस्था तिच्या सर्व खात्यांचे अगणित व्यवहार परकीय भाषेत म्हणजे इंग्रजीत चालतात, सरकार परकीय आहे म्हणून हे समजण्यासारखे आहे. समजण्यासारखे जे नाही ते हे की, सार्वजनिक सभेसारख्या लोकनिर्मित संस्थांचाही सारा व्यवहार इंग्रजीत चालतो. कारण त्यांना परकीय सरकारशी बोलणे, चालणे करावयाचे असते. खाजगी शाळा–कॉलेजे यांचाही व्यवहार इंग्रजीत

चालतो कारण यातील विद्यार्थ्यांना पुढे सरकारी नोकऱ्या धरावयाच्या असतात. भांडारकर इन्स्टिटयूटसारख्या खासगी संशोधक संस्थांना, युरोपियनांशी संबंध असल्यामुळे इंग्रजीशिवाय पर्याय नसतो. काँग्रेस-सार्वभारतीय संस्थांनाही सर्व प्रांतांना सुलभ म्हणून इंग्रजीचा आश्रय करावा लागतो. या सर्व बाबतीत 'अपरिहार्य' म्हणून इंग्रजीचा शिरकाव झालेला आहे. मराठी राहिली आहे ती फक्त आपल्या गृह्य, ग्राम्य, वर्तमानपत्रीय व ग्रांथिक व्यवहारात. त्यातही शिकलेले म्हणून ज्यांना म्हणतात ते प्रत्येक दहा शब्दात चार-पाच इंग्रजी शब्द, हौसेने नव्हे, तर इंग्रजी भाषा बालपणापासून रोमरंध्रात भिनून गेल्या-मुळे ढकलून देतात. शिक्षिताच्या संसर्गाने अशिक्षिताच्याही तोंडी इंग्रजी शब्द बसत चालले आहेत. 'एणेप्रमाणे मराठीची तोंडदाबणी इतकी बेसुमार होत चालली आहे, की तिची डांबणूक अशीच आणिक पाच-पंचवीस वर्षे होत गेल्यास, लवकरच सर्व महाराष्ट्र इंग्रजी भाषा शुद्ध किंवा अपभ्रष्ट अशी, हाँगकाँगमधील पीज्यन इंग्लिशप्रमाणे, बोलू लागेल असा निश्चित अंदाज दिसतो.' आपला हा मुद्दा विशद करताना व 'देशांतील तरुणांवर इंग्रजीचा किती फाजील पगडा बसला आहे' हे स्पष्ट करताना, राजवाडे यांनी त्यांना नुकतीच आलेली नूतन मराठी विद्यालयाच्या वार्षिक संमेलनाची एक आमंत्रण पत्रिकाच वाचून दाखविली. तिच्यात एकंदर ८७ शब्द होते. त्यांपैकी इंग्रजी ५२ होते! मराठीचे वाली जे मराठी ग्रंथकार त्यांच्या व्यव-हारात मराठी किती जिवंत राहिली आहे, याचा गेल्या शंभर वर्षां-नीच ग्रंथकारांचा छंद, ग्रंथलेखनाचा पत्रव्यवहार यांचा विचार करता असे दिसते की, पत्रव्यवहार व ग्रंथरचना दोन्ही मराठीत चालविणारे अत्यल्प आहेत. इंग्रजी शिकलेल्यांचा बहुतेक सर्व पत्रव्यवहार इंग्रजीत होतो, वाग्व्यवहार इंग्रजी-मराठी मिश्र होतो व ग्रंथलेखन व्यवहार बाहुल्याने इंग्रजीतून व दूरत्वाने क्वचित मराठीतून होतो. कॉलेजातील प्रोफेसर, शाळातील मास्तर, सरकारी व व्यापारी नोक-रीतील कारकून इंग्रजीचा उपयोग बाहुल्याने करतात. इंग्रजी शिक-लेल्या स्त्रिया इंग्रजी शिकलेल्या पुरुषाचे साहजिकपणे अनुकरण

करितात. तात्पर्य, इंग्रजी शिकलेल्याच्या सहज तोंडातून निघणारी व हाताने कागदांवर सहज उमटणारी भाषा सध्या इंग्रजी झाली आहे.' सामान्य अशी एक भाषा करण्याच्या या प्रवृत्तीला राष्ट्राची सर्वमान्य आणि राष्ट्रीय भाषा करण्याच्या इच्छेने पुष्टी मिळत आहे ती अर्थातच कोणतीही प्रांतिक भाषा होऊ शकत नाही. 'हिंदी सामान्य भाषा करावी असे इंग्रजीच्या द्वेषाने कोणी कोणी प्रतिपादितात, परंतु ती भाषा इतर प्रांतिक भाषांप्रमाणेच अडाणी व एकदेशी पडल्यामुळे तिचा स्वीकार काँग्रेस ही लोकसंस्थादेखील करीत नाही. व्यवहाराला इंग्रजीचाच आश्रय करितात. तेव्हा एक-राष्ट्रीयत्वाच्या दृष्टीनेही इंग्रजीला राष्ट्रीय भाषेचा मान अपरिहार्य-पणे देण्याचा व मराठीसारख्या प्रांतिक भाषांचा संकोच होण्याचा कल निश्चित दिसतो. इंग्रजीचे बंड अप्रतिबद्ध माजविण्याचे आणखी एक कारण असे की, इंग्रजांची शास्त्रे व कला हस्तगत करावयाची तर इंग्रजांची म्हणजे युरोपियन शास्त्रीय परिभाषा जी जगभर रूढ झाली आहे ती जशीच्या तशी घेण्यावाचून गत्यंतर नाही, ही प्रकाशित झालेली समजूत होय. या सर्व कारणांचा परिणाम असा झालेला आहे की मराठीचा संकोच इतका झाला आहे की ती जर मेली नसली तर जीवन्मृतावस्थेत आहे, असे म्हणणे भाग आहे.

अशा स्थितीत आपणापुढे दोनच पर्याय आहेत. १) मराठी भाषा मरत व संकोचत जात आहे, तशीच तिला मरत व संकोचत होत जाऊ द्यावी व तिच्याऐवजी इंग्रजी भाषा घरीदारी प्रचलित होत आहे ती तशीच जास्त जोराने प्रचलित करावी व २) तिची कड घेऊन व आपले सर्व बळ खर्चून तिचे साहित्य करावे. पहिला पर्याय आपण कळत न कळत स्वीकारलाच आहे. पण तो वाटतो तितका सोपा नाही कारण मराठीऐवजी इंग्रजी आपण जन्मभाषा केली म्हणून काही इंग्रजांनी हरण केलेले आपले स्वराज्य आपल्याला मिळेल असे बिलकूल नाही. 'स्वातंत्र्य, स्वराज्य, शास्त्रकला हस्तगत करण्याला आपण स्वतः स्वार्थत्यागपूर्व कडी मेहेनत केली पाहिजे. न पेक्षा इंग्रजांचे आज आहोत तसेच पुढेही कारकून व हमाल राहू, फक्त

आज इंग्रजी-मराठी मिश्र अशी भाषा आपण वापरतो, त्याऐवजी निव्वळ इंग्रजी वापरू. ' स्वत्वात जर स्वभाषेचा समावेश होत असेल तर इंग्रजी भाषा स्वीकारल्याने मराठी भाषेला म्हणजे स्वत्वाला मात्र आपण मुकू.' पंजाबी, बंगाली, हिंदी, तामीळ, तेलगू, वगैरे राष्ट्रांशी व्यवहार करण्याच्या दृष्टीने इंग्रजी जन्मभाषा करण्याच्या नादास आपण लागलो तर त्यातही यश मोठे दुरापास्त आहे. हिंदुस्थानची जन्मभाषा इंग्रजी होण्यास पाच-चारशे वर्षे पाहिजेत, एवढा काळ इंग्रजांची राजवट चीनपासून अफगाणिस्तानपर्यंत टिकेल असे इतिहासाची साक्ष काढता दिसत नाही. हिंदुस्थानात सातवाहनापासून मराठ्यापर्यंत प्रत्येक राजवटीच्या वाट्यास सरासरी अडीचशे वर्षे आलेली आहेत. या प्रमाणास इंग्रजही अपवाद ठरतील असे दिसत नाही. इंग्रजांनंतर फ्रान्स, जर्मनी, रशिया, युनायटेड स्टेटस्, युगोस्लाव्हिया, इत्यादी शास्त्रसंपन्न पाश्चात्य राष्ट्रांच्या ताब्यात हिंदुस्थान जाणार व जो धनी भेटेल त्याची भाषा शिकावी लागणार ही भवितव्यता अटळ आहे. हे हाल टाळावयाचे असतील व ' तेल गेले तूप गेले, हाती धुपाटणे आले ' अशी फजिती टाळायची असेल तर स्वभाषा जी मराठी तिचीच कास बळकट धरून बसण्यात शहाणपण नाही काय ?

पण हा स्वार्थसुद्धा आता साधणे शक्य राहिलेले नाही. कारण ' इंग्रजीला एकांतिक काट देण्याची तुमची ईर्ष्या नाही. इंग्रजीतून व्यवहार न करण्याची तुमची ताकद नाही. इंग्रजीपासून अलग राहण्याची तुमची सोय नाही. तेव्हा तुम्हाला एकच मार्ग शिल्लक राहतो. इंग्रजीच्या हल्ल्याने मराठीचा जेवढा चुराडा होईल तेवढा निमूटपणे व संतभावाने होऊन द्यावयाचा एवढेच तुम्हाला शक्य आहे.' या संतभावाची फलश्रुती इतकीच होईल की गोव्यातल्या किरिस्तांव चेडयांच्या मराठी भाषेची त्यांच्या पोर्तुगीज धन्याच्या भाषेखाली जी दुर्दशा उडून गेली आहे, ती दशा किंवा तीहून निकृष्ट दशा तुमच्यावर येणाऱ्या फ्रेंच, जर्मन, इटालियन, ग्रीक व जपानी धन्यांच्या भाषेच्या रेट्यापुढे तुमच्या भाषेची होऊन जाईल. ' इतकेच नव्हे;

शास्त्राशिवाय स्वराज्य नाही, स्वराज्याशिवाय स्वराष्ट्र नाही व स्वभाषेशिवाय स्वभाषेचे साहित्य नाही. ही भाषेच्या उत्पत्ति-स्थिति-लयाची मीमांसा ऐतिहासिक बुद्धीने निश्चित केलेल्या राजवाड्यांनी मराठी माणसांच्या आजच्या स्थितीवरून ज्यांच्या भाषेचे जातक वर्तविले की 'कदाचित् असेही होईल की, पृथ्वीवरील शास्त्रसंपन्न राष्ट्राची लोकसंख्या तुमच्या लोकसंख्येहून अनेक पटीने वाढत आहे. ती आणिक वाढून तुम्हाला गुलाम किंवा सनदी मजूर म्हणून देखील तुमच्या देशात तुमचा धनी ठेवू इच्छिणार नाही आणि तुम्ही पृथ्वीच्या पाठीवरून नष्ट होऊन जाल. आणि असे झाल्यास-असे होण्याची स्पष्ट चिन्हे दिसत आहेत-सर्वच ग्रंथ आटपला. तुमच्या मराठी भाषेचे, मग, साहित्य करण्याचे प्रयोजनच राहत नाही. मराठी भाषेचे साहित्य करण्याला आपण जमलो आहोत. परंतु ती भाषा अद्याप सपशेल मेली नसली तरी लवकरच जर मरून जाणार हे निश्चित आहे, तर तिचे साहित्य करण्याच्या खुळचा नादास लागणे आपल्यासारख्या विचारवंतांना युक्त दिसत नाही.'

'अगा जे झालेचि नाही। त्याची वार्ता पुससी काई' या न्यायाने ज्या मराठी लोकांचा नष्टांश अटळ आहे, त्यांच्या मराठी भाषेचे साहित्य करणे हा अशा प्रकारे 'खुळा नाद' असला, तरी स्वभावतःच निरंकुश असलेले आणि गडकऱ्यांच्या भाषेत आपण वेडे असल्याचेच वेड लागलेले कवि ऊर्फ साहित्यिक या खुळचा नादाचा आग्रह धरणारच असतील तर तो सफलतेस कसा नेता येईल, याचा विचार करण्यास राजवाडे तयार आहेत. पण तो केवळ 'गमतीखातर' व 'घटकाभर करमणूक' होण्यासाठीच होय. राजवाड्यांच्या या उपहासात हास्य असेल. पण ते संतोषाचे नसून 'अति झाले आणि हसू आले' अशा उद्वेगाचे आहे. त्या उपहासाच्या मुळाशी विषाद आहे, विषादापेक्षा अधिक विद्वेष आहे आणि विद्वेषापेक्षा पोटतिडीक आहे. द्वेष हे प्रीतीचेच दुसरे रूप आहे या सत्याचे उदाहरण राजवाड्यांच्या या भाषणासारखे दुसरे सापडणे कठिण आहे. 'बुडती हे जन पाहवती न डोळा' या त्यांच्या उत्कट लोकप्रीतीतूनच लोकांच्या स्वार्थी, पोट-

भरू व देशबुडव्या वृत्तीबद्दल तुच्छता निर्माण झाली आहे.

असो. आता मराठी भाषेचे साहित्य करायचे म्हणजे ती जगवता कशी येईल याचाच विचार करणे होय. मराठी भाषेला मारणारी कारणे दूर केली म्हणजे 'कारणभावात्कार्यभावः।' या न्यायाने मराठी भाषेला ग्रासू पाहणारा काळसर्पयोगही टळू शकेल हे उघड आहे. ही चार कारणे म्हणजे १) परकीय राज्यसत्तेचा सर्व व्यवहार इंग्रजीत चालतो. २) स्वकीय राजकीयादि संस्थांचा सर्व व्यवहार इंग्रजीत चालतो. ३) ग्रंथकार व धंदे, पत्रव्यवहार व ग्रंथलेखन इंग्रजीत करतात. ४) सर्व हिंदुस्थानचे एक राष्ट्र बनविण्याचा खुळचा समजुतीप्रीत्यर्थ इंग्रजीचा स्वीकार. एकराष्ट्रत्वाची कल्पना खुळी आहे असे राजवाड्यांना वाटते. 'अटकपासून कलकत्त्यापर्यंतच्याही एक टापूचे कधी काळी एक भाषा बोलणारे एक राष्ट्र होईल असा संशयसुद्धा मनात आणण्याचे कारण दिसत नाही.' असे ते म्हणतात. केवळ महाराष्ट्राचे राष्ट्र बनविण्याची 'स्वतः परंतु सुलभ' महत्त्वाकांक्षा बाळगली म्हणजे 'तुमचे एकच एक लक्ष स्वभाषा जी मराठी' तिच्याकडे जाईल. तुमच्या काँग्रेस व कॉन्फरन्सेस नामशेष होतील परंतु तुमची राजकीय उन्नती कुंठित झाली आहे. अशी विचित्र भीती तुमच्या मनात निर्माण होईल. 'परंतु काँग्रेसादि सभांपासून तुमचे काही राजकीय हित झाले आहे किंवा होणार आहे ही आशाच मुळात अवास्तव आहे.' एकराष्ट्रत्वाची कल्पना व काँग्रेस ही संस्था सोडल्या म्हणजे मराठी भाषेची दोन मारक कारणे दूर झाली. तिसरा महारोग म्हणजे पोटाचे धंदे इंग्रजीतून करण्याचा घाणेरडा हव्यास. या महारोगाच्या कचाटीतून सोडण्यास सध्याच्या शाळा, कॉलेजे, कोर्टे इत्यादि संस्थांशी संबंध सोडण्याशिवाय पर्याय नाही. आणि ग्रंथ इंग्रजीतून साधण्याच्या कृत्रिम हव्यासाच्या बाबतीत बोलावयाचे म्हणजे, वाचक मिळावेत व जाणत्यांकडून वाहवा व्हावी ह्या आशेने तुमच्यापैकी कित्येक लोक इंग्रजीतून लिहितात. परंतु ही खुळी आशा सोडून देऊन मराठीतच लिहिण्याची प्रतिज्ञा तुम्ही केल्याशिवाय मराठीचा मृत्यू टळावयाचा नाही'

'हे तो प्रचीतीचे बोलणे । आधी केले मग सांगितले ।' या न्यायाने राजवाड्यांनी ही आचारसंहिता पाळली होती. आणि तिची पुरेपूर किंमतही दिली होती. ही किंमत देणे हे 'फुकाचे मुखी बोलता काय वेचे । दिसंदीस अभ्यंतरी गर्व साचे ।।' अशा प्रकारच्या या बोलघेवड्या वाचाळांच्या देवालाही शक्य नाही हे ते जाणून होते. म्हणून ते हा असहकार योगही यांना शक्य नाही असे सांगताना म्हणाले,

'परंतु तुमच्या वर्तनावरून तर स्पष्ट दिसते की, सध्याची शाळा, कोर्टे वगैरे तुमच्यापैकी काही थोड्या लोकांना सोडावयाची आहेत व बऱ्याच लोकांना सोडावयाची असली तरी ती सोडण्याचा मार्ग तुमचे पोट तुम्हाला सुचू देत नाही. तुमचे पोट तर चालले पाहिजे आणि भाषा तर जगली पाहिजे अशा पेचात तुम्ही आहा. ह्याला एकच एक उपाय म्हणजे तुम्हाला स्वराज्य मिळविले पाहिजे व शाळा, कॉलेजें व कोर्टे ह्यांचा व्यवहार तुमच्या स्वभाषेतून चालू केला पाहिजे. स्वराज्य मिळविण्याला दोन मार्ग आहेत; एक सशस्त्र प्रतिकाराचा म्हणजे शस्त्रांनी लढण्याचा आणि दुसरा अशस्त्र प्रतिकाराचा म्हणजे असहकाराचा. दोन्ही मार्ग तुम्हाला मानवत नाहीत असे तुमच्या गेल्या शंभर वर्षांतले वर्तन सांगते. सशस्त्र प्रतिकार करण्याकरिता युरोपियन शास्त्रसिद्धि तुम्ही बिलकूल केलेली नाही. अशस्त्र प्रतिकार पोटाचे भय तुम्हाला करू देत नाही. येणेप्रमाणे सशस्त्र प्रतिकार किंवा अशस्त्र प्रतिकार ह्यांपैकी कोणताही प्रतिकार करण्यास तुम्ही नालायक आहात. तेव्हा उघडच झाले, की, चालली आहे हीच स्थिती तुम्हाला पसंत आहे व मरत आहे त्याप्रमाणेच तुम्ही आपली स्वभाषा मरत जाऊ देणार आणि निरर्गळ निर्लज्जता पदरी येऊ नये म्हणून तिचे साहित्य करण्याचे पोकळ अवडंबर माजविणार.'

राजवाडे बोलत होते आणि मंत्रभूल टाकल्याप्रमाणे श्रोते ऐकत होते. राजवाड्यांचे ते भाषण ऐकणे हा जीवितातला एक अविस्मरणीय अनुभव होता. त्या भाषणातील एकराष्ट्रीयत्वाची कल्पना टाकून देण्यासारखे, शाळा-कॉलेजांवर सर्वस्वी बहिष्कार टाकण्या-

सारखे काही विचार कुणाला एकान्तिक वाटले तरी सारे विचार चूक आहेत असे म्हणणे शक्यच नव्हते, आणि वक्त्यांचे वय, त्याची विद्वत्ता त्याने स्वभाषेसाठी केलेला उग्र स्वार्थत्याग आणि त्याच्या शब्दाशब्दात प्रतीत होत असलेली कळकळ आणि तळमळ यांचा विचार मनात आला म्हणजे विरोध करण्याची कल्पनासुद्धा करवत नव्हती. त्या भाषणाच्या आरंभापासूनच विजेचे धक्के बसावेत त्याप्रमाणे एकामागून एक अनपेक्षिताचे धक्के बसत होते. मराठी साहित्याच्या संमेलनाच्या त्या शुभ प्रसगीचे पौरोहित्य करताना तिच्या मृत्यूचे अशुभभविष्य तिच्या सुपुत्राकडूनच वर्तविले जाण्याचा कादंबरीकाराच्याही कल्पनेला अशक्य असा तो प्रसंग प्रत्यक्षात घडत होता. इतिहासाला वाहिलेल्या त्या 'भारत इतिहास संशोधक मंडळा'च्या दिवाणखान्यात, अनेक साम्राज्यांचे व भाषांचे उदयास्त पाहिलेला कालपुरुष, राजवाड्यां-सारख्या इतिहासपुरुषाच्या मुखाने, मराठी भाषेची मृत्युघंटा वाज-वीत होता आणि सारे श्रोते दिङ्मूढ होऊन तो 'अखेरचा घंटानाद' ऐकत होते. मराठी भाषा इतिहासजमा होत असल्याचा कठोर निर्णय इतिहासाच्या न्यायपीठावरून देताना, प्रत्येक बाबतीत नन्नाचा पाढा वाचणाऱ्या नकारपटू दिवाळखोरांच्या राष्ट्राप्रमाणे त्यांच्या भाषेलाही भवितव्य नसते, या मुद्द्याचा ऊहापोह करताना राजवाडे म्हणाले–

'तुमच्याजवळ द्रव्य नाही, तुमच्याजवळ नियम नाही, तुमच्या-जवळ शस्त्र नाही, तुमच्याजवळ शास्त्र नाही, शास्त्र मिळविण्याला लागणारी तपश्चर्या करण्याची तुमची ताकद नाही, लढण्याचे सामर्थ्य व साहस नाही, रुसण्याचे कौशल्य नाही, तेव्हा तुम्ही, तुमचे राष्ट्र, तुमचे लोक, तुमचा समाज, तुमचा धर्म, तुमचे देव व तुमची भाषा ह्यांनी मृत्युपंथ धरला ह्यात विचित्र असे काय झाले ? मृत्युपंथास लागलेले जे तुम्ही ते मृत्युपंथास लागून मढे बनत चाललेल्या तुमच्या भाषेचे साहित्य करण्याच्या गोष्टी बोलता हेच विचित्र आहे. मरता मरता चिपळोणकर वगैरेसारखा एखाद दुसरा काजवा तुमच्यांत अधून मधून लकलकताना आढळतो. परंतु एखाद्या पंखतुटचा कोकिळाच्या आगमनाने किंवा काजव्याच्या लकलकण्याने वसंतऋतु

झाला असे जसे म्हणवत नाही, त्याप्रमाणेच एखाद दुसरा थोडासा जातिवंत ग्रंथकार तुमच्यात निघालासे वाटले म्हणून तुम्ही जिवंत आहात असे म्हणण्याचे धाष्टर्य करवत नाही. पृथ्वीवरील शास्त्रसंपन्न राष्ट्रांचे त्यांच्या सोयीचे असल्यास, येत्या हजार दोन हजार वर्षे तुम्ही गुलाम राहणार हे तुम्ही आपल्या वर्तनाने जगाच्या निदर्शनास स्पष्ट आणून दिलेले आहे. गुलामांना स्वतंत्र विचार करणारी स्वतंत्र भाषा असलेली इतिहासात कोठे नमूद नाही. करता दुःखाने तुमच्या वतीने असा निर्णय द्यावा लागतो की, तुमच्या सध्याच्या ह्या स्थितीत साहित्य संमेलने भविण्याची दगदग तुम्ही न केली तरी मुमूर्षु मराठीचे थोडेसे नुकसान होण्याचा संभव नाही.'

परंतु असे असले तरी, 'हतो वा प्राप्स्यसि स्वर्गं जित्वा वा भोग्यसे महीम् ।' या न्यायाने मरण समोर उभे ठाकले असले तरी लढणे हे जसे वीरांचे, त्याप्रमाणे मातृभाषेचा मृत्यु दिसत असला तरी तिला जगविण्याचा प्रयत्न करणे हे वाग्वीराचे कर्तव्य आहे, असे ह्या संस्मरणीय भाषणाचा समारोप करताना राजवाडे म्हणाले,

'गेल्या वीस-पंचवीस हजार वर्षांत शेकडो समाजांवर तुमच्यावर सध्या जी भयंकर आपत्ति ओढवली आहे तशी आपत्ति ओढवून त्यांचे नाममात्रही राहिले नाही. नशीब तुमचे की, [तुम्ही अद्याप नामशेष झाला नाही– तुमच्या देशातून अद्याप तुमची उचलबांगडी व्हावयाची आहे, अद्याप तुमची भाषा धुगधुगी धरून आहे, तिला पुनः सजीव करण्याची इच्छा अद्याप जर तुमच्यापैकी कोणात निरतिशय वसत असेल व त्याकरिता जर तुम्हापैकी कोणी संमीलित झाला असाल, तर तत्संबंधक उपाय शोधून काढण्याच्या कामास तुम्ही आता निरलसपणे लागावे अशी अध्यक्ष ह्या नात्याने विनंती आहे. भाषेत नवीन वृत्ते आणावी की नाही, भाषेतून जुने यावनी शब्द निवडून फेकून द्यावे की न द्यावे, नवीन इंग्रजी शब्द घालावे की न घालावे वगैरे वस्तुतः क्षुल्लक परंतु आपाततः महत्त्वास चढलेले प्रश्न, तुमच्या विचाराचे विषय, वेळ भरून काढण्याकरिता, थोडे फार झाले असता घटकाभर मौज होईल. परंतु जिची शुद्धी, संस्करण व अलंकरण तुम्ही

करू चाहता त्या तुमच्या मराठी भाषेचा समीपासन्न मृत्यू कसा टळेल हे पहाणे तुमच्या संमीलित विचाराचा एकमेव अद्वितीय विषय होणे सध्या समुचित दिसते. कदाचित विचाराल की, शक १७४० पासून शक १८३७ पर्यंतच्या अवधीत ग्रंथ, निबंध, वर्तमानपत्रे, मासिक, पुस्तक व कविता मराठीत मंदच का होईना परंतु उत्तरोत्तर वर्धमान श्रेणीने वाढत आहेत, तेव्हा मराठीचा संकोच होत आहे व मराठी भाषा मरत आहे म्हणून कसे म्हणता ? ह्या प्रश्नाला उत्तर असे आहे की, शक १७४० च्या पूर्वी स्वराज्यात व साम्राजात राजकीय, व्यापारिक व खासगी व्यवहारात मराठीचा उपयोग इतक्या अवाढव्य प्रमाणावर होत होता की, त्या प्रमाणाशी प्रस्तुतच्या शंभर वर्षातील मराठी लिखाण तोलून पहाता ते त्यांच्या पासंगालाही उतरेल का नाही ह्याची वानवा आहे.'

राजवाड्यांच्या भाषणाच्या प्रारंभाप्रमाणे शेवटही नाट्यपूर्ण आणि धक्का देणारा होता, ते वादळी भाषण संपले आणि विजेच्या कडकडाटात गुप्त पावणाऱ्या मुक्ताबाईप्रमाणे, श्रोत्यांनी खचलेल्या त्या सभागृहातून राजवाडे केव्हा निघून गेले हे कोणाच्या लक्षातही आले नाही. प्रसिद्ध कादंबरीकार वि. स. खांडेकर त्यावेळी उपस्थित होते. ते म्हणतात, ' राजवाड्यांचे बोलणे परखड तसे वागणेही जगावेगळे. आपलं अध्यक्षीय भाषण संपल्यानंतर नाटकातल्या एखाद्या पात्रानं आपलं निर्वाणीचं भाषण संपताच रंगभूमीवरून निर्गमन करावं, तसे राजवाडे भारत इतिहास संशोधक मंडळाच्या दिवाणखान्यातून निघून गेले. ' बराय येतो ' म्हणून संमेलनाच्या कार्यवाहांना तरी सांगितलं की नाही कुणास ठाऊक ? मी ते दृश्य पाहून चकित झालो. राजवाडे रागावलेले असावेत, त्यांना राग येण्यासारखं काहीतरी घडलं असावं अशी एक निराधार शंका माझ्या मनात येऊन गेली. पण पुणेकर मंडळींना कुंतीला वर देण्याचे सामर्थ्य असलेल्या परंतु अंबरीषाचा छळ करणाऱ्या दुर्वासाशी असलेलं राजवाड्यांचं नातं पुरेपूर ठाऊक असावं. सभेत झालेली थोडीशी गडबड शांत व्हावी म्हणून कवी यशवंतांनी त्यावेळी अत्यंत लोकप्रिय असलेलं ' न्याहरिचा

बहुत होईल मैतरिणी बिगिबिगि चाल' हे भावगीत म्हणण्याची विनंती करण्यात आली आणि नुकत्याच पाहिलेल्या वीररसाची समाप्ती त्या गीतातल्या मुग्ध शृंगारात झाली !

१९२६ च्या मार्चमध्ये एके दिवशी सकाळी वा. गो. मायदेव यांना राजवाडे यांचे अचानक बोलावणे आले. त्याप्रमाणे हिंगण्याहून मायदेव गेले, व राजवाडे यांना भेटले. राजवाडे डेक्कन जिमखान्यावर टिळक तलावाजवळच्या एका इमारतीत उतरले होते. मायदेवांना पाहिल्याबरोबर राजवाडे म्हणाले, ' मायदेव, या सर्व पुण्यात आमची काळजी घेईल असे एकही माणूस दिसत नसल्याने आम्ही आता धुळयास जात आहो, ' गेले आठ-दहा महिने राजवाडे हे काय प्रकरण आहे याची ओळख त्यांच्याजवळ राहून मायदेवांना बरीच झाली होती त्यांनी त्याची सर्वतोपरी सेवा करून त्यांना संतुष्ट करण्याचा प्रयत्न केला होता, आणि अखेर त्यांच्या दुर्वासाप्रमाणे दुराराध्य असलेल्या स्वभावाला कंटाळून त्यांची संगत सोडली होती. त्यामुळे राजवाडयांचे ते वैराग्याचे बोलणे ऐकून त्यांना आश्चर्य वाटले नाही व खेदही वाटला नाही. कारण, ' नानाभाऊचे पुणे तेथे काय उणे ' अशी ख्याति असलेल्या पुण्यात राजवाडयांसारख्या उत्तम पुरुषाला माणुसकी असलेला माणूस मिळू नये, हे राजवाडयांच्याच परखड भाषेत बोलायचे तर त्यांच्याच कर्माला आलेले फळ होते. म्हणून मायदेव त्यांना म्हणाले ' तुमचे तोंड स्वाधीन नसल्याने तुमचे असे हाल होत आहेत. ' आणि राजवाडयांच्या तोंडावरच, मायदेवांच्या डोळयांदेखत घडलेला राजवाडयांच्या बोलण्याचा एक प्रसंग त्यांनी सांगितला, ' तुमच्याजवळ काम करीत असलेल्या कारकुनाला तुम्ही म्हणालात, ' तू मेलास तर जगाचे नुकसान होणार नाही. आम्हाला जगले पाहिजे. तेव्हा या पाच रुपडया घे व त्यांचे आमच्यासाठी लोणी आण. ' एवढेच बोलून मायदेव थांबले नाहीत ते पुढे म्हणाले, ' तुमचे नशीब की मी त्या कारकुनाचे जागी नव्हतो. नाहीतर लोण्याऐवजी मी तुम्हाला रागाने पाच रुपयांचे विष आणून घातले असते. ' मायदेवांची स्पष्टोक्ति ऐकून राज-

वाड चूप बसले. काही बोलले नाहीत. मायदेवांनी त्यांच्या चुकीचे माप बरोबर त्याच्या पदरात बांधले होते व ते राजवाड्यांना मनोमन पटले होते. 'स्वभावो दुरतिक्रम !' या न्यायाने सारे जग शहाणे करू पाहणाऱ्या राजवाड्यांना आपली जीभ आपल्या ताब्यात नाही हे कळत असले तरी वळत नव्हते. सुरुवातीची ही बोलाचाली होऊन गेल्यानंतर मायदेव शांत झाले आणि राजवाड्यांनी सांगितल्याप्रमाणे मराठी धातुकोशासाठी केलेल्या कागदाच्या चतकोराच्या आठ ट्रंका त्यांनी त्यांना गोणपाटाने शिवून दिल्या व त्यांचा निरोप घेतला. गेली पंधरा–वीस वर्षे रक्ताचे पाणी आणि हाडाची काडे करून रचलेल्या धातुकोशाच्या कागदाच्या त्या ट्रंका म्हणजे राजवाड्यांची सारी धन-दौलत होती.

मायदेवांना म्हटल्याप्रमाणे मार्च महिन्यातच राजवाडे पुण्याहून धुळ्यास आले. त्यांच्याबरोबर धातुकोशाच्या ट्रंका आणि स्वयंपा-काच्या भांड्याची टोपली होती. पुण्याहून धुळ्यापर्यंत त्यांना पोच-विण्यास त्याच्या बरोबर गोखले नावाचे गृहस्थ आले होते. धुळ्यास आल्यावर भट यांची भेट अर्थातच झाली. डॉ. केतकरांचे शेजारच्या भाड्याने घेतलेल्या बंगल्याचे सर्व भाडे चुकते करून मी सर्व सामान घेऊन आलो आहे असे राजवाडे त्यांना म्हणाले. या खेपेला नेहमीपेक्षा राजवाडे भटांना काही वेगळेच दिसले. नेहमी ओसंडून वाहणारा त्यांचा उत्साह ओसरला होता आणि त्यांचा चेहराही उतरला होता, त्यांच्या मनावर निराशेचे दाट सावट पसरले होते. ते पाहून भट त्यांना म्हणाले, 'आता काही दिवस तुम्ही स्वस्थ बसा. निराळे बिऱ्हाड व स्वयंपाक करणाच्या भानगडीत न पडता माझे घरीच राहा. तुम्ही माझेकडे भोजन केले म्हणजे माझ्यावर मोठा बोजा पडतो असे मानू नका.' तेव्हा राजवाडे भटांच्या घरी राहू लागले. रोज संध्या-काळी भट कोर्टातून घरी परत आले, म्हणजे राजवाड्यांच्या बरोबर पूर्वप्रघाताप्रमाणे फिरावयास जात असत.

एके दिवशी संध्याकाळी ते दोघे पांझरा नदीच्या तीरावर फिरा-वयास गेले होते. त्या वेळी बोलता बोलता राजवाडे भटांना म्हणाले,

'मला एका दुर्धर रोगाने पछाडले आहे. माझी काळजी कोण घेणार? तुमचे ठीक आहे. तुमची बायको, मुले काळजी घेतील. परंतु माझी काळजी घेणारे कोणी नाही.' आपल्या एकाकी निरानंद आणि उदास ब्रह्मचाऱ्याच्या जीवनाबद्दलची इतकी खोल ठसठसणारी व्यथा आजपर्यंत राजवाडे यांनी अशा शब्दात कुणापुढेच उघडी केली नव्हती. वर्षानुवर्षे वाऱ्या-वादळाशी झुंजत ताठ उभा राहिलेला जयस्तंभ थरथरू लागवा त्याप्रमाणे उभ्या आयुष्यात ज्याने कुणाला कसली याचना केली नाही आणि दैन्य हा शब्द ज्याच्या कोशात नव्हता, त्या या एका काळच्या बलाढ्य आणि दांडग्या पुरुषांच्या तोंडचे ते दीनवाणे शब्द ऐकून भटांनाही फार वाईट वाटले, 'काय समर्थाची कांता। कोरान्न मागे' अशातलाच तो प्रकार होता. त्यांनी राजवाड्यांना विचारले, 'तुम्हास काय होते ?' राजवाडे म्हणाले, 'सर्व दिवसभर डोळ्यांपुढे चक्कर येते. सायंकाळ झाली म्हणजे थोडे बरे वाटते.' यापूर्वी एक-दोन वर्षे राजवाडे यांनी आपली प्रकृती धुळ्यांच्या एक-दोन स्नेही डॉक्टरास दाखविली होती. पण त्यांची दगडासारखी ठणठणीत प्रकृती आणि पराचा कावळा करण्याचा त्यांचा संशयखोर स्वभाव जगजाहीर असल्यामुळे, डॉक्टरांनी त्यांच्या तक्रारीची फारशी गंभीरपणे दखल न घेता म्हटले की, 'तुम्हास काही एक रोग झालेला नाही. काही दिवस विश्रांती घेतली म्हणजे तुम्हाला बरे वाटेल.' पण डॉक्टरांचे ते आश्वासन फसवे ठरले. विश्रांती घेऊनही राजवाड्यांना बरे वाटेना. चक्कर पुन्हा जोर करू लागली, ते भटांना म्हणाले, 'माझ्या रक्तवाहिन्या ठिसूळ झाल्या आहेत, व यावर औषध घेण्याकरिता मला जर्मनीत जावे लागेल. राजवाड्यांनी ज्याचे वर्णन केले, तो रोग 'रक्तदाब' या नावाने आज मुलाबाळांनासुद्धा माहीत झाला आहे. पण राजवाड्यांच्या काळी तो रोग रोग्यांना तर नव्हेच, पण डॉक्टरांनासुद्धा माहिती नव्हता. अशा स्थितीत राजवाड्यांच्या रोगाचे निदान डॉक्टरांना होऊ नये, हे साहजिकच म्हटले पाहिजे.

परंतु रोग्याला काय किंवा डॉक्टरला काय, रोग दिसत नसला तरी, रोगाला रोगी दिसत होता त्याला काय करणार ? राजवा-

ड्यांच्या बुलंद शरीराच्या इमारतीच्या तुळया आणि वासे भुंगा-प्रमाणे पोखरण्याचे त्यांचे काम चोरट्या मार्गाने चालू होते. भटांच्या घरी राहत असताना एक दिवशी सकाळी ते उठले. नित्यकर्मे आटपली एक पेलाभर दूध प्यायले आणि एकाएकी साडेआठचे सुमारास ओरडले की, ' माझ्या डोक्यात कळ आली. मला सनस्ट्रोक झाला आहे. आताचे आता नाशिकास मला डॉ. खाडिलकरांकडे पोहोचते करा. ' त्यावेळी धुळ्याहून चाळीसगावी जाणारी गाडी नुकतीच निघून गेली होती. तेव्हा ' नाशकास जाण्याकरिता स्पेशल मोटार करा' असे राजवाडे भटांना म्हणाले, त्यांना काही दम निघेना. 'पैसे टाळक्यावर का बांधावयाचे आहेत ? तरी भाडे किती पडते ते देऊन मोटार ठरवा, असे ते म्हणू लागले. तेव्हा भटांनी मोटार ठरविण्याकरिता कारकुनास पाठविले. तो अर्ध्या तासाने परत आला व मोटारवाला पाऊणशे रुपये भाडे मागतो असे त्याने सांगितले. तोपर्यंत राजवाड्यांच्या डोक्यात आलेली कळ बंद पडून त्यांना बरे वाटू लागले होते. म्हणून भट त्यांना म्हणाले, ' आता तुम्हास बरे वाटते आहे. जेवण-खाण करून सायंकाळचे गाडीने नाशकास जा. ' तेव्हा ' येथे क्षणभर राहणार नाही. मोटार मागवा, ' असे राजवाडे म्हणाले. तेव्हा मोटार मागविली. यावेळी जवळ जवळ अकरा वाजले होते. जेवण तयार होते. ' तेव्हा जेवण करा व गाडीत बसा ' असा भटांनी त्यांना फार आग्रह केला. पण राजवाड्यांनी आपला हेका काही सोडला नाही. पाण्याचा एक घोट किंवा अन्नाचा एक घास न घेता ते नाशकास निघाले. तेव्हा भटांनी कारकुनास त्यांच्या सोबत जाण्यास सांगितले. संध्याकाळी मोटार कारकुनास घेऊन परत आली. त्याने राजवाडे सुखरूप पोहोचल्याचे सांगितले. राजवाडे पुढे दोन-तीन महिने नाशकास श्रीधर गोविंद काळे यांचेकडेच त्यांनी आग्रह केल्यावरून राहिले होते असे भटांना समजले. खुद्द राजवाड्यांविषयी बोलायचे म्हणजे एवढ्या तातडीने नाशकास गेल्यानंतर आपल्या प्रकृतीबद्दल बोटभर चिठ्ठी काही त्यांनी भटांना पाठविली नाही. भटांना त्यात काही विशेष वाटले नाही, कारण स्वारीचा तो शिरस्ता नेहमीचाच होता.

१९२६ च्या जून-जुलै अखेर नाशिकहून राजवाडे धुळ्याला परत आले. नाशिकला जाताना तेवढ्या गडबडीतही धातुकोशाच्या ट्रंका ते आपल्याबरोबर घेऊन गेले होते. येताना त्या ट्रंका ते घेऊन आले. पण धुळ्यालाही त्यांचा राहण्याचा विचार दिसेना. धातुकोशाच्या कामासाठी त्यांचा विचार औरंगाबादला जाण्याचा होता. ते भटांना म्हणाले, 'धातुकोशाच्या लिखाणास प्रारंभ करावयाचा आहे. परंतु या कामाकरिता मला एका चांगल्या संस्कृतज्ञ गृहस्थाची मदत पाहिजे. असा ओक या आडनावाचा गृहस्थ औरंगाबादेच्या इंग्रजी शाळेत संस्कृतचा अध्यापक आहे. त्याची मदत घ्यावी. पण हा गृहस्थ तेथे नोकर असल्यामुळे तो नोकरी सोडून धुळ्यास येणार नाही सबब औरंगाबादेसच त्यांच्या घराशेजारी जागा भाड्याने घेऊन तेथे मुक्काम करावा व त्यांची मदत घ्यावी असे मला वाटते.' तेव्हा भट त्यांना म्हणाले, 'औरंगाबाद निजामाचे हद्दीत आहे. तुमच्या या सर्व ट्रंकांचे लटांबर तुम्ही बरोबर नेणार. यामुळे तुम्हाला करोडगिरीच्या नाक्यावरील तपासणीचा आकारण त्रास होईल, या गोष्टीचा विचार करा. शिवाय तेथे गेल्यावर तुमच्या मनास पसंत पडेल अशी सोय होणे कितपत संभवनीय आहे याचाही विचार करा. फुकट औरंगाबादेचा हेलपाटा पडून तुम्हास परत धुळ्यास यावे लागेल. तुम्ही धुळ्यास काम करीत असाल तर एक चांगला संस्कृतज्ञ गृहस्थ तुमच्या कामात चांगल्या प्रकारे मदत करणारा तुम्हास मिळवून देतो.' राजवाड्यांना हे म्हणणे पटले व धुळ्यास वास्तव्य करण्याचे त्यांनी ठरविले. भटांचे घर त्यांनी सोडले व धुळे-मालेगाव रस्त्यावरील भटांच्या बंगल्यात राहण्यास गेले. पाच-सहा दिवसांनी धुळ्याच्या हायस्कूलमधील विष्णु हरि नित्सुरे यांचा परिचय भटांनी राजवाड्यांना करून दिला. ते संस्कृतात पारंगत होते व व्याकरण, तत्त्वज्ञान, स्मृत्यादि ग्रंथांशी त्यांचा चांगला परिचय होता. नित्सुरे राजवाड्यांकडे जाऊ लागले व धातुकोशाच्या रचनेविषयी व एकंदर कामाच्या स्वरूपाविषयी राजवाडे त्यांना माहिती करून देऊ लागले.

धातुकोशाचे काम अशा प्रकारे चालीस लागले पण त्यापूर्वी राज-

वाडयांचा आणखी एक निराळाच उद्योग सुरू होता. त्यांच्या मनात असे आले की, आपला आता वृद्धापकाळ आला, तेव्हा तळेगाव दाभाडयास जाऊन राहावे. तेथे समर्थ विद्यालयाच्या मालकीची जमीन होती. त्यातील अर्धा एकर जमीन विकत घ्यावी. तेथे पंधरा-वीस खणांची इमारत स्वत:स राहण्याकरिता बांधावी व त्या इमारतीत आपल्या जवळच्या हस्तलिखित ग्रंथांचा व ऐतिहासिक कागदपत्रांचा प्रचंड संग्रह ठेवावा आणि लेखनकार्य करीत कायम तळेगावलाच राहावे. कल्पना मनात येण्याचा अवकाश,तळेगावी हा संग्रह हलवण्यापूर्वी त्यांची तपशीलवार यादी करण्याचे त्यांनी ठरविले. त्यांच्या संग्रहाच्या सर्व पेटचा व ट्रंका भटांच्या गावातल्या राहत्या घरी होत्या. त्या धुळे-मालेगाव रस्त्यावरील त्यांच्या बंगल्यात नेण्यात आल्या व पेटचातील ग्रंथांची यादी करण्याचे काम त्यांनी, त्यांचे शेजारी वाळूभाई मेथा यांच्या सहाय्याने सुरू केले. हे काम जवळ जवळ महिनाभर चालले होते. ते पुरे झाल्यावर सर्व पेटचांस कुलुपे लावून त्या बंगल्याच्या एका खोलीत ठेवण्यात आल्या.

असे दिवस चालले असता १९२६ चा डिसेंबर महिना आला. राजवाडयांची प्रकृति उत्तम होती.नेहमी पहाटे पाच वाजता उठण्याची त्यांची सवय पूर्वीपासूनची होती. उठल्यानंतर प्रात:कर्मे आटोपल्यावर ते एक पेलाभर दूध चांगले तापविलेले साखर न घालता घेत व कामाला लागत, स्नान, भोजन व भोजनोत्तर विश्रांतीचा मोजका वेळ वजा करता, सकाळी सहा वाजल्यापासून दुपारी साडेअकरा वाजेपर्यंत आणि पुन्हा साडेबारा वाजल्यापासून चार वाजेपर्यंत आठ-नऊ तास धातुकोशाचे काम जारीने चाले. चार वाजता ते फिरायला बाहेर पडत व दीड दोन तास पाच-सहा मैल फिरून परत येत. एवढचा काळात त्यांना पूर्वी आलेली चक्कर किंवा डोक्यात उठलेली कळ यांची पुनरावृत्ति झाली नाही. फक्त त्यांना मनस्ताप देणारा एक प्रसंग घडला. २३ डिसेंबर रोजी स्वामी श्रद्धानंदांचा खून झाला. राष्ट्राच्या आणि हिंदुत्वाच्या सेवेसाठी सर्वस्व अर्पण केलेल्या त्या थोर संन्याशाच्या निर्घृण हत्येने धरणीकंप झाल्याप्रमाणे सारा देश मुळा-

पासून हादरला. राजवाडे तर इतिहासाचे अभ्यासक, इतिहासाप्रमाणे प्रचलित घडामोडीचेही साक्षेपाने अवधान राखणारे व चालना करणारे विचारवंत, सनातन धर्माचा व आर्यसंस्कृतीचा त्यांचा अभिमान श्रद्धानंदासारखा उदंड, त्यांचा स्वभाव पराकाष्ठेचा संवेदनशील आणि उत्कट. श्रद्धानंदांच्या खुनाचा त्यांच्या मनावर जबरदस्त आघात झाला, इतका की, ते एकसारखे मोठमोठ्याने म्हणत राहिले, 'याचा सूड कोणीच कसा घेत नाही ?' त्यांना भ्रम झाल्यासारखे झाले.एवढा एक प्रसंग सोडला तर राजवाड्यांना मनस्ताप होण्यासारखे आणि त्यांचा रक्तदाब वाढवण्यासारखे या काळात काही घडले नाही. आणि हाही प्रसंग घडला याला निःसंदिग्ध पुरावा नाही. राजवाड्याच्या आठवणी निवेदन करणारे कल्याणचे फडके हा प्रसंग घडल्याचे सांगतात, पण राजवाड्यांचे अंतेवासी असलेले भट आपल्या 'राजवाडे चरित्रा'त त्यांचा उल्लेखही करीत नाहीत.रक्तदाबापुरतेच म्हणायचे म्हणजे अलीकडे पाश्चात्य वैद्यक शिकलेल्या डॉक्टरांकडून राजवाड्यांनी आपली सांगोपांग तपासणी करवून घेतली होती आणि पासष्टाव्या वर्षी त्यांची उत्तम असलेली प्रकृति आणि हृदय वगैरे इन्द्रियाचे निर्दोष व्यापार पाहून प्रकृतीस विकार झाल्याचा वृथा भास राजवाड्यांना होत आहे असा डॉक्टरांनी निर्वाळा दिल्यामुळे राजवाडे निःशंक झाले होते. किंबहुना, 'मला झालेल्या विकारातून मी जवळ जवळ निसटलो आहे' असे ते म्हणू लागले होते.

२४ डिसेंबरपासून कोर्टाला नाताळची सुट्टी सुरू होत होती. या नाताळात अहिल्याबाईची राजधानी महेश्वर येथे जावे आणि तिच्या तेथील मंदिराला भेट द्यावी असा शंकरराव देव आणि भट यांचा मनोदय होता. त्याप्रमाणे निघण्यापूर्वी त्यांनी राजवाडे यांची भेट घेतली आणि आपण महेश्वरला जात असल्याचे त्यांना सांगितले. राजवाडे म्हणाले, 'बरे आहे, माझी प्रकृति ठीक आहे. परत आल्यावर भेट होईलच.' याप्रमाणे बोलणे-चालणे होऊन भट व देव संध्याकाळचे गाडीने महेश्वराकडे रवाना झाले ते सोमवार २७ डिसेंबर रोजी महे-

...१४

श्वरास पोचले. मंगळवार २८ डिसेंबर रोजी सकाळी साडेअकरा वाजता राजवाडे नेहमीप्रमाणे भोजनास बसले. भोजनानंतर चौकातील मोरीवर आचवण्यासाठी जात असता त्यांना एकाएकी उलटी झाली व ते बेशुद्ध पडले. नोकर बंगल्यात झाडीत होता तो आला. तेवढ्यात विष्णुपंत निजसुरे नेहमीप्रमाणे त्यांच्या भेटीकरिता व काम करण्याकरिता आले. तो राजवाडे पुढील दालनात त्यांना दिसले नाहीत म्हणून ते आत गेले तो चौकात त्यांना राजवाडे पडलेले दिसले.त्यावर त्यांनी त्यांच्या डोक्यांवर गार पाणी टाकले तेव्हा राजवाडे यांनी डोळे उघडले आणि त्यांस पाणी न टाकण्याविषयी सांगितले.मग त्यांना उठवून निजसुऱ्यांनी अंथरुणावर आणून निजविले व डॉ. न. ग. पटवर्धन यांस बोलविण्यात आले. त्यांनी त्यांना तपासून औषध दिले व शंकरराव देव यांचे चिरंजीव गणेश शंकर देव यांस चिठ्ठी लिहिली की, ‘विसूभाऊ राजवाडे आजारी आहेत. त्यांना दुपारी उलटी झाली व ते दुपारी बेशुद्ध पडलेले दिसले. मी त्यांना नुकतेच तपासले आहे. त्यांची नाडी फार क्षीण आहे. मी त्यांना उत्तेजक औषध नुकतेच दिले आहे. तुम्ही त्यांना डॉ. कीर्तने यांच्याकडून तपासून घेतले तर जास्त बरे.’ तेव्हा डॉ. कीर्तन्याकडून त्याची तपासणी करून घेण्यात आली व औषधोपचार सुरू झाले.

राजवाड्यांची प्रकृती वरचेवर तपासण्यास सोईचे पडावे म्हणून त्यांना गावातील भटांच्या घरी आणण्यात आले. बुधवार व गुरुवारी राजवाड्यांना झोप चांगली लागली व त्यामुळे त्यांना हुशारी वाटू लागली. भटांचा मुलगा, पुतण्या, निजसुरे मास्तर रात्री दिवसा सारखे सारखे जवळ सेवेला होते. ‘भटांना तार करू का ?’ असे कोणी विचारले तेव्हा राजवाडे ‘नको’ म्हणाले. विशेष म्हणजे या आजारात राजवाडे विकल होऊन भटांच्या घरी शरपंजरी पडले असता त्यांचे मन प्रवास करीत पंचवीस वर्षे मागे गेले. आणि आपल्या प्रेमळ आईची त्यांना आठवण झाली, आणि ते गहिवरून भटांच्या बायकोला म्हणाले, ‘माझी आई जिवंत असती तर तिने प्रेमळपणाने माझ्या आजारात माझी काळजी घेतली असती !’ ज्या आईची तारु-

ण्याच्या अविचारात राजवाड्यांनी उपेक्षा केली होती, तिची आठवण त्यांना या दिवसात व्हावी हे आश्चर्यच म्हटले पाहिजे. माणसाचे मन मोठे विचित्र आहे. त्याला केव्हा कशाची आठवण होईल काही सांगता येत नाही. आयुष्य हे एक वर्तुळ आहे आणि जसजसा माणूस त्याच्या शेवटाकडे येतो, तसतसे त्याला सुरुवातीच्या दिवसांची आठवण जास्त प्रकर्षाने होते असे म्हणतात ते काही खोटे नाही.

शुक्रवार ३१ डिसेंबर रोजी, सकाळी राजवाडे उठले, तेव्हा रात्रभर शांत आणि गाढ झोप लागल्यामुळे, त्यांना चांगली हुशारी वाटत होती. सकाळी मुखमार्जनदी प्रात:कर्मे झाली. दोन वेळा त्यांनी दूध मागून घेतले. आणि नंतर बैठकीचे जागी ते तक्क्यास टेकून बसले. सध्या लेखन–वाचन तसे बंदच होते. बसले असता एकाएकी डोक्यात 'कळ आली' असे ते मोठ्याने ओरडले आणि खोलीतून कचेरीकडे येऊ लागले. ते वाटेतच पडले. डॉक्टरास बोलावणे गेले. रस्त्याने शंकरराव देवांचा मुलगा दाजीबा देव चालला होता. त्याला भटांच्या मुलाने हाक मारली. दाजीबाने मांडी दिली. त्याच्या मांडीवर राज–वाड्यांनी शांतपणे प्राण सोडला.

राजवाड्यांच्या अखेरच्या घटकेला दाजीबा देवांचा जो संबंध योगायोगाने आला, त्याचा विचार केला, म्हणजे जो इतिहास लिहिण्यात राजवाडे यांनी जन्म खर्च केला, त्या इतिहासातील परशुरामभाऊ पटवर्धन या वीर पुरुषाच्या मृत्यूची आठवण झाल्याशिवाय राहत नाही. परशुरामभाऊ पट्टणकोडीच्या लढाईत धारातीर्थी पतन पावले आणि त्यांची शेवटची सेवा आणि उत्तरकार्य, त्यांच्या विशेष परिचितांपैकी नसलेल्या नारो हरि करंदीकराने केले. त्याबद्दल लिहिताना नारो हरि म्हणतो–' 'कैलासवासी भाऊसाहेब यांचे चौघे पुत्र, शिवाय भाई मंडळी बहुत. आप्त, पदरची मंडळी थोर थोर वगैरे कित्येक लहान मोठे इतके असोन सायंकाळच्या समयास कोणीच नाही. नारो हरि करंदीकर याचा जन्मांतरीचा योग उभा राहिला. अशा पुण्यश्लोकांचे देहास हात लागून अंतकाळची सेवा जी पुत्रांचे हातून व्हायची ती माझे हातून घडली. अशी सेवा हजारो रुपये खर्च

केल्यास घडावयाची नाही ती घडली. मोठाच अलभ्य लाभ झाला. शेवटी ज्या अंतकाळ समयाचा पुत्र नारो हरि असे विश्व तो मुखी जाहले.' ज्याप्रमाणे परशूरामभाऊ पटवर्धनांच्या बाबतीत त्या नारो हरि करंदीकरांचा, त्याप्रमाणे राजवाड्यांच्या बाबतीत दाजीबा देवांचा जन्मांतरीचा योग उभा राहिला, आणि राजवाड्यांच्या अंतेवासीयांपैकी नसूनसुद्धा, त्या पुण्यश्लोकास मरताना मांडी देण्याचे भाग्य त्याला लाभले. एकेकाचा सुकृतयोग, दुसरे काय !

या प्रसंगापूर्वी सात–आठ वर्षे एक मोठी सांगण्यासारखी गोष्ट घडली होती. राजवाड्यांचा मुक्काम तळेगाव दाभाड्याला भाटवडेकरांच्या वाड्यात होता. बरोबर कृ. पां. कुलकर्णी होते. दुपारी जेवण करून राजवाडे वरच्या मजल्यावर नेहमीच्या बाकावर वामकुक्षी करीत होते व कुलकर्णी खालच्या मजल्यावर लवंडले होते. राजवाडे काही झोपले नव्हते.

त्यांच्या डोक्यात गुणवृद्धी होताना स्वरांच्या उच्चारात कसे फरक होतात हा विषय घोळत होता. आणि वर आढ्याकडे दृष्टी लावून अ आ इ उ ए ऐ ओ, औ, ऋ, आर्, ऌ, आल् असे निरनिराळे ध्वनि तोंडातून निघत होते. सारखे पंधरा मिनिटे राजवाड्यांची तंद्री लागून त्यांच्या तोंडातून हं, हां, हू, हौ, हाय, हाल्, हिं, हे, हें, असे ध्वनि निघत होते. एवढ्यात झाडलोट करणारी म्हातारी आली.तिने ते जिन्यातून ऐकले. ती चपापली. तिला वाटले राजवाडे आजारी झाले. ती धीर करून वर गेली व बोलली, 'अब, आज असं कायव्ह करताय ? तुमास्नी काय व्हतंय ? काय दुखतं व्हय ? मी रगडू का ? चोळते वाटलं तर मी.' राजवाडे म्हणाले, 'तसं काही नाही. मला काही होत नाही जा. मी चांगला बरा आहे. तसं काही मला झालं नाही.' म्हतारी काही ऐकेना. ती म्हणे, 'मी जरा चोळते. जरा मला रगडू द्या' आणि राजवाडे काही ऐकेनात. कुलकर्ण्यांना वाटले. काही भांडण जुंपले की काय म्हणून ते वर गेले पाहतात तो हा प्रकार. थोड्या वेळाने कुलकर्ण्यांना उलगडा झाला. त्यांनी म्हातारीची समजूत घातली. गुण वृद्धि, व्याकरण यांचा तिचा काही संबंध

नव्हता. राजवाड्यांचा स्वरकल्लोळ ऐकून तिला ते त्यांचे कण्हणेच वाटले तर ते साहजिक होते ती निघून गेली आणि मग राजवाडे आणि कुलकर्णी दोघेही पुष्कळ वेळ एकमेकांकडे बघत नुसतेच हसत राहिले. हसण्याचा भर ओसरला आणि कुलकर्णी राजवाड्यांना म्हणाले, 'बस् करा हे तुमचे गुणवृद्धि! खरेच एखाद्या वेळी आजारी पडाल. आणि खरेच जर आजारी पडला, तर तुमचे ऋणानुबंधी आप्तही कोणी जवळ असणार नाहीत. त्यांना कळायचेही नाही दुसरेच कोणी तुमची शुश्रूषा करतील.' कुलकर्ण्यांच्या मुखाने भवितव्यता जणू बोलत होती. बोला फुलाला गाठ पडावी तसे झाले आणि राजवाड्यांच्या ऋणानुबंधी मित्रांपैकी कोणीही त्यांच्या अखेरच्या क्षणी उपस्थित राहू शकले नाही. देव आणि भट महेश्वरला, पोतदार, मायदेव, आपटे, डॉ. केतकर पुण्याला, मुंडले इस्लामपूरला आणि कुलकर्णी साताऱ्याला होते. या सर्वांनी थोरल्या भावाप्रमाणे त्यांची काळजी वाहिली. पण मरताना त्यांच्या डोक्याखाली आपल्या मांडीचे उसे देण्याचे भाग्य कोणालाही लाभले नाही. ते भाग्य दाजिबा देवाला लाभले.

१ जानेवारी १९२७ रोजी सकाळी, धुळे स्टेशनवर भास्करराव भट आणि शंकरराव देव उतरले आणि त्यांच्या ध्यानीमनी नसलेली राजवाड्यांच्या मृत्यूची बातमी त्यांच्या कानावर पडली, तेव्हा मस्तकावर वज्राघात व्हावा, त्याप्रमाणे आश्चर्याने आणि दुःखाने ते स्तंभित झाले. आठच दिवसांपूर्वी राजवाड्यांचा निरोप घेऊन ते दोघे महेश्वरला गेले होते. जाताना राजवाडे त्यांना म्हणाले होते, 'बरे आहे, माझी प्रकृति ठीक आहे. परत आल्यावर भेट होईलच.' देव आणि भट परत आले होते पण आता भेट होणार नव्हती. जन्मभर चिरप्रवासी असलेले राजवाडे यावेळी अशा प्रवासाला गेले होते की, जेथून परतणे नव्हते. 'The Undiscored country, From those bourn no traveiler returns!' तीस वर्षांच्या ऋणानुबंधाचा धागा तटकन् तुटला होता. आपण जाऊ असे राजवाड्यांना जेथे वाटले नाही, तेथे त्यांच्या स्नेह्यांना वाटू नये, हे साहजिकच होते.

पण ते घडले होते, होत्याचे नव्हते झाले होते. राजवाडे कायमचे गेले होते. 'नियति न घडलेल्या गोष्टी घडविते, घडू पाहणाऱ्या गोष्टी दुर्घट करते, व ज्यांची माणूस कल्पनासुद्धा करीत नाही, त्या गोष्टी घडवून आणते' असे कवीने म्हटले आहे, ते किती खरे आहे बरे!

'जीवेम शरदः शतम। पश्येम शरदः शतम्। भूयसी शरदः शतम। असे श्रुतिवचन आहे. या श्रुतिवचनाप्रमाणे शंभर वर्षे जगण्याचा राजवाडे यांचा निर्धार होता, इतकेच नव्हे तर अर्थव्यवहारात खबरदार असलेला मनुष्य ज्याप्रमाणे रुपये आणे पै चा जमाखर्च साक्षेपाने ठेवतो, त्याप्रमाणे 'शतायुर्वै पुरुषः। ही आपली कालमर्यादा लक्षात ठेवून आयुष्यातील गेलेली वर्षे आणि राहिलेली वर्षे आणि करावयाचे काम यांचा ताळेबंद राजवाडे मोठ्या काटेकोरपणाने ठेवीत असत आणि वेळेला पैशापेक्षाही जास्त जपत असत. १९१० साली त्यांना पंचेचाळीस वर्षे पूर्ण होऊन सेहेचाळीसावे वर्ष लागले. त्यावेळी त्यांनी लिहिलेले असेच एक आत्मनिरीक्षणपर टिपण त्यांच्या मनोव्यापारावर प्रकाश टाकण्याच्या दृष्टीने महत्त्वाचे आहे--'आषाढ शु ॥६–१०, या विसाला नवे ४६ वे वर्ष लागले. ५४ राहिली. त्यात सर्व जगताला हितकारक व राष्ट्राला पोषक अशी कृती होवो. आजपर्यंत फक्त स्मृति, राष्ट्रीय तयार करण्यात काळ गेला. यापुढे कृति कृति कृति झाली पाहिजे नाही तर व्यर्थ. चाळीस वर्षे सतत मेहनत झाली पाहिजे. आरोग्य–उत्तम हवा, उत्तम पाणी, उत्तम जागा, उत्तम शुद्ध अन्न ही मिळाली तर हेही होईल. ईश्वरी कृपा अपरंपार व्हावी.' या शंभर वर्षांचा हिशेब एकदा त्यांनी सातवळेकरांना सांगितला होता व म्हटले होते, की, 'आपण ८५ वर्षांचे वय होईपर्यंत इतके लिहून संपविणार व मग पुढे अगदी एकांत सेवन करणार आहे.' आपला हा संकल्प सिद्धीस न्यावा म्हणून, 'आहार शुद्धौ सत्त्व शुद्धिः। सत्त्व शुद्धौ ध्रुवाः स्मृतिः।' या न्यायाने दूध, तूप, भात, मध असा सात्त्विक आहार राजवाडे कटाक्षाने घेत. दोन वेळा जेवणाऱ्यामध्ये ते तोंड सुद्धा हालवीत नसत. पिण्याचे पाणी स्वच्छ व शुद्ध वापरीत. अनेक

वेळा ते तापवलेले पाणी वापरीत. संध्याकाळी मोकळया हवेत पाच-सहा मैल फिरायला जात. दुपारी झोपत नसत. रात्री जागत नसत. प्रवासात खाण्याचे पदार्थ विकत घेत नसत. चहा,कॉफी असली व्यसने करीत नसत. ओझोन वायु मिळतो म्हणून दोन प्रहरच्या उन्हात फिरायला निघत. इतक्या साक्षेपाने वागल्यानंतर शंभर वर्षांचे आयुष्य यमराजाकडून आपण पुरेपूर वसूल करूच करू अशी त्यांना हिंमत होती. ज्यामुळे अष्टौप्रहर प्रकृतीची चिरचिर करणारी रडकी माणसे पाहिली म्हणजे त्यांचा संताप अनावर होई. ते त्यांना म्हणत, 'मरा लेको, आजच मरा; तुम्ही जितके लौकर मराल तितके चांगलेच. कारण आपल्या रडगाण्यांनी तुम्ही दुसऱ्यासही नाउमेद करता. आत्महत्या व परहत्या अशी दोन्ही पातके तुम्ही त्यामुळे करीत आहात—'

मोठा माणूस लहान चकमकीत गाफीलपणे चुकून मारला जावा, त्याप्रमाणे मोठ्या कामासाठी एवढ्या काळजीने राखलेले आपले शरीर लहान गफलतीने खर्च होऊ नये म्हणून राजवाडे फार जपत. त्यांचा प्रसिद्ध भित्रेपणा हा या ' जीवन कर्मम् वाध्युनायमु ।' –जिवंत राहिलो तर कर्म ' या वृत्तीचाच परिपाक होता. मोठ्या संकटाशी ते बेदरकारपणे झुंज घेत पण लहान गोष्टींची त्यांना फार भीती वाटे. दारिद्र्याची त्यांना तमा नव्हती, श्रीमंताचा त्यांना धाक नव्हता, मृत्यूशी सामना करायला ते मागे घेत नव्हते पण औषधात विषप्रयोग झाल्याचा संशय आला की त्यांची बोबडी वळे. त्यांच्या काळात प्लेग हा दरवर्षीचा पाहुणा होता. राजवाड्यांना प्लेगची भीती इतकी वाटे, की, एखाद्या गावी मेलेला उंदीर सापडला अशी वार्ता त्यांच्या कानावर येण्याचा अवकाश की ते तो गाव सोडून जात. रणांगणांत गोळ्यांचा पाऊस पडत असता बेडरपणे पुढे घुसणारा नेपोलियन घरातल्या मांजराला भीत असे म्हणतात, तशातला राजवाड्यांचा हा प्रकार होता.

नेपोलियनच्या मांजराप्रमाणे राजवाड्यांचा साप होता. साप त्यांना कधी चावला नाही. पण साप चावल्याचा भ्रम त्यांना अनेक

वेळा झाला. गुंजवण मावळातील एका खेड्यात त्यांचा एकदा मुक्काम होता. दोन–तीन सोबत्यांबरोबर नेहमीप्रमाणे डोंगरपायथ्यापर्यंन्त संध्याकाळी दोन–तीन मैल फिरून राजवाडे परत येत होते. रात्र पडली नव्हती. पण सूर्यास्त झाला होता. त्या संधिप्रकाशात राजवाड्यांच्या पायात काटा मोडला. त्यांना वाटले साप चावला. त्याबरोबर 'साप चावला' असे मोठ्याने किंचाळून त्यांनी जमिनीवर अंग टाकले. सोबत्यांनी आसपास न्याहाळले. पण साप कोणालाच दिसला नाही. तेव्हा एका स्नेह्याने जवळच्या विहिरीतून वस्त्र भिजवून आणले आणि ते त्यांच्या तोंडावर पिळले. मग कण्हत विव्हळत राजवाडे एका कुशीवरून दुसऱ्या कुशीवर वळू लागले. तोंडावर पाण्याचा मारा चालूच होता. पंधरा मिनिटांनी ते सावध झाले. प्रथम बसले व एखाद्या मिनिटात उठून उभे राहिले व घराच्या दिशेने चालू लागले. चालतांना सांगू लागले की, 'यमाचे वॉरंट आले होते. त्याला मी बजावले की, मला शंभर वर्षे जगायचे आहे. पुष्कळ कामे करायची आहेत. तोवर हे वॉरंट अमलात आणू नको.' राजवाड्यांचे असे बोलणे चालले असता, त्याच्या सोबत्यांपैकी एकाने त्यांच्या पायातून काढलेला काटा पुढे केला व तो दाखवून त्यांना म्हटले, 'तुम्हाला साप चावलाच नव्हता तर यमाचे वॉरंट येणार कोठून ?' तेव्हा तो काटा हातात घेऊन राजवाडे म्हणाले, 'हा सापाचाच दात आहे पण साप म्हातारा म्हणून हा दात काट्यासारखा वाटतो.' राजवाड्यांचे 'पडलो तरी नाक माझेच वर' अशा थाटाचे हे उत्तर ऐकून त्याच्या बरोबर वाद घालण्याचा नाद मंडळींनी सोडून दिला. For even though vanquished, he would argue still' असा गोल्डस्मिथ खेड्यातल्या शाळामास्तरासारखा राजवाड्यांचा असलेला हेकट स्वभाव सर्वांच्या परिचयाचा होता.

राजवाडे मरणाला भीत नव्हते, पण मरणाने नैसर्गिकपणे संपणारे जीवन सार्थकी लावावे म्हणून परोपरीने प्रकृतीची काळजी घेत होते. पण अखेर व्हायचे तेच झाले. एवढी काळजी घेऊन राजवाड्यांवर मृत्यूने अंधारात घाव घातला आणि त्यांचे प्राण हरण केले. भूतावरून

भविष्याचा अंदाज बांधणे हे इतिहासकाराचे कार्य, पण या श्रेष्ठ इतिहासकाराला स्वत:च्याच बाबतीत, इतर थोर इतिहासकारांप्रमाणेच 'दैवं चैवात्र पंचमम्' अशा दैवाने धोका दिला. सत्तावन्नाव्या वर्षी आपल्या मित्राबरोबर बोलताना आपण अजून दहा-पंधरा-वीस वर्षे उत्तम काम करू शकू. असे इतिहासकार गिबन म्हणाला आणि तो वीस तासांनी मेला. 'अजून तेरा वर्षांनी मी शंभर वर्षांचा होईन' असे प्रसिद्ध इतिहासकार मॉंटफेकॉन म्हणाला आणि दोन दिवसांनी मेला. राजवाडे शंभर वर्षे जगू म्हणत होते आणि चौसष्टाव्या वर्षी गेले. Why can tell the last thought of the aging' असे गटेने म्हटले आहे ते खरे आहे. मरणाऱ्या माणसाचे शेवटचे विचार कोण सांगू शकेल ? पण अथांग सागराच्या काठावर निश्चितपणे उभ्या असलेल्या माणसाला मागून अचानक धक्का देऊन पाडले असता, त्या समुद्राच्या तळाशी जात असणाऱ्या त्या दुर्दैवी माणसा-प्रमाणेच, काळसागराच्या अगाध, खोल अंधाऱ्या तळाशी जात असता आश्चर्य, संताप, निराशा यांचा कल्लोळ राजवाड्यांच्या मनात उस-ळला असेल, असा तर्क केला तर तो चूकच ठरेल असे नाही. जेथे स्वत: राजवाड्यांना त्यांच्या मृत्यूची घटना अनपेक्षित होती, तेथे त्यांच्या स्नेह्यांना ती किती आकस्मिक वाटली असेल हे सांगावयास नको. आज काही नाही तरी पस्तीस-चाळीस वर्षे राजवाड्यांची ती धिप्पाड आणि तेज:पुंज मूर्ती त्यांच्यापुढे वावरत होती. त्यांची बेदर-कार वृत्ती, त्यांचा खणखणीत आवाज, त्याचे पिळदार दंड, भरदार छाती, तेजस्वी मुद्रा, कितीही मजल मारणारे पाय, काहीही पचविणारे पोट. हे सर्व पाहता ते बोलल्याप्रमाणे शंभरी पार करतील यात त्यांना शंका नव्हती. त्यामुळे एकाएकी त्यांच्या मृत्यूची बातमी काना-वर आदळली, तेव्हा नाना प्रकारचे तर्कवितर्क सुरू झाले. राज-वाड्यांचा तालीमबाजीचा शोक मशहूर होता. तेव्हा पुष्कळांना वाटले की, राजवाडे फार व्यायाम केल्यामुळे मेले. पुण्यास अशी बातमी आली की रोज हजार नमस्कार घालण्याने राजवाडे ह्याच्या हृदयास इजा झाली व त्यामुळे त्यांचा अंत झाला. पण राजवाडे यांच्या मृत्यू-

नंतर बारा दिवसांनी त्यांचे अंतेवासी शंकरराव देव यांनी आपल्या बंधूंना पत्र लिहिले त्यात त्यांनी म्हटले, की रा. विसूभाऊ कधी नमस्कार घालीत नसत. फिरावयास रोज पाच–सहा मैल जात.' त्यामुळे नमस्कारांच्या अतिरेकाची शंका अर्थातच निराधार ठरली. मृत्यूनंतर मेंदूतील रक्तस्राव आणि अर्धांगवायूचा झटका हे त्यांच्या मृत्यूचे निदान झाले. रक्तदाब आणि अतिरिक्त बौद्धिक श्रम हे कारण भट देतात. पण ही कारणेही कोणत्यातरी कारणाचे परिणाम होत. राजवाडयांच्या बाबतीत त्यांच्या मृत्यूला कारणीभूत होणारे मूळ कारण कोणते असेल बरे ?

रियासतकार सरदेसाई यांनी यासंदर्भात राजवाडयांची सांगितलेली एक आठवण देण्यासारखी आहे. ते म्हणतात, 'त्यांना आपले मन आवरता येत नसे. एकदा साता-यास मी त्यांना भेटलो. मोठया भांडयात शेर–दोन शेरांचा भात शिजवून भोजनास बसण्याचे संधीत मी त्यांच्याकडे गेलो जवळ बसण्यास सांगितले. जेवता का माझ्या-बरोबर म्हणून विचारले. मी नाही म्हटले. नंतर त्यांनी तो सर्व भात मोठया ताटात ओतला. जवळ दुधातुपाची भांडी होती. ती सर्व आत ओतली. हाताने सर्व एकत्र लगदा केला आणि भराभर मोठे घास घशात घालून अल्पावकाशात त्यांचा फन्ना उडविला, आणि वर मला म्हणाले, असे जेवावे लागते सपाटून तेव्हा ताकद राहाते, आणि कष्ट होऊ शकतात. मला हे तत्त्वज्ञान बिलकूल पटले नाही. शरीराची रचना आणि आहारादि व्यवहाराचा नियमितपणा एवढया विचारी बुद्धिमान माणसास कळू नये आणि अशांनी आरोग्य मंडळे स्थापून जनतेच्या आरोग्याचा पुरस्कार करावा याचे मला आश्चर्य वाटले ! मी काही त्यास उत्तर केले नाही, पण मनात अत्यंत चरकून गेलो की अशा आचरटपणाने हे आपले आयुष्य कमी करीत आहेत. पण या गोष्टी दुसऱ्याने शिकवून येत नसतात. मी मरतुकडा आज इतकी वर्षे जगून उद्योग करतो आणि राजवाडयांसारखे भक्कम पुरुष अल्पायुषी व्हावे, यातले इंगीत प्रत्येकाने ओळखले पाहिजे. 'अति सर्वत्र वर्जयेत' हे सूत्र राजवाडयांनी ओळखले नाही.'

सरदेसायांच्या म्हणण्यात तथ्य आहे. कारण राजवाड्यांना जे जमले नाही ते 'मुक्ताहार विहाराचे' तत्त्वज्ञान त्यांनी स्वतः आचरून दाखवले. वयाच्या साठाव्या वर्षी बडोद्यातली नोकरी त्यांनी सोडली त्या वेळी त्यांची प्रकृती अगदी खंगून गेली होती. त्या निःसत्त्व हवेत त्याची पचनक्रिया बिघडून गेली होती व त्यांना मैलभरही चालवत नसे. पण पुढे कामशेतला त्यांना थंड हवा मिळाली. आपल्या अनुभवावरून त्यांनी हिंदी आहाराला शास्त्रीय रूप दिले, त्याचे नियम केले. ते स्वयंपाकघरात टांगून ठेवले. दूध, लोणी, ताक, दही याचा वापर जास्त, मसाले सर्वथा वर्ज्य, फळे व द्विदल धान्ये यांवर भर जास्त. संध्याकाळी चार-पाच मैल नियमाने डोंगरावर फिरायला जात, लाकडे फोडत, सर्व बाबतीत प्रमाण असे. आनंद वाटेपर्यन्तच खावे. आनंद वाटेपर्यंतच काम करावे. कोणतीही गोष्ट आनंद वाटेपर्यंतच करावी असे मला वाटते.' हे त्यांचे आचारसूत्र होते. अशा जीवपद्धतीमुळे साठाव्या वर्षी पैलतीरी नेत्र लागलेले सरदेसाई चौऱ्याण्णव वर्षे जगू शकले आणि रियासतींचे बारा खंड, पेशवे दप्तराचे पंचेचाळीस खंड, रेसिडेन्सी रेकॉर्डस्चे चौदा खंड असे प्रचंड काम करू शकले. आज नव्वदीच्या वयात मी उद्योगक्षम व तरतरीत आहे याचे कारण वरील आचारपद्धतीच होय ! असे त्यांनी म्हटले आहे. ती वस्तुस्थिती आहे.

'हे तो प्रचीतीचे बोलणे' अशा या सरदेसायांच्या विधानाच्या पार्श्वभूमीवर राजवाड्यांबद्दलचा त्यांचा अभिप्राय किती उठून दिसतो याचा आपणच विचार करावा. राजवाड्यांना खायला कमी असलेले कधी आवडत नसे. त्यांच्या जीवाचा नुसता संताप होई. त्यांचा हा स्वभाव लहानपणापासून होता आणि मोठेपणीही त्यात काही फरक पडला नव्हता.

एकदा ते मावळ प्रांतात इतिहास संशोधनासाठी गेले होते. ते ज्या घरी उतरले होते, तेथे एक आजी व तिचे दोघे नातू होते. राजवाडे आल्यावर तिने त्यांच्यापुढे एका वाडग्यात ओंजळभर पोहे व त्यावर खोबऱ्याची वाटी व गुळाचा खडा ठेवून त्यांचा पाहुणचार

केला, राजवाड्यांनी एकदा वाडग्याकडे, व एकदा आजीकडे पाहिले व म्हणाले, 'बाई, मागल्या पिढीतल्या असून अशा हेंगट्या कशा हो? ह्या वाडगाभर पोह्यांनी कसा निभाव लागणार?' तेव्हा आजी म्हणाली, 'एवढा वाडगा रिकामा करा. तोवर मी तुमचे समाधान होण्याइतके खायला आणून देते.' असे बोलून तिने दीडवीत व्यासाची आणि बोटभर खोलीची एक परात पोह्यांनी काठोकाठ भरून आणि वाटीऐवजी खोबऱ्याची गोटी व तेवढाच मोठा गुळाचा खडा त्यावर ठेवून ती परात राजवाड्यांपुढे ठेविली. तेव्हा राजवाडे प्रसन्न झाले व गूळखोबऱ्यासह दोन्ही भांड्यातील पोहे संपविले. नंतर दीड-दोन तास नदीवर आंघोळीला गेले. तेथे पोहले. कपडे धुतले व परत जेवायला आले. जेवण पाहून राजवाडे खूष झाले. सुवासिक तांदळाचा भात, त्यावर साजूक तुपाचा लिंबाएवढा गोळा, तोंडी लावण्यास वरण, लोणची, पापड, भातानंतर तळहातासारख्या जाडीच्या तीन-चार भाकरी व नंतर पुन्हा भात. पहिल्या भाताइतकाच. जोडीला दूध-दही-ताक. राजवाडे जेवून तृप्त झाले व आजी त्यांचे जेवण पाहून तृप्त झाली. दिवसातून दहा वेळा राजवाड्यांचे उदाहरण देऊन नातवांना ती उपदेश करीत होती की, 'जेवण असे भरभक्कम असावे. नाहीतर, तुम्ही आजकालची मुले. चिमटीभर भात आणि अर्धी चतकोर भाकर की भरले तुमचे पोट. या पाहुण्यांचा कित्ता जेवणाच्या बाबतीत गिरवा.'

कौतुक या दृष्टीने हे सर्व ठीक असले, तरी एकेकाळी स्तुतीला पात्र झालेला राजवाड्यांचा हा 'भरभक्कम आहार'च त्यांच्या मृत्यूला कारणीभूत झाला. हे नाकारण्यात अर्थ नाही. 'अन्न तारी अन्न मारी नाना विकार करी.' जास्त जेवण्याची त्यांची इच्छा अनैसर्गिक होती असे नव्हे पण ती पूर्ण करताना, थोडे खाल तर जास्त खाल, जास्त खाल तर थोडे खाल' ह्या प्रसिद्ध भोजनसूत्राची अति परिचयामुळे म्हणा की अनवधानाने म्हणा की आत्मविश्वासाच्या अतिरेकाने म्हणा, त्यांच्या हातून अवज्ञा झाली व त्या अवज्ञेचे प्रायश्चित्त 'विष जे आहे ते जाणून खा की नेणून खा, आपला अंमल

केल्याशिवाय राहात नाही.' या त्यांच्याच प्रसिद्ध वचनाप्रमाणे त्यांना भोगावे लागले.' 'जिव्हेपाशी आहे सूत्र' हे रामदासाचे वचन राजवाड्यांच्या बाबतीत दुहेरी अर्थाने खरे ठरवले. त्यांची जीभ त्यांच्या ताब्यात नसल्यामुळे त्यांच्या हातून माणसे तर तुटलीच पण त्यांच्या स्वतःच्या आयुष्याची दोरीही तुटली. जनमेजयाने तक्षकाच्या तावडीतून सूटण्यासाठी समुद्रात जलमंदिर बांधले. पण बोराच्या फळातील आळीच्या रूपाने तक्षकाने त्यांच्यावर चाल केली, त्याप्रमाणे राजवाड्यांच्या जिभेच्या मार्फत मृत्यूने त्यांच्यावर हल्ला केला. 'महाभारता'च्या अखेरीस पाच पांडव उत्तरेस जात असताना एका मागोमाग कोसळले. भीमसेन कोसळला. तेव्हा त्याने व्याकुळ होऊन धर्माला विचारले, 'हे राजा, पहा, मी तुझा प्रिय बंधु पडलेलो आहे. माझे हे पतन कशामुळे झाले, हे तुला माहीत असलें, तर मला सांग.' तेव्हा धर्म म्हणाला, 'मागचा पुढचा विचार न करीत तू फार खाल्लेस आणि त्यामुळे तुला प्राणांतिक यातना होत आहेत. म्हणून तू भूमीवर पडला आहेस. 'अतिभुक्तच सवता प्राणेन च विकत्थसे। अनवेक्ष्यपरं पार्थ तेनासि–पतित: क्षितौ।।' भीमाच्या अपमृत्यूचे जे कारण धर्मराजाने सांगितले, तेच बलभीम असलेल्या राजवाड्यांच्याही अकालमृत्यूचे कारण आहे. गिबनने व्यायामाची आणि राजवाड्यांनी जिव्हानियमनाची उपेक्षा केली, त्यामुळे मृत्यूने त्यांच्यावर घाला घातला असे म्हणण्यापेक्षा त्यांनी स्वत: होऊन मृत्यू ओढवून घेतला, असे म्हणणे भाग आहे. त्या दृष्टीने कॉटर मॉरिसनने गिबनच्या अकालमृत्यूबद्दल काढलेले उद्‌गार राजवाड्यांच्याही संदर्भात जितकेच सार्थ ठरण्यासारखे आहेत–' 'अशा प्रकारे त्यांच्या स्वत:–बद्दलच्या विचित्र उपेक्षेमुळे आणि अविचारामुळे जगात क्वचित आढळणारे एक अत्यंत समृद्ध मन कायमचे नष्ट पावले.'

महान माणूस मेला तरी माणसाला घटकाभर का होईना चुटपूट लागते, मग राजवाड्यांसारख्या मोठ्या माणसाचा मृत्यू आणि तोही अकाली झालेला मृत्यू किती चटका लावणारा असेल सांगितले पाहिजे

असे नाही. पण अशक्य ते शक्य झाले असते, व त्यांच्या शिवसंकल्प-नाप्रमाणे राजवाडे शंभर वर्षे जगले असते, तरी शंभर वर्षांनी का होईना, मृत्यू त्यांना अटळ होताच. ' तुम्ही शंभर वर्षे जगलात तरी एक ना एक दिवस ह्या सुंदर जगातून निघून जाणे भागच आहे.' असे एका फारसी कवीने म्हटले आहे, त्याला अगदी राजवाडेसुद्धा अपवाद नाहीत. परंतु, आज साठ वर्षांनंतर राजवाड्यांची आठवण आल्यानंतर वाईट वाटते, ते त्यांच्या मृत्यूबद्दल नव्हे. त्यांच्या उपेक्षे-बद्दल. जिवंतपणी जी उपेक्षा त्यांच्या वाट्याला आली, तिच्यात त्यांच्या मृत्यूनंतरही फारसा फरक नाही. काळाच्या ओघात मोठमोठे पर्वत सपाट होतात. आणि मोठमोठी माणसे विसरली जातात. त्या दृष्टीने व्यक्ती म्हणून राजवाडे विस्मृतीत गेले असतील तर ते निस-र्गक्रमाला धरूनच झाले असे म्हटले पाहिजे. पण राजवाड्यांचे महत्त्व व्यक्ती या दृष्टीने नसून विचारवंत या दृष्टीने होते. ते म्हणत की, ' माझी भूमिका विचारवंताची आहे. कार्यकर्त्याची ऊर्फ चळव-ळीच्या प्रणेत्यांची नाही, ' मी बुद्धिवादी आहे, आणि माझी पद्धती ऐतिहासिक आहे.' या विचारवंताच्या भूमिकेतून इतिहास, राजकारण, समाजकारण, भाषाशास्त्र इत्यादि अनेक क्षेत्रात राजवाडे यांनी कार्य केले व सिद्धांतवत असलेले विचार सांगितले. खेदाची गोष्ट ही आहे, की, नेमक्या त्याच सिद्धांतांची व विचारांची आज उपेक्षा होत आहे. विचारवंतांच्या विचारांची उपेक्षा हाच त्यांचा मृत्यू होय.

आयुष्याचा फार मोठा भाग राजवाड्यांनी इतिहास साधनांचे संशोधन, त्याची चिकित्सा व त्यावरून निघणारे सिद्धांत यांचा प्रपंच करण्यात खर्च केला. ह्या ज्ञानयज्ञाचे अध्वर्यूपद त्यांनी केवळ महा-राष्ट्रातच नव्हे तर हिंदुस्थानातही एवढ्या समर्थतेने सांभाळले की, जदुनाथ सरकारांसारख्या त्याच्या अनुदार टीकाकारालाही He bla-zed the frail for us ' असे उद्गार काढावे लागले. राजवाडे यांच्यानंतर सरदेसाई यांनी रियासतीच्या रूपाने हिंदुस्थानचा अर्वाचीन इतिहास बारा खंडात लिहिला आणि वा. सी. बेंद्रे यांनी शिवाजी, संभाजी व राजाराम यांची संशोधनपूत बृहत चरित्रे लिहिली. पण

सरदेसाई व बेंद्रे हे किती झाले तरी राजवाड्यांच्या पिढीतले इतिहासकार.तीच गोष्ट शेजवलकर, पुरंदरे, आवळसकर, ग. ह. खरे, य. न. केळकर इत्यादी किंचित नंतरच्या कालखंडातल्या इतिहासकारांबद्दल. त्यांच्यानंतर संशोधन चिकित्सा व सिद्धांत हे जे इतिहासाने राजवाड्यांनी सुरू केलेले क्षेत्र आहे, त्या संदर्भात निष्ठावंत अभ्यासक व त्या अभ्यासकांचे चीज करणारे अभिज्ञवाचक या बाबतीत काय स्थिती आहे ? राजवाडे याच्यानंतर हडपांनी 'कादंबरीमय पेशवाई' च्या द्वारे पेशवाईचा इतिहास सांगितला, नाथ माधवांनी 'स्वराज्याचा श्री गणेशा' पासून 'स्वराज्यातील दुफळी' पर्यंत शिवाजी ते शाहू हा कालखंड उभा केला. त्यानंतर अगदी अलीकडेपर्यंत रणजित देसाई यांची श्रीमान योगी व स्वामी, इनामदार यांच्या राजश्री, मंत्रावेगळा, झेप, झुंज, शहेनशहा, शिकस्त ' गो. नी. दांडेकरांच्या 'दया दार उघड' पासून 'हे तो श्रींची इच्छा' पर्यंत शिवकालावरच्या पाच कादंबऱ्या, या सर्वांनी मराठी ऐतिहासिक कादंबरीचे दालन समृद्ध केले आहे हे खरे आहे. पण ऐतिहासिक कादंबरी म्हणजे वस्तुनिष्ठ इतिहास नव्हे. त्या दृष्टीने पाहिले आणि वि. ल. भावे, सरदेसाई, शेजवलकर, क्षीरसागर या अभ्यासकांचे व विचारवंतांचे परखड मतप्रदर्शन लक्षात घेतले, म्हणजे असे म्हणणे भाग आहे, कीं, ज्याला राजवाड्यांनी जीवन अर्पण केले,त्या इतिहासाच्या क्षेत्राची उपेक्षा,त्याच्या नंतरही अजून चालूच आहे.

१९२२ साली वि. ल. भावे यांनी 'मराठी दप्तरा' चा दुसरा रुमाल प्रसिद्ध करताना उद्गार काढले ते मराठी माणसाला इतिहासाची खरीखुरी अभिरुची कितपत आहे, या गोष्टीवर मोठा विदारक प्रकाश टाकणारे आहेत. 'आपल्या पूर्वजांचे पराक्रम ऐकण्याची हौस महाराष्ट्राला थोडीफार आहे. पण त्यासाठी काही द्रव्य खर्चावे व पदरास चट्टा लावून घ्यावा ही इच्छा महाराष्ट्राची दिसत नाही. 'इतिहास ऐतिहासिक' सारख्या मासिकाला पुरे दोनशे वर्गणीदारही मिळू नयेत, 'रामदास रामदासी' तोटा खाऊन चालविणे भाग पडावे; 'ऐतिहासिक लेखसंग्रह' च्या संपादकाला मेटाकुटीने तोंडमिळवणी

करता यावी व स्वतःच्या उदरनिर्वाहासाठी नाटके लिहिण्याची पाळी यावी,या गोष्टी शरमेच्या आहेत. चांगला जुना ऐतिहासिक लेख किंवा एखादे काव्य प्रसिद्ध करण्याचे एकही साधन महाराष्ट्रात नसावे ही गोष्ट खचित कमीपणा आणणारी आहे.'

१९२९ साली उत्तर मराठशाहीच्या इतिहासाची अवाढव्य साधने व त्यांच्या व्यस्त प्रमाणात असलेले मराठी अभ्यासक यांच्याबद्दल सरदेसायांनी 'मराठी रियासत उत्तर विभाग १' च्या प्रस्तावनेत म्हटले, 'छापील पुस्तकापलिकडे हस्तलिखित संग्रह तपासू लागल्यास एकटयाच्या हातून कामाचा पारच येणार नाही. मुंबई व कलकत्ता येथील दफ्तरखान्यात ढीग पडले आहेत.ते शोधण्यास अभ्यासकच कोणी नाहीत. याशिवाय खासगी संस्था व व्यक्ती यांजपाशीही बहुविध कागद पडलेले आहेत ते वेगळेच. सारांश, उत्तर मराठीशाहीच्या इतिहासास शिवकालाप्रमाणे कागदांच्या अभावाची अडचण नाही. येथे वाण एकनिष्ठ अभ्यासकांचीच आहे. काम करण्याची इच्छा असल्यास भरपूर साहित्याची सोय येथे आहे. विश्वविद्यालयातील उच्च अभ्यासकात उत्कृष्ट कामास येतील असे कालखंड व विषय या भागात पाहिजे तितके मिळू शकतील. अशा स्थितीत वरील साहित्याचा अभ्यास करणारे महाराष्ट्रीय विद्यार्थी एका हाताच्या बोटांनी मोजण्याइतकेसुद्धा पैदा होऊ नयेत ही केवढी शोचनीय गोष्ट आहे !'

१९१८ साली राजवाडे यांनी 'इतिहास आणि ऐतिहासिक' मासिकात संशोधनाची सद्यःस्थिती' नावाचा लेख लिहिला. परकी सरकार व परधार्जिणी विद्यापीठे ही इतिहास संशोधनाच्या कार्याला फारशी पोषक होत नाहीत. त्याला स्वदेशी सरकार व स्वदेशी विद्यापीठेच हवीत, असे सांगताना राजवाडे यांनी केलेली विधाने आजच्या संदर्भात महत्त्वाची आहेत. 'येथील सरकारचे ब्यूरोकारिक स्वरूप बदलून त्यांची लेजिस्लेटिव्ह व एक्झिक्यूटिव्ह रचना जेव्हा लोकाधीन होईल, तेव्हा मायेची माणसे अधिकारारूढ होऊन, आम्हा संशोधकाचे पांग फिटले तर फिटतील. मायेचे स्वदेशी सरकार जर पुढे मागे बनून आले तर ते इतिहास संशोधनाच्या कार्याला सढळ साहाय्य करील.

इतिहाससंशोधन किंवा इतर कोणतेही शास्त्र संशोधन घ्या, त्यांची जोपासना होण्यास देशात मायेचे व जिव्हाळ्याचे सरकार होण्याची आवश्यकता नितांत भासमान होती.' राजवाडे एवढे म्हणूनच थांबले नाहीत.मराठ्यांच्या इतिहासाच्या संशोधनाला मुंबई विद्यापीठापेक्षा पुणे विद्यापीठच उपकारक ठरेल असेही मत त्यांनी प्रदर्शित केले. 'मराठ्यांची मराठी युनिव्हर्सिटी पुण्यास निघेल तेव्हा ( महाराष्ट्रेतिहास-संशोधनाच्या सेमीनेअर्स काढण्याचा) हा बूट तेथे आला तर सिद्धीस नेता येईल. मराठ्यांच्या सर्व शाखीय इतिहासाचे शास्त्रीय अध्ययनांची चतुरस्त्र सोय व्हावी, हे एकच एक कारण, पुण्यास मराठी युनिव्हर्सिटी स्थापन करण्यास पुरेसे आहे.'

१९४७ साली देश स्वतंत्र झाला. राजवाड्यांच्या म्हणण्याप्रमाणे केवळ होम रूल म्हणजे वसाहतीचे स्वराज्यच नव्हे तर संपूर्ण स्वराज्य मिळाले व 'मायेचे व जिव्हाळ्याचे स्वदेशी सरकार' बनून आले.त्यांनी अपेक्षा केल्याप्रमाणे सशोधकांचे पांग फिटले काय ? १९४९ साली 'पुणे विद्यापीठ ' स्थापन झाले. ' मराठ्यांची मराठी युनिव्हर्सिटी पुण्यात निघावी ' हे राजवाड्यांचे स्वप्न प्रत्यक्षात आले. पण मराठ्यांच्या इतिहासाच्या, सर्व भारतीय इतिहासाच्या अध्ययनाची चतुरंग सोय पुण्यास विद्यापीठात व्हावी हे त्यांचे प्रयोजन कितपत सिद्धीस गेले ? राजवाड्यांसारख्या पुण्यात्म्यांचे भविष्य कितपत खरे ठरले ?

त्र्यं. शं. शेजवलकर हे ' पुणे विद्यापीठा ' त व ' डेक्कन कॉलेजा'त इतिहासाचे प्राध्यापक होते. ते १९५३ साली लिहितात, ' ज्ञानेश्वरीच्या तुकाराम-नामदेवांच्या अभंगाच्या आवृत्त्यांवर आवृत्त्या निघतात. पण इतिहासाचे पुस्तक दहा-दहा वर्षातही विकले जात नाही अशी स्थिती विद्यमान आहे. मराठ्यांच्या इतिहासाची तर महाराष्ट्राला एवढी उबग आलेली दिसते की, ' पुणे विद्यापीठ ' होऊनही महाराष्ट्रीय ब्राह्मणांची मुले त्यापेक्षा मुसलमानांचा वा इंग्रजी अमदानीचा इतिहास अभ्यासार्थ निवडतात. अखिल भारतीय नाट्यस्पर्धेत जी नाटके तेलंगणातून वा बंगाल्यातून येतात त्यात शिवाजीवर १६ व

संभाजीवरही २ नाटके दृष्टीस पडतात; पण मराठी भाषेतील नाटकात मात्र इतिहासाचे नाव नाही, ही स्थिती तेच दाखविते! काल्पनिक कादंबऱ्या व गोष्टी आणि तितकेच काल्पनिक तर्कटी वाद यांचा सध्या महाराष्ट्रात एवढा बोलबाला व चढता भाव आहे की तेथे अक्षराशिवाय न लिहिता येणारा इतिहास कसा रुचावा?' (निजाम-पेशवे संबंध पृ. ७१) १९६१ साली 'पानिपत'च्या अप्रकाशित 'प्रस्तावने'त शेजवलकरांनी म्हटले की, 'आपले पूर्वज घोक घोकून वेद म्हणजे मागची स्मृती ताजी ठेवीत होते.

'आज नूतन शिक्षणशास्त्रानुसार घोकणे हा त्याज्य प्रकार ठरला. सहजच कोणास काही लक्षात ठेवण्याची गरज उरली नाही. या पद्धतीचा पहिला दुष्परिणाम इतिहासविस्मृतीत निदर्शनास येतो. महाराष्ट्रात तर त्याने उच्चांक गाठलेला दिसतो. महाराष्ट्राचे ज्ञान-केन्द्र मानलेल्या पुणे शहरातील विद्यापीठात याच विषयाला सर्वात जास्त गळती लागलेली दृष्टोत्पत्तीस येते. आधी इतिहास वाचणा-रांची संख्या कमी, त्यात तो अभ्यासिणाऱ्यांची त्याहूनही अल्प, आणि त्यातही महाराष्ट्राच्या इतिहासावर बहुतेकांचा बहिष्कार. महा-राष्ट्रात आज असा काळ आला आहे की, इतिहासाचे पुस्तक प्रसिद्ध झाले तर त्यावर दोन ओळी लिहिणारा शोधून काढावा लागतो व त्याचे आर्जव करावे लागते. कोणी या कामाबद्दल द्रव्यही अपेक्षितात असे कानांवर आले आहे. जर माझ्याऐवजी गांधी किंवा नेहरू यांनी पानिपतचा इतिहास अभ्यासिला असता तर किती चांगले झाले असते बरे!' (शेजवलकर लेखसंग्रह पृ. १०४-१०७)

भावे किंवा शेजवलकर ह्यांच्यासारखे इतिहासकार सोडले, तरी श्री. के. क्षीरसागर यांच्यासारख्या इतिहासकाराचा पेशा नसलेल्या पण इतिहासाबद्दल आस्था बाळगणाऱ्या आणि मराठी जीवनातील व साहित्यांतील बदलत्या विचारप्रवाहांची डोळस समीक्षा करणाऱ्या विचारवंतांच्याही लक्षात चालू पिढीतील इतिहासाबद्दलची ही उद्वेग-जनक अरुची आल्याशिवाय राहिलेली नाही. १९६० च्या जानेवारीत इंदूरच्या शारदोत्सवात अध्यक्षीय भाषण करताना त्यांनीही आपली

व्यथा बोलून दाखविली आहे–

'आज आपण समाजापुढे कोणती ध्येये, कोणते चिंतन विषय ठेवीत आहोत, याचे एक साधे गमक सांगता येईल. आपल्या बृहन्महाराष्ट्रीय समाजातील परिस्थिती कदाचित् अन्यथा असेल, पण पुण्या-मुंबईच्या विद्यापीठांची हकीकत मात्र अशी आहे की, इतिहास या विषयाइतका अप्रिय असा दुसरा विषयच दाखवता येणार नाही! विद्यापीठाच्या इतिहास विभागाला आमच्या भागात आजकाल अशी चिंता पडली आहे की, कोणते ना कोणते आमिष दाखवून या विषयाकडे पदवीचे व पदवी घेतलेले विद्यार्थी आतापासूनच ओढले नाहीत तर उद्या विद्यार्थ्यांचीच नव्हे तर शिक्षकांचीही वाण पडून हा विषय विद्यापीठातून काढून टाकावा लागेल. आणि ही स्थिती कोणत्या कालखंडात? तर ज्यात नूतन स्थापित लोकराज्यामुळे राज्यशास्त्राला अभूतपूर्व महत्त्व आले आहे, त्या युगात! ज्या युगात मार्क्सप्रणीत 'ऐतिहासिक भौतिकवाद' हे एक विजिगीषू तत्त्वज्ञान गणले जाते त्या युगात! इतिहास विद्वेष ही नाविन्यपूजनाची दुसरी बाजू तर नसेल? पण ज्यांना नवी रचना करावयाची असेल, त्यांना तर नवा इतिहास सर्वात अधिक माहीत हवा! म्हणजेच राजकारणी लोकांना, सामाजिक पुढाऱ्यांना व वाङमयीन बंडखोरांना इतिहासाचे अध्ययन सारखेच आवश्यक वाटावयास हवे. आज राष्ट्रीय दृष्टीपेक्षा उथळ बंडखोरीला अधिक महत्त्व दिले जाते याचेच मी हे गमक समजतो.

'म्हणूनच, मोठ्या दुःखाने असे म्हणावेसे वाटते की, राजकीय दृष्ट्या आपल्यावरील परराज्य संपले असले तरी वैचारिक दृष्ट्या आपण परराज्यातच. कदाचित् अराजकातही आहोत. ज्यांनी स्वदेशाच्या इतिहासाचे परिशीलन आणि चिंतन केले नाही, ज्यांच्या जीवनात पोकळ बंडखोरीखेरीज कोणतीही करणात्मक निष्ठा निर्माण झाली नाही, तंत्राच्या दृष्टीने 'लेटेस्ट' आणि मंत्राच्या दृष्टीने जास्तीत जास्त भडक ग्रंथे हेच ज्यांचे गुरू, अशा लेखकांची छाप आजच्या पिढीच्या मनावर आहे. अशा पिढीत राष्ट्रवर्धक निष्ठा

निर्माण होणें शक्य आहे काय ?'

('वैचारिक स्वराज्य' 'साहित्याच्या दरबारात.')

काहीसा मोठा वाटला, तरी क्षीरसागरांच्या भाषणातील उतारा, मुद्याला धरून आहे, कारण सद्यःस्थितीतील इतिहासाच्या सार्वत्रिक उपेक्षेचे कारणपरंपरेवर त्यांनी त्यात नेमके बोट ठेवले आहे. त्यांच्या मते, राष्ट्रनिष्ठेचा अभाव, वैचारिक परराज्य, नावीन्यपूजनाचा अतिरेक ही कारणे इतिहास विद्वेषाच्या मुळाशी आहेत.

उपपत्ती काही असो, फलश्रुति एकच आहे. स्वराज्य आले. स्वदेशी सरकार आले, स्वदेशी विद्यापीठे आली. पण स्वदेशाच्या इतिहासाची अनास्था काही टळली नाही. राजवाड्यांचे मनोरथ काही पूर्ण झाले नाहीत.

१८९७ साली 'मराठ्यांच्या इतिहासाची साधने खंड पहिला' हा राजवाड्यांचा ग्रंथ प्रसिद्ध झाला. त्याचे स्वागत करताना 'ग्रंथमाला' मासिकात विजापूरकर यांनी लिहिले, की, 'राजवाडे यांनी प्रसिद्ध केलेल्या 'मराठ्यांच्या इतिहासाची साधने, भाग पहिला' ह्या पुस्तकातील प्रस्तावना पाहिली म्हणजे राजवाडे हे एक अमौलिक नररत्न आमच्यात निपजले आहे असे वाटल्याविना राहात नाही. पण दुर्दैव आमच्या देशाचे की, अत्यंत शारीरिक व मानसिक श्रम करून व पदरचे पैसे नसल्यामुळे कर्जबाजारी होऊन, लोकांपुढे वाढलेली अमृताची ताटे आमच्या लोकास नकोशी होतात व ग्रंथकाराच्या मनाची काळजी दूर होत नाही. फडक्यांच्या वाड्यात असलेला छापखाना जळाल्याने निम्मेअधिक छापलेले पुस्तक सर्व जळून गेल्याने ६०० रुपयांचा होम झाला. तितक्यात धीर धरून पुन: १२०० रुपये खर्चून वाईस पुस्तक छापून काढले. त्या पुस्तकांच्या नुसत्या प्रस्तावनेवरून १८०० रुपये एखादा भोज, विक्रम किंवा हर्ष ओवाळून टाकता, परंतु काळाच्या फेऱ्यात आर्यभूमी आल्याने हल्ली मराठी भाषेचा व विद्वानांचा वाली कोणी राहिला नाही. प्रसंग विशेषी औदार्यातिशयाने त्या पुण्यश्लोक राजांचा अंश आपल्यामध्ये आहे असे दाखविणारे राजे हल्ली आहेत, नाही असे नाही, परंतु त्यांच्यापर्यंत

अशा निःस्पृह व निष्कलंक ग्रंथकारांची दाद कोठून लागणार? हल्ली राजाश्रय कमी, लोकाश्रयही तितकाच, एकंदरीने भर्तृहरीच्या वचनांचीच आठवण होते. 'बोद्धारो मत्सरग्रस्ता: प्रभव: स्मयदूषित: । शनेधोपहत्वश्चान्मे जीर्णमंगे सुभाषितम् ॥' ज्यांना कळते त्यांना मत्सर बुद्धीने घेरले आहे. ते गुणी लोकांचा स्तव करावयाचे नाहीत, राजे व श्रीमान लोक आपल्याच तोऱ्यात असणार इतर लोक ज्ञानशून्य म्हणून त्यास कळत नाही. मिळून काय, चांगला ग्रंथ किंवा चांगले भाषण जिथल्या तिथे विरून जावयाचे.'

'असो. राजवाड्यांच्या लोकसेवेच्या अति झालेल्या हव्यासामुळे, त्याच्या सांपत्तिक स्थितीची थोडीबहुत शोचनीय माहिती असल्यामुळे, किंचित् विषयांतर झाले; ह्याचा उद्देश तीन रुपये टाकून मराठ्यांच्या इतिहासाची साधने' हे पुस्तक आपलेसे करून टाकण्याची बुद्धी व्हावी हाच आहे.'

विजापूरकरांनी हे शब्द लिहिले त्याला जवळ जवळ शंभर वर्षे होत आली त्यावेळी जिने राजवाड्यांची पाठ धरली, ती उपेक्षा एखाद्या पतिव्रतेप्रमाणे अजूनही त्यांना सोडीत नाही की, त्यांचे सर्वस्व असलेल्या इतिहासालाही सोडत नाही.

'मी स्वत: इंग्रजीत लिहीत नाही, हे आपल्याला माहीत आहे. प्रतिज्ञाच आहे–' असे न. चिं. केळकरांना राजवाड्यांनी लिहिले आहे. त्या प्रतिज्ञेशी प्रामाणिक राहून मराठी भाषेची व वाङ्मयाची तीस वर्षांत राजवाड्यांनी जी सेवा केली, तिचा विचार केला, म्हणजे राजवाड्यांसारखा निष्ठावंत सरस्वतीभक्त शतकात एकदाच होतो, असे म्हणणे भाग पडले. एवढे असून जिवंतपणी राजवाड्यांना मराठी साहित्य संमेलनाच्या अध्यक्षपदाचा, मराठी भाषकांच्या दृष्टीने असलेला सर्वोच्च बहुमान मिळू शकला नाही, आणि त्यांच्या मरणोत्तर त्यांनी प्राणपणाने पुरस्कारिलेल्या आणि काया वाचा मनाने आजन्म आचरिलेल्या 'स्वत्वा'च्या महामंत्राची विस्मृती झाली. १९७५ साली कऱ्हाड साहित्य संमेलनाच्या अध्यक्षपदावरून भाषण

करताना दुर्गा भागवत यांनी राजवाडे यांच्या या दुहेरी उपेक्षेवर नेमके बोट ठेवले. इतकेच नव्हे, तर त्यांनी आपल्या भाषणाचा प्रारंभच मुळी राजवाड्यांचे पुण्यस्मरण करून केला–

'आज आपणापुढं उभे राहताना माझं मन फार संकोचून गेलं आहे. ज्यांच्या लेखनातून मला खूप स्फूर्ती मिळाली, त्या इतिहासाचार्य राजवाड्यांचं स्मरण मला उत्कटपणे होतं आहे. इतिहास-संशोधन तर राहूद्याच, पण भाषा, व्याकरण आणि साहित्य यांची खोल जाण असणारा लेखक राजवाड्यांच्या काळी कुणीही नव्हता. अजूनही त्या कसाला उतरेल असं कुणी मला तरी दिसत नाही. त्या काळी राजवाड्यांना या संमेलनाचे अध्यक्षपद मिळालं नाही ही महाराष्ट्र सरस्वतीच्या इतिहासातली एकच बोलकी घटना आहे. महाराष्ट्र साहित्य संमेलनाच्या इतिहासातली ती फार मोठी हानी आहे असेच नव्हे, तर हा महाराष्ट्राच्या साहित्याभिरुचीला लागलेला कायमचा कलंकच आहे असं मला तर वाटतंच, पण कुणाही अभ्यासू साहित्य प्रेमिकाला तसंच वाटेल अशी माझी खात्री आहे.

'मडळी, मी बोलते आहे ते दोषदिग्दर्शन म्हणून नव्हे, तर खरोखर पोटात ढवळतं म्हणून सांगते आहे. राजवाड्यांचे महाराष्ट्रावर अपार ऋण आहे. त्यांची चोखंदळ दृष्टी नि निःस्पृह वृत्ती मला नेहमीच प्रेरक ठरली आहे, राजवाड्यांचं स्मरण करताना 'चारित्र्ये तुझिया तुझ्या सम जगा लाभोत संशोधक ' असं एक मुकुंदराय कवी यांनी त्यांना उद्देशून जे उद्‌गार काढले आहेत, ते म्हटल्याशिवाय माझ्याने राहवत नाही. राजवाड्यांचं स्मरण एवढ्यासाठी मी प्रामुख्याने करते की, राजवाडेच काय ते ग्रंथांचं कार्य निःसंदिग्धपणे सांगून गेले. एकाच वाक्यात त्यांनी सांगितलं की, 'ग्रंथसमूह हे समाजसुख आहे.' सूत्रासारखंच हे वाक्य आहे. सूत्राइतकंच विश्वव्यापकही आहे.

'राजवाड्यांनी आपल्या काळातल्या ज्ञानाच्या क्षेत्रातल्या परिस्थितीचा सूक्ष्म विचार केला होता. पारतंत्र्याच्या त्या काळी त्यांनी विचारवंताला कर्तव्याची जाणीव दिली. स्वत्वाची ओळख करून

दिली. किंबहुना स्वत्व नसेल तर तेजच नाही ही जाण त्यांनी समाजाला नव्याने करून द्यायचा प्रयत्न केला. होय, तोही प्रयत्नच, कारण जे हे त्यांचे बोल कुठल्याही काळी विचारवंतांच्या उपयोगी पडावेत, त्यांचंच नेमकं विस्मरण आम्हांला पडलेलं आहे. तेव्हा त्यांचे अतुल समर्थ बोल आपल्यापुढे मी सादर करते–

'हा कोंबट प्रकार महाराष्ट्रातील दमल्या भागल्या उच्च लोकांचा व उदार मनाच्या सरकाराचा झाला. परंतु सरकाराच्या मानभावी कळकळीवर भिस्त न ठेविता, व महाराष्ट्रातील उच्च मंडळींच्या पूर्ववयातील अनास्थेकडे दुर्लक्ष न करिता, आपल्याला आपले कर्तव्य यथाशक्ति बजावले पाहिजे. त्यांच्या हलगर्जीपणाने आपण हेळसांड केली तर पुढील पिढीचे अभिशाप आपल्याला घ्यावे लागतील आणि आपल्या कर्तव्यशून्यतेबद्दल व मनाच्या दुबळेपणाबद्दल मृत झालो की, आपला विशेष बोज न राहता परलोकी आपल्याला झाडा द्यावा लागेल. दुनिया आबादी आबाद असतानाही मनुष्याला आपल्या कर्तव्याला जपावे लागते. मग सर्व बाजूने कालचक्र फिरले असता, राष्ट्रातले एकूणएक लोक देशोधडीला लागले असता, उलटचा काळजाच्या शत्रूने सर्वतोपरी नागविले असता, मतलबी लोकांच्या गोड बोलण्याला उच्च मंडळी भुलून गेली असता, परकीय मंडळींनी सुचविलेल्या अश्रुतपूर्व विषयांची निष्फळ वाटावाट करण्यात सर्व लोक गुंग होऊन गेले असता, निष्काम बुद्धीने व एकतानतेने कर्तव्य बजाविण्याची आवश्यकता विशेषच असते हे निर्विवाद आहे. अशा वेळी लहान–सहान संकटांना भिऊन जाऊन किंवा जुजबी व अल्पकालीन फायद्याकडे नजर देऊन, जो मनुष्य कर्तव्याला विसरेल त्याने आत्मघात केला एवढेच नव्हे तर देशघात केला असेही होईल.

' ह्यावर कोणी असा प्रश्न विचारील की, हे असे खडतर कर्तव्य तरी कोणते ? तर ते स्वत्वरक्षण होय असे आम्ही उत्तर करतो. हे स्वत्व म्हणजे काय ? तर ते फार मिश्रस्वरूपी आहे. त्यात देशाचा, भाषेचा, धर्माचा, आचाराचा, विचाराचा, विकाराचा, गोत्राचा, हवेचा, पूर्ववृत्ताचा, सुधारणेचा व खोडींचा अंतर्भाव होतो. ह्या सर्व

गोष्टी हजारो वर्षांच्या अनुभवांचे फल होत–'

' मंडळी, राजवाड्यांचा संदेश आपल्यापर्यंत पोचवण्यात मला जो आनंद वाटतो आहे, तो कसा, सांगावा ? राजवाडे ज्याला ' स्वत्व ' म्हणतात त्याला आज ' अस्मिता ' म्हणतात.

ऐंशी वर्षांपूर्वी राजवाड्यांनी मांडलेले विचार आजही ताजे वाटतात, याचं कारण समाजप्रवाहांची ओळख त्यांना स्वतःच्या अनुभवांनीच झाली होती. '

१९२३ च्या मे महिन्यात पुण्याच्या ' चित्रमय जगत ' मध्ये राजवाड्यांचा भारतीम विवाह संस्थेचा इतिहास या लेखमालेतील पहिला लेख प्रसिद्ध झाला आणि त्याबरोबर मधाच्या मोहोळावर दगड मारावा त्याप्रमाणे महाराष्ट्रातील सामान्य आणि असामान्य वाचकांत संतापाची एकच लाट उसळली. त्यांनी ' चित्रमय जगत ' चे संपादक वासुकाका जोशी यांना पत्राने व समक्ष धमकी दिली, की पुढचे लेख प्रसिद्ध कराल तर आम्ही तुमचा छापखाना जाळू. या लोकक्षोभाच्या रौद्रारूपामुळे वासुकाकांनी अर्थातच पुढचे लेख छापण्याचा बेत तहकूब केला. त्यामुळे राजवाड्यांची ही लेखमाला मुळातच गाभटली गेल्यातच जमा होती. अशा स्थितीत राजवाड्यांना पुण्याच्या त्यांच्या मुक्कामी एक चिठ्ठी आली. 'मी हा इतिहास ग्रंथ छापण्यास तयार आहे.' चिठ्ठी त्यावेळी कम्युनिझमची चळवळ करणाऱ्या कॉ. श्रीपाद अमृत डांगे यांची होती. ते मुंबईला त्यावेळी ' सोशॅलिस्ट ' हे मासिक चालवीत होते. राजवाड्यांची लेखमाला बंद पडल्याची बातमी त्यांना समजली. तेव्हा तो ग्रंथ छापावा असे ठरवून ते राजवाड्यांना भेटायला पुण्याला गेले. ते घरी नव्हते. तेव्हा त्यांनी ही चिठ्ठी लिहून ठेवली आणि मुंबईच्या खेतवाडी येथील प्रेसचा पत्ता दिला होता.

एके दिवशी डांगे आपल्या प्रेसमध्ये काम करीत होते. राजवाड्यांच्या पहिल्या लेखाचे ते इंग्रजी भाषांतर करीत होते. त्याची प्रुफे त्यांच्यासमोर होती व त्यांच्या पहिल्या लेखाचा मराठीत छापलेला

सोळा पानी फॉर्मही टेबलावर पडलेला होता. एवढ्यात धिपाड, शुभ्र वेष धारण केलेले, आणि प्राचीन ऋषीप्रमाणे, ज्वलन्निव ब्रह्ममयेन तेजस असे ब्रह्मवर्चसांच्या प्रभेने झळकणारे दोघे पुरुष त्यांच्या पुढे उभे राहिले. एक होते अहिताग्नी राजवाडे व दुसरे होते इतिहासाचार्य राजवाडे. खेतवाडीची जागा बदलून ठाकुरद्वारला 'इंदुप्रकाश' च्या आगारात डांग्यांनी आपला प्रेस त्यावेळी आणला होता. त्याचा शोध करीत हे दोघे राजवाडे आले होते. खोलीत खुर्च्या होत्या. पण त्यांची दखलही न घेता राजवाड्यांनी आल्याबरोबर उभ्या उभ्याच डांग्यांना म्हटले, 'तुमची चिठ्ठी मिळाली. तुम्ही हा ग्रंथ छापू इच्छिता असे म्हटले होते म्हणून नीट चौकशी करण्यासाठी आलो आहे. तेव्हा डांगे उभे राहिले व राजवाड्यांना मराठीतला फॉर्म दाखवून या ग्रंथांचे इंग्रजी भाषांतर करून छापण्याचा माझा विचार आहे असे सांगून 'सोशॅलिस्ट' मासिकातील त्या लेखाच्या पानांची गॅली प्रुफे त्यांच्यापुढे त्यांनी धरली. राजवाड्यांची 'दुर्वास' म्हणून असलेली ख्याति डांगे यांच्याही कानावरून गेली होती त्यामुळे राजवाड्यांशी हे सारे बोलणे ते भीतभीतच करीत होते. डांगे यांचे हे बोलणे ऐकून राजवाडे म्हणाले, 'तुम्ही बरेच धाडसी दिसता. हा ग्रंथ छापलात तर कर्मठ मंडळी तुमचा छापखाना जाळतील. पण तुमचा निश्चय असल्यास मी एक तोड सुचवितो. मी हा ग्रंथ अद्याप पूर्ण लिहिलेला नाही. तेव्हा मी त्याचे क्रमशः सोळा पानाचा फॉर्म होईल असे एक एक प्रकरण तुमचेकडे पाठवीन. तो फॉर्म छापून तुम्ही मला पाठवा म्हणजे मी पुढचा भाग तुम्हाला पाठवीन. तुमच्याकडून छापील फॉर्म आला नाही,तर मी समजेन की, हा ग्रंथ तुम्हालाही झेपत नाही किंवा हा व्याप करता करता तुमचे दिवाळे निघाले आहे. हे समजून मी पुढचे प्रकरण लिहिणारही नाही आणि पाठवणारही नाही. ही योजना तुम्हाला पसंत आहे का ?' डांगे म्हणाले, 'काहीही झाले तरी हा ग्रंथ छापण्याचा मी निश्चय केला आहे.' हे ऐकून राजवाडे प्रेसकडे न्याहाळून पाहू लागले व म्हणाले, 'या ग्रंथापासून तुम्हाला लाभ होणार नाही. तुम्हाला दिवाळ्याची धास्ती वाटत नाही ?'

यावर 'नाही' असे डांगे म्हणाले, व पुढे म्हणाले, 'या ग्रंथाच्या पहिल्याच प्रकरणात माझ्या मार्क्सप्रणीत इतिहासशास्त्राला बळकटी आणण्यासारखा मसाला मला हिंदुस्थानच्या इतिहासातून तुम्ही दाखवला व पुढेही तो तसाच मिळेल म्हणून मी हा खटाटोप करीत आहे.' तेव्हा राजवाडे म्हणाले, 'अस्सं! म्हणजे तुम्ही हे तुमच्या शास्त्रासाठी करणार आहात असे दिसते. म्हणूनच एखाद्या व्यापाऱ्या-सारखी तुम्हाला दिवाळख्यांची भीती वाटत नाही.'

पण राजवाडे यांचा हा क्रांतिकारक ग्रंथ पूर्ण होण्याचाही योग नव्हता. आणि प्रसिद्ध होण्याचाही योग नव्हता. त्यात दोष राज-वाड्यांचाही नव्हता आणि डांग्यांचाही नव्हता. राजवाडे हे दिल्या शब्दाला पूर्णपणे जागले. डांगे जेव्हा एक फॉर्म छापून त्यांना पाठवीत तेव्हाच ते दुसरा लिहीत. पण चौथ्या प्रकरणाचा भाग छापण्यापूर्वीच मार्च १९२४ मध्ये डांगे कैदेत गेले. त्यांच्या सहकाऱ्याकडून राज-वाड्यांना त्या प्रकरणाची छापील प्रत मिळाली नाही त्यामुळे त्यांनी पुढचे भाग लिहिण्याचे सोडून दिले. १९२७ साली डांगे सुटून आले. तोपर्यंत राजवाडे दिवंगत झाले होते. उरलेल्या ग्रंथाची त्यांच्या जीविताच्या ग्रंथाबरोबरच समाप्ती झाली होती.

त्या प्रसंगाला बावन्न वर्षे होऊन गेली. १९७६ च्या ३१ डिसेंबरला 'भारतीय विवाहसंस्थेचा इतिहास' या ग्रंथाची राजवाड्यांनी लिहिलेली चार प्रकरणे आणि 'विकार विचार प्रदर्शनच्या साधनांची उत्क्रांति' हा राजवाड्यांचा अप्रतिम निबंध 'लोकवाङ्मय गृह' या मुंबईच्या प्रकाशन संस्थेने कॉ. डांगे यांच्या प्रेरणेने प्रसिद्ध केला. त्याला डांगे यांनी बत्तीस पृष्ठांची प्रदीर्घ प्रस्तावना लिहिलेली आहे.

राजवाडे काही कम्युनिस्ट नव्हेत. मार्क्स त्यांच्या वाचनात आलेला नव्हता. कॉम्प्ट आणि हेगेल याच पाश्चात्य तत्त्ववेत्त्यांचा उल्लेख त्यांनी त्यांच्या साहित्यात केलेला आहे. तरीसुद्धा त्यांच्या पूर्वग्रहां-पासून सर्वस्वी निरपेक्ष असलेल्या शुद्ध शास्त्रीय दृष्टिकोनाची आणि ऐतिहासिक विचारसरणीची झेप इतकी व्यापक होती, की, काही मतभेद व मर्यादा वगळता मार्क्सच्या विचारसरणीशी व इतिहास-

मंडळींशी त्यांचे आश्चर्यकारक साम्य आढळले. डांगे यांच्यासारख्या भिन्न विचारसरणीच्या विचारवंतालासुद्धा राजवाडे यांच्या प्रतिभेचे आवाहन पोचते त्याचे बीज हे असे आहे. आपल्या प्रस्तावनेत डांगे यांनी 'भारतीय विवाहसंस्थेचा इतिहास,' 'हिंदु समाजात हिंद्वेतरांचा समावेश,' 'आमची पुराणे व असीरियातील शोध,' 'राधामाधव विलासचंपू' च्या प्रस्तावनेतील वर्ण आणि जाती यांच्या उत्पत्तीची मीमांसा, याविषयी राजवाड्यांच्या व्यक्त झालेल्या शास्त्रीय दृष्टिकोणाचा परामर्श घेतलेला आहे आणि एवढ्या मूलगामी व स्वतंत्र-प्रज्ञ विचारवंताची स्वतंत्र भारतातही उपेक्षा होत असल्याबद्दल खंत व्यक्त केली आहे.

प्रस्तावनेच्या प्रारंभीच डांगे यांनी राजवाडे यांच्याशी असलेले आपले मतभेद स्पष्ट केले आहेत, 'माझा स्वतःचाही मार्क्सवादी भूमिकेवरून त्यांच्याशी सैद्धान्तिक मतभेद आहे हे खरे. तरी पण इतिहास आध्यात्मिक द्वंद्वविरोधानुसार मांडावा किंवा विशिष्ट इतिहासजनित भौतिक द्वंद्वातून मांडावा या बाबतीतील मुख्य शास्त्राबद्दलचे मतभेद सोडले तर राजवाडे यांच्या पद्धतीने व त्यांची सामग्री घेऊनच इतिहास लिहावा लागेल असे माझे मत आहे. हिंदुस्थानविषयक इतिहासाची मार्क्सवादी शास्त्रशुद्ध मांडणी करणाऱ्याला तर राजवाडेकृत लिखाणाचा भरपूर आधार घेतल्याशिवाय पर्याय नाही. राजवाडे यांना आयुष्य लाभले असते तर मार्क्सवादाचा ऐतिहासिक भौतिकवादाचा सिद्धांत त्यांनी मान्य केला असता असे डांगे यांना वाटले. असे वाटण्याचे कारण म्हणजे राजवाड्यांची शुद्ध ऐतिहासिक दृष्टी होय. हिंदु 'धर्म' या नात्याने त्यांच्या विचारसरणोस कुठेच स्थान नव्हते. धर्मभावनेबद्दल त्यांची ऐतिहासिक वृत्ती काय होती याचे उत्तम उदाहरण म्हणजे त्यांचा 'विकार आणि विचार प्रदर्शनाच्या साधनाची उत्क्रांती' हा लेख होय. या लेखाबद्दल डांगे म्हणतात, सध्या आपली घटना व समाजधारणा सेक्युलर म्हणजे धर्मनिरपेक्ष आहे असे जाहीर झाले आहे. पण हा केवळ जाहीरनामा आहे. सत्यनामा नाही. तो सत्य करावयाचा असेल तर सर्व शाळा–कॉलेजातून, विशेषतः सर्व

मंत्रिमंडळे, विद्वान शिक्षक व नोकरवर्ग यांना या लेखाचे वाचन व मनन सक्तीचे करावे असे मला वाटते... या लेखाची बौद्धिक व शास्त्रीय झेप आमच्या अनेक विद्वानांना झेपायचीसुद्धा नाही.

व्याकरण, शब्द, वाक्यप्रक्रिया, व्युत्पत्ती यातून समाजशास्त्राचा इतिहास दाखविण्याची राजवाड्यांची दृष्टी अत्यंत सखोल आणि विशाल होती. या त्यांच्या दृष्टीचे वर्णन डांगे यांनी ' इतिहासदृष्टीची गरूडझेप ' या मार्मिक शब्दांनी केले आहे. ते म्हणतात, पाणिनीच्या व्याकरणाचीही फोड अथवा विवरण करताना त्यांना विकासक्षम समाज व विकासबद्धतेच्या पायऱ्यापायऱ्याने परिवर्तित होणारा माणूस दिसत असे. त्यांच्या सगळ्या कार्याचे ध्येय व केन्द्रबिंदु माणूस हा असे. त्यांचे यमनसंबंधित धनसंपादन, समाजविभाजन, व्यक्ती, कुटुंब, व समूहसंबंधाचे शास्त्रशुद्ध वाचन करणे याचेच त्यांना वेड असे. ' संस्कृत भाषेचा उलगडा ' या ग्रंथात पाणिनीला पूर्वसमाजाच्या मिश्रणाचे व समन्वयाच्या घटनेचे ज्ञान पाहिजे तितके नव्हते असे राजवाडे यांनी म्हटले आहे व समाजशास्त्राचा वापर शास्त्रशुद्ध रीतीने करून व्याकरणशास्त्रातील गूढ जे पाणिनीला उकलले नाही ते राजवाडे यांनी उकलले आहे. ' इतिहासदृष्टीच्या अभावापासून समाजाचे केवढे घोर नुकसान होते त्याचे पाणिनीय सूत्रे हे नामांकित उदाहरण आहे, असे ते म्हणतात. राजवाडे यांच्या या व्याकरणातील ऐतिहासिक दृष्टीबद्दल डांगे म्हणतात,

' व्याकरणशास्त्राची व इतिहासशास्त्राची जी फोड त्यांनी केली त्याची महती अद्याप आपल्या इतिहासकारांना, भाषाशास्त्रज्ञांना व समाजसुधारकांना अवगत झालेली दिसत नाही. व्याकरणातून समाजाचा विकास अथवा ऱ्हास पाहणे मोठे अवघड काम आहे. त्यासाठी राजवाडे दृष्टीच लागते. '

आपल्या प्रस्तावनेत डांगे यांनी राजवाड्यांच्या ' मराठी धातुकोशाचाही परामर्श घेतला आहे. ' बोद्धारोमत्सरग्रस्तः ।' या न्यायाने राजवाडे यांच्या समकालीनांनी असूयेने, दुरभिमानाने आणि मत्सराने राजवाड्यांच्या या अपूर्व कृतीला मुळातच गारद करण्याचा कसा

प्रयत्न केला याचे वर्णन करताना डांगे म्हणतात,

'त्यांच्या मरणोत्तर त्यांनी रचलेल्या मराठी धातुकोशाला मारण्याचा जो काही लोकांनी प्रयत्न केला त्याची आठवण ठेवणे जरूर आहे. पाणिनीने वाटल्यास संस्कृतचा धातुपाठ लिहावा. ज्ञानकोशाची रचना करताना डॉ. केतकरांच्या व त्यांच्या सहायकांच्या नाकीनव आले व शेवटी ते दारिद्र्यात मेले. असे असताना स्वतःच्या एकट्याच्या मेहेनतीवर मराठी धातुपाठ करणारा हा प्रतिपाणिनी कोण अशीही मत्सरग्रस्त पृच्छा झाली. विशेष म्हणजे पाणिनीच्या धातुपाठाची संख्या दोन हजारापर्यंत आहे तर राजवाडेच्या मराठी धातुपाठाची संख्या जवळ जवळ सोळा हजार भरली. कोणतीही कमिटी न भरता किंवा सरकार दरबारीच्या देणग्या न मिळता या फाटक्या मनुष्याने एकट्याच्या विद्वत्तेवर एवढा मोठा मराठी धातुपाठ करणे शक्यच नाही. व केलाच असला तर तो रद्दीमय असावा हे नक्कीच, तेव्हा तो टाकून द्यावा अशीहि काही विद्वानात बोलवा झाली होती. पण अखेर 'In Gods uvniverse, no good fork is ever lost' हे जदुनाथ सरकाराचे वाक्य खरे ठरले आणि कृष्ण कुलकर्ण्यांच्या संपादकत्वाखाली धुळ्याच्या राजवाडे संशोधन मंडळाने राजवाड्याचा धातुपाठ प्रसिद्ध केला पण ही 'ऐतिहासिक अभिनंदनीय' गोष्ट घडली असली तरी डांगे यांच्या मताप्रमाणे हे काम अद्याप संपूर्ण झालेले नाही. आता हे काम कोणते भाशाशास्त्रज्ञ अंगावर घेतील ते पाहायाचे. फडतूस ग्रंथासाठी लाखोंची अनुदाने देणाऱ्या आमच्या सरकारला या ग्रंथाची महती काय हे समजायला किती वर्षे जातील किंवा स्थित्यंतरे होतील कुणास ठाऊक !'

उभ्या आयुष्यात राजवाड्यांना स्वस्थता म्हणून कसली लाभली नाही. दारिद्र्य, उपेक्षा, पायपीट, कष्ट अशी प्रतिकूल परिस्थिती त्यांच्या मागे हात धुऊन लागली होती त्यामुळे स्वभावतच मूळ आणि स्वतंत्र असलेली राजवाड्यांची प्रतिभा शक्य असूनही मार्क्सवादापर्यंत पोचू शकली नाही. राजवाड्याची ही डांगे यांच्या मताप्रमाणे शोकांतिका आहे, आणि ती केवळ वैयक्तिक नसून राष्ट्रीय स्वरूपाची

आहे. 'राजवाड्यांचा वैचारिक, तात्त्विक पुनर्जन्म होणे शक्य होते, पण ते अशक्य झाले. या विलक्षण बुद्धिमंताची झेप मार्क्सएंगल्स किंवा रशियन क्रांतीपर्यंत पोहचली नाही, हे आपल्या इतिहासशास्त्राचे व विचारसाधनांच्या हिमालयाचे एक एवरेस्टचे शिखरच अज्ञातात दडून पडले असे वाटते, हे पाहून मनाला खिन्नता येते. भाषाशास्त्राची, संस्कृत भाषेच्या ज्ञानाची, इतिहासशास्त्र संभाराची उकल करणारी हिंदुस्थानातली एक 'जीनियस' च आपल्या जनतेने अकाली घालविली.'

कम्युनिस्टांच्या दृष्टिकोनांतून राजवाडे हे असे आहेत. पण या प्रस्तवनेत एका ठिकाणी सूर्यफूलाप्रमाणे प्रकाशाच्या दिशेने अखंड विकास पावणाऱ्या राजवाडे यांच्या ज्योतिस्वरूप प्रतिभेचे जे अत्यंत मार्मिक वर्णन डांगे यांनी केले आहे, त्याच्याशी कम्युनिस्टांप्रमाणे कम्युनिस्ट नसणारेही सहमत होतील. यात शंका नाही.

'अशा या मराठी धातुपाठाची रचना करणाऱ्या आचार्यांची महती वर्णन करावी तितकी थोडीच ! राजवाडे यांचा स्वभाव, चरित्र, विद्वत्ता, विचारपद्धति, यांचे वर्णन करायचे तर धातूंना जे सूत्र लावले आहे. तेच त्यांना लावावे लागेल. सतत पुरोगामी गतिमानता हाच त्यात स्थायीभाव होता.

'आपले हे शारदा मंडळ आहे आणि शारदेची उपासना मी गद्यात किंवा पद्यात कधीच केलेली मला स्मरत नाही. माझा सारा जन्म जुनाट रद्दी विस्कटण्यात गेला.' असे उद्गार, उपहासाने म्हणत की परिहासाने म्हणत की परमार्थाने म्हणत, राजवाडे यांनी शारदोपासक संमेलनाच्या अध्यक्षपदावरून भाषण करताना काढले होते. त्यांचे उद्गार म्हटले तर खरे होते व म्हटले तर खोटे होते. खरे अशासाठी की जुनी पुराणी ऐतिहासिक दप्तरे आणि इतिहासचर्चा यांचा व नाटक, कादंबऱ्यांसारख्या ललितरम्य दिव्याचा तसा बादरायणसुद्धा संबंध असणे मुश्किल होते. आणि खोटं अशासाठी होते की, 'सहृदयतेचे मूर्तिमंत पुतळे' म्हणून ज्या कादंबरीकाराचे

वर्णन राजवाडे यांनी केले, त्या कादंबरीकाराप्रमाणेच राजवाडेही सहृदयतेचे मूर्तिमंत पुतळे होते, म्हणून, शेकडो वर्षांपूर्वीच्या त्या जुनाट रद्दी फाटक्या कागदपत्रातून त्यांचे मेलेले पूर्वज जिवंत झालेले त्यांना दिसू शकत होते. पण त्याहीपेक्षा विशेष म्हणजे 'My lady protests too much' या न्यायाने कादंबरीचा निषेध करणाऱ्या राजवाड्यांचे इंग्लिश, फ्रेंच, रशियन या पाश्चात्य आणि आपल्याकडच्या समकालीन कादंबऱ्यांचे वाचन किती मूलग्राही, डोळस व सूक्ष्म होते यांची साक्ष देण्यास त्यांचा 'कादंबरी' हा अत्यंत नामांकित निबंध समर्थ आहे. पण नाटकाबद्दल मात्र असे म्हणता येईल असे वाटत नाही. त्यांच्या काही प्रचलित असलेल्या नट, नाटके व नाटककार यांच्याबद्दलच्या विपरीत पूर्वग्रहाच्या आहारी राजवाडेही गेले असावेत, आणि तसे नसले तर त्यांच्या उग्र आणि विश्वप्रकृतीला राष्ट्रीय पुनरुत्थानाच्या दृष्टीने गायन व नाटक ही प्रजेला अफूच्या गोळीसारखी वाटत होती यात शंका नाही. कारण बडोद्यात काय सुधारणा कराव्यात याबद्दल मतप्रदर्शन करताना ते म्हणतात, 'तुडकी गाणी व फिरती वाद्ये वाजविण्यास किंवा भिकार नाटके पहाण्यास जेथील प्रजेला मुबलक वेळ आहे तेथील प्रजा खुळी, परतंत्र, जनानी व झिंगलेली आहे असे खुशाल समजावे. तेव्हा गायनशाळा, नाटक कंपन्या व वाद्ये यांचा संस्थानात बीमोड करणे येत्या पन्नास वर्षे अत्यंत अगत्याचे आहे.'

पण काही अंशी कादंबरी आणि नाटक, गायन यांच्या सारख्या ललितकलांशी सर्वांशी औरंगजेबाप्रमाणे उभा दावा मांडलेल्या या माणसाच्या जीवनात, त्यांचा उग्र स्वभाव, त्यांची घोर तपस्या, त्यांची दुर्दम्य इच्छाशक्ति, त्यांचे उदात्त दारिद्र्य, त्यांचा त्रिभुवनाला तुच्छ लेखणारा निःस्पृह बाणा, त्यांचा प्रखर स्वाभिमान, त्यांचे बेसुमार व बेदरकार बोलणे आणि चालणे, त्यांची अगाध विद्वत्ता आणि त्यांचा शहाण्यांना वेडे करणारा विक्षिप्तपणा, त्यांच्या वृत्तीतील विरोधाभास, खोडी आणि गंमती, यांच्यामुळे, नाट्य इतके खेचून भरले होते, की नाटकांना नाकारणाऱ्या या माणसावर

नाटकही झाले, आणि कादंबऱ्यांचा तथाकथित निषेध करणाऱ्या या माणसावर कादंबरीही झाली. त्यांच्या जिवंतपणीच डॉ. केतकरांनी वैजनाथशास्त्रींच्या रूपाने आपल्या 'गोंडवनाच्या प्रियंवदे'त त्यांना अमर केले होते. पण त्यांच्या मृत्यूनंतर पन्नास वर्षांनी वसंत कानेटकर यांनी 'विषवृक्षाची छाया' या नाटकात' चिंतो बापूजींच्या रूपाने राजवाड्यांची व्यक्तिरेखा पुन्हा सजीव केली. आता नाटक काय किंवा कादंबरी काय, हरिभाऊ आपटे यांनी 'वज्राघाता'च्या प्रस्तावनेत म्हटल्याप्रमाणे, 'सत्य नसून सत्याभास असतो' आणि म्हणूनच ते छायाचित्राप्रमाणे यथार्थ दर्शन नसून नवनिर्माण असते. या एका चिंतो बापूजीच्या व्यक्तिरेखेत, 'दहा वर्षांत मी एकही संशोधन लावू शकलो नाही. त्याअर्थी माझे श्रम मातीमोल झाले आहे.' असे म्हणणारे राजवाडे, सतरंजीच्या दशा काढून त्याच्या वाती जाळणारे वासुदेवशास्त्री खरे आणि पानशेतच्या पुरात अमृतेश्वराच्या देवळातील स्थळकोशाचे हस्तलिखित गेले असता परत लिहिणारे सिद्धेश्वरशास्त्री चित्राव या तिघा सरस्वती सेवकांच्या व्यक्तिरेखांचे मिश्रण झाले आहे. सुशिलाबाई, तारा, राजाराम, बुवासाहेब ही पात्रे काल्पनिक असली तरी चिंतो बापूजींच्या स्वभावाला उठाव देण्यासाठीच निर्मिली आहेत. या सत्य आणि कल्पिताच्या मिश्रणातून स्वतःचे काव्य आस्वादणाऱ्या आणि तत्त्वज्ञान शोधणाऱ्या व त्यासाठी सर्वस्व समर्पण करणाऱ्या राजवाड्यांची प्रतिमा उभी करण्यात कानेटकर यशस्वी झालेले आहेत. इतिहास संशोधनाचे वेड हा विषवृक्ष आहे. 'तो एखादाच विषवृक्ष जेथे रुजेल तेवढा माणूस फार तर या उग्र दैवताचा बळी समजावा. त्याचे घरदार उध्वस्त झाल्यानं कोणाचं काही फारसं बिघडत नाही. समाजाला फक्त छायाच मिळते.' चिंतो बापूजींच्या मुखाने नाटकांच्या शीर्षकांचे कानेटकरांनी दिलेले हे स्पष्टीकरण वाचले म्हणजे राजवाड्यांच्या एका विधानाची आठवण होते. ऐतिहासिक दप्तरातील पत्रांना राजवाडे कधी कधी थट्टेने भिकेच्या चाळण्या असे म्हणत असत. भिकेला लागलेला आपला देश पुन्हा पूर्वीसारखा श्रीमंत व्हावा

म्हणून या माणसाने 'करो सब निछावर बनो सब फकिर' या विवेकानंदांच्या वचनाप्रमाणे, जन्मभर या 'भिकेच्या चाळण्या' ची सोबत पत्करली. राजवाडयाची समर्पणशीलता ती हीच होय.

परंतु, जगाला ललामभूत झालेल्या कोहिनूर हिऱ्यासारखं राजवाडयांचे व्यक्तिमत्त्व आहे. जितके त्याला अधिक पैलू पाडावे तितक्या त्याच्या कळा आणि शलाका अधिक झळकतात. राजवाडयांच्या समर्पणशीलतेइतकाच, आज मनुष्यत्व आणि पशुता यांच्या संघर्षात दुभंगलेल्या आणि आत्मसंहाराच्या उंबरठयावर उभ्या असलेल्या, केवळ भारतीयच नव्हे तर मनुष्यजातीच्याही प्रबोधनाच्या संदर्भात, कानेटकरांना राजवाडयांचा मौलिक वाटणारा विचार म्हणजे मंडळीकरणाचा होय. २० मे १९८६ रोजी महाराष्ट्र साहित्य परिषदेच्या विभागीय साहित्य संमेलनात पुणे येथे अध्यक्षपदावरून बोलताना कानेटकर म्हणाले, 'श्रेष्ठ साहित्यकार हे सहृदय नीतीचे जसे शिल्पकार असतात तसेच असल्या सुंदर शहाण्या स्वप्नांचे निर्मातेही असतात. पारतंत्र्याच्या तमोयुगात भारतीय समाजाला घडविण्यासाठी आयुष्ये भिरकावणाऱ्या एकोणिसाव्या शतकातील धुरिणांच्या जवळ दुसरी कोणती शक्ती होती ? अशाच काळात इतिहासाचार्य राजवाडयांनी एक महत्त्वाचा संदेश दिला आणि तो प्रत्यक्ष कृतीत आणला त्याचे मला या क्षणी स्मरण होते. ते म्हणत, समाजाची ही शिळावस्था नाहीशी व्हावी एवढयासाठी उभ्या समाजाचे 'मंडळीकरण' झाले पाहिजे. मंडळीकरण म्हणजे निरनिराळया क्षेत्रात विचारमंथन करणाऱ्या माणसांच्या छोटया–मोठया संस्था निर्माण झाल्या पाहिजेत वारंवार निमित्ते शोधून माणसांनी एकत्र आले पाहिजे व समाजाच्या ऊर्जितावस्थेबद्दल सतत एकमेकात संवाद साधला पाहिजे. एवढया एकाच हेतूने त्या उग्रप्रकृती थोर महात्म्याने इतिहाससंशोधक मंडळापासून ते रेल्वे पॅसेंजर्स असोसिएशनपर्यन्त सुमारे पाऊणशे संस्था आपल्या हयातीत स्थापन केल्या होत्या. साहित्यासह विविध क्षेत्रातली संमेलने हासुद्धा त्या मंडळीकरणाचाच एक प्रपंच आहे. भारतीय

समाजाला आज पुन्हा एकदा पेशवाईच्या अखेर आली होती तशीच 'शिळावस्था' आली आहे ही गोष्ट आहे. पशुत्वावर मनुष्यत्वाची मात ही काही दैवी चमत्काराने साध्य होणारी घटना नाही. त्यासाठी माणसातल्या पशूचे प्रबोधन होणेच जरूर आहे. माणसाचे व्यक्तिगत पातळीवरले प्रबोधन आणि विकास हा कदाचित कंटाळवाणा आणि लांबचा मार्ग असेल. पण ज्या प्रगलभतेची आणि शहाणपणाची साधना केल्यावाचून मानवजातीला आता गत्यंतर नाही, तो मार्ग असाच कष्टसाध्य आणि धैर्याची कसोटी पाहणाराच आहे. या मार्गाला आज तरी दुसरा शॉर्टकट नाही.'

'वा छान चिमटा घेतला राजवाड्यांना !' श्रोते उद्‌गारले आणि खुषीत येऊन हसू लागले.

प्रसंग होता १९२७ साली पुणे येथे भरलेल्या महाराष्ट्र साहित्य-संमेलनाचा. त्याचे अध्यक्ष होते श्रीपाद कृष्ण कोल्हटकर. त्यांनी आपल्या भाषणाच्या प्रारंभीच राजवाडे यांचे पुण्यस्मरण केले आणि त्यांनी शारदोपासक संमेलनात उपस्थित केलेला, 'मराठी भाषा मृत्यूर्षु अवस्थेपर्यंत येऊन पोहोचली आहे काय' हा प्रश्न चर्चेसाठी घेतला. कोल्हटकरांना राजवाड्यांविषयी अर्थातच अत्यंत आदर होता आणि त्यांनी उपस्थित केलेला प्रश्न त्यांना इतका महत्त्वाचा वाटला की, त्यांनी आपले सारे भाषण याच एका प्रश्नाच्या चर्चेसाठी खर्ची घातले. त्याचा निष्कर्ष अर्थातच राजवाड्यांच्यापेक्षा निराळा होता.' आपले वाङमय निराश होण्याइतके दरिद्री नाही, तसे हुरळून जाण्याइतके संपन्नही नाही. राजवाडे म्हणतात त्याप्रमाणे ते मरणाच्या दारी बसले नाही, तसेच आपणामधील फाजील आशावाद्यांच्या मता-प्रमाणे ते आंग्ल वाङमयाइतके प्रौढ दशेप्रत पोचलेलेही नाही. ते बाल्य-व तारुण्य यांच्या संधिकाळात आहे असे म्हटल्यास त्याचे योग्य वर्णन केल्यासारखे होईल. त्याच्या ठायी बालपणीचे दौर्बल्य आणि भावी तारुण्यातील उच्छृंखलपणा याचे विलक्षण मिश्रण झाले आहे. भाष-णाच्या अखेरीस कोल्हटकर पुन्हा राजवाड्यांचे स्मरण करून म्हणाले,

'राजवाड्यांचे निदान अचूक असून मराठी भाषा मरणाच्या दारी बसली असती तरी 'मरणं प्रकृतिः शरीरिणाम् विकृतिर्जीवितम्' हे तत्त्व हाडीमाशी मुरलेल्या आम्हा हिंदु लोकास भय वाटण्याचे मुळीच कारण नसते. आमचा पुनर्जन्मावर पूर्ण विश्वास असल्यामुळे, मरण म्हणजे पुढील जन्माची तयारी इजहून भयंकर त्याविषयीची आमची कल्पना असणे शक्य नाही. इंग्रजीपूर्वीचा व नंतरचा हे जे मराठी भाषेचे दोन प्रमुख काळ विभाग पडतात त्यासाठी त्यांच्या स्वरूप-भेदाच्या दृष्टीने तिचे दोन जन्म मानता येतील. तिच्या पूर्वजन्मात तिने अनेक रसाळ गीतांनी परमेश्वरांस आळवून परमार्थाचे साधन केले. पूर्वजन्मातील संस्कार इतके दृढ असतात की त्यांचा पुढील जन्मावरही परिणाम होतो हे पुनर्जन्म सिद्धांताचे एक महत्त्वाचे तत्त्व आहे. त्यास अनुसरून पूर्वजन्मातील परकीय शब्दाच्या वैपुल्याची मराठीच्या दुसऱ्या जन्मात पुनरावृत्ती होत आहे. पूर्वजन्मात तिला जसा संस्कृत वाङमयाचा आधार घ्यावा लागला तसा दुसऱ्या जन्मात इंग्रजी वाङमयाचा घ्यावा लागला आहे. पहिल्या जन्मातील कर्मानुसार मराठीला अजून मधून मधून पारतंत्र्याचे झटके येत असले तरी तिचा या जन्मातील मुख्य रोख स्वातंत्र्यप्राप्तीवर आहे.' कोल्हटकरांचे सबंध भाषण अशा प्रकारे राजवाड्यांच्या आक्षेपाचा परिहार करणारे असल्यामुळे लोकांना ते अर्थातच आवडले. त्यामुळे, आपल्या भाषणाच्या प्रारंभी पूर्वपक्ष म्हणून राजवाड्यांच्या सिद्धांताचे स्पष्टीकरण आपल्या उपरोधिक आणि विदग्ध शैलीत जेव्हा कोल्हटकर करू लागले, तेव्हा जाणकार आणि रसिक श्रोत्यांनी हसून त्यांना मनापासून दाद दिली. कारण ऐकल्याबरोबर सभा प्रसन्न व्हावी असे सुंदर आणि मार्मिक प्रश्नालंकार एकामागून एक कोल्हटकरांनी वापरले होते. 'हल्ली साहित्य परिषदेमार्फत मराठी भाषेसंबंधाने होणाऱ्या अन्याया-विरुद्ध जी ओरड सुरू आहे, ती त्या भाषेस लागलेली शेवटची घर-घरच आहे काय ? पुण्यासारख्या शहरात मराठी भाषेच्या सेवेप्रीत्यर्थ जे अनेक संस्थांचे जाळे तयार होत आहे, ते, त्याचा मरू घातलेल्या मराठीस मृत्यूशरख म्हणून कांबळ्यासारखं उपयोग व्हावा, म्हणूनच

की काय ? मराठी वाङ्मयाच्या अभिवृद्ध्यर्थ जी अनेक बक्षिसे देण्यात येतात, त्यांची किंमत अंतकाळी द्यावयाच्या दानाइतकीच समजावयाची की काय ? प्रतिवर्षी अधिकाधिक जोमाने वाहणाऱ्या काव्यगंगेचा उपयोग मराठी भाषेच्या मुखात अखेरचे गंगोदक घालण्यासाठीच व्हावयाचा आहे काय ? गीतारहस्यासारख्या पवित्र ग्रंथाची निर्मिती मृत्यूर्षु मराठीच्या मुखाने भागवताच्या नावाचा उच्चार व्हावा म्हणूनच झाली की काय ? सुरस, सरस, भारतगौरव, कुटुंब-शिक्षण, विजयसाहित्य या मालांचा उपयोग मराठी भाषेच्या शवावर सन्मानार्थ पसरावयाच्या पुष्पमालांइतकाच होणार की काय ? जे अनेक खंदे लेखक मराठी भाषेस आधार देण्याकरिता उभे आहेत, त्यांच्या खांद्याचा उपयोग तिच्या शवास वाहून नेण्याकरिताच व्हावयाचा आहे काय ? आणि ज्ञानकोशाच्या खंडांचा विनियोग मराठीच्या सरणावर इंधन म्हणून रचण्याकडेच व्हावयाचा की काय ? अखेरीस असाही प्रश्न उद्‌भवतो की, राजवाड्यांनी भाषेच्या अंताबद्दल हे जे अशुभ भविष्य वर्तविले, ते अचूक भविष्यवादी म्हणून किंवा महाराष्ट्रीयांच्या स्वभाषाभिमानावर साचलेल्या औदासिन्याचा धुरळा झाडून टाकण्याकरिता ? ते निव्वळ भाकित असेल, तर त्यांनी स्वतःच्या आयुर्मानासंबंधाने केलेले भविष्य जसे दुर्दैवाने खोटे ठरले, तसेच त्यांनी स्वभाषेच्या आयुर्मानासंबंधाने केलेले हे भविष्य सुदैवाने खोटे ठरावे, अशीच प्रत्येक महाराष्ट्रभाषाभिमानी इच्छा करील.'

'रमणीयं शब्दार्थं काव्यम् !' रमणीय शब्दाची आणि अर्थाची उपासना करणाऱ्या सौंदर्यपूजक कोल्हटकरांचे भाषण लोकांना आवडले यात नवल नव्हते. कारण ते सुंदरच होते परंतु त्याचे दुसरेही कारण होते. राजवाड्यांच्या परखड आणि फटकळ भाषणामुळे अनेकांना राजवाड्यांचे भाषण आवडले तर नव्हतेच पण राजवाड्यांवरही त्यांचा राग झाला होता. राजवाड्यांच्या रूक्ष, तर्क-कर्कश, प्रखर खदिरांगाराच्या वर्षावाच्या तुलनेने कोल्हटकरांचे भाषण तापलेल्या जिवाला गारवा देणारे वाटल्यास नवल नाही. लोकांचा राजवाड्यांवर राग फार दिवस राहिला. लोकांना फार खरे आवडत

नाही. फार खोटे चालत नाही. खऱ्याखोटयांची भेसळ असलेला 'सत्यानृतोऽयं लोकव्यवहार: !' ही जनरीती आहे. ती सोडून, राजवाडे त्यांना जे सत्य दिसले ते कोणाचा मुलाहिजा न ठेवता सांगून गेले. त्यामुळे त्यांच्या भाषणाचा फारसा विचार न करता लोक त्यांच्यावरच रागावून बसले. डॉ. केतकरांनी सोळाव्या महाराष्ट्र साहित्यसंमेलनात म्हटल्याप्रमाणे–' राजवाडयांना जनता बरीच खंबीर भेटली. भाषा संरक्षणासाठी अस्तन्या सावरून पुढे यावयाची इच्छा जनतेला नसल्यामुळे राजवाडे अभद्र बोलले म्हणूनच कांगावा करू लागली.'

शिवरामपंत परांजपे हे राजवाडे यांचे समकालीन, समवयस्क आणि सहाध्यायीसुद्धा. डेक्कन कॉलेजात राजवाडे आणि ते एकाच वेळेला होते. एकाच वेळेला त्यांनी कॉलेज सोडले. एक-दोन वर्षे पुढे-मागे असतील. पण शिवरामपंतांचा स्वभाव सखोल आणि मितभाषी आणि राजवाडे विक्षिप्त त्यामुळे दोन डोळे शेजारी शेजारी असून त्यांची संसारी भेट नसते. त्याप्रमाणे दोघेही बरोबर असून दोघांचे रहस्य फारसे झाले नव्हते. पण राजवाडयांचे सगळे चरित्र शिवरामपंतांच्या डोळयांसमोर घडले होते. राजवाडयांच्या 'भाषांतर' मासिकात १८९४ साली केशवमिश्रांच्या ' तर्कभाषा ' या ग्रंथाचे भाषांतर शिवरामपंतांनी केले होते. अशा प्रकारे राजवाडयांची प्रकृती आणि प्रवृत्ती यांचे शिवरामपंतांना गेल्या तीस-बत्तीस वर्षात चांगले ज्ञान झाले होते. त्यांनाही राजवाडे यांचे भाषण आवडले नव्हते. आचार्य भागवत यांच्यापाशी ते म्हणाले की, ' राजवाडे नेहमीच निराशावादी असतात, इतकेच नव्हे, तर १९२९ साली बेळगाव साहित्यसंमेलनाच्या अध्यक्षपदावरून भाषण करताना, कोल्हटकरांप्रमाणेच शिवरामपंतांनीही राजवाडयांच्या निराशावादी दृष्टिकोनाचा परामर्श, अर्थात् राजवाडयाबद्दल आदर बाळगूनच, वक्रोक्तिपूर्ण शैलीने घेतला.

'आपण व्याख्यानातून, खाजगी भाषणातून, पत्रव्यवहारातून, किंबहुना आपल्या घरातल्या डोलाऱ्यातूनसुद्धा, इंग्रजी शब्द अतिशय

वापरतो, या उद्वेगजनक स्थितीने अत्यंत उद्विग्न होऊन कै. राजवाडे यांनी एके प्रसंगी या इंग्रजीच्या जोखडाखाली आणि जुलमाखाली आपली मराठी भाषा कदाचित् मरेल देखील की काय, अशी अतिस्नेहः पापशंकी ' या दृष्टीने एक भीती प्रदर्शित केली होती. पारतंत्र्याच्या तिटकाऱ्याच्या दृष्टीने विश्वनाथपंत राजवाडे यांची काळजी लक्षात घेण्यासारखी नाही असे कोण म्हणेल ? तरी पण एवढे खास आहे की, आपली मराठी भाषा मरणोन्मुख झालेली नसून ती उत्तरोत्तर उदयोन्मुखच होत चाललेली आहे. तिच्यात हल्ली जर काही थोडासा तेजस्वितेचा कमतरपणा दिसत असेल तर तो संध्याकाळच्यानंतरचा नसून प्रातःकाळच्या पूर्वीचा आहे. श्रीज्ञानेश्वर महाराजांच्या भावार्थ दीपिकेपासून तो लोकमान्य टिळकांच्या गीतारहस्यापर्यंत ज्या मराठी-मध्ये आतापर्यंत अनेक ओजस्वी ग्रंथ निर्माण झाले आहेत, ती भाषा मरणाकरता जन्माला आलेली नाही ! ज्या भाषेत रामदासांनी शिवाजीला स्वधर्मरक्षणाची प्रेरणा केली, आणि ज्या भाषेमध्ये शिवाजीमहाराजांनी मराठ्यांचे स्वराज्य आणि स्वातंत्र्य प्रस्थापित केले, ती मराठ्यांची भाषा मारण्याकरता जन्माला आलेली आहे, मरण्याकरता नव्हे ! ज्या भाषेत बाजीराव बल्लाळ लढले, ज्या भाषेत राघोबादादांनी अटकेपर्यंत भराऱ्या मारल्या, ज्या भाषेत नाना फडणीसांनी मनसुबे केले, ज्या भाषेत महादजी शिंद्यांनी दिल्लीमध्ये फिरून मराठ्यांचे नाव कायम केले, आणि ज्या भाषेमध्ये झाशीच्या राणी लक्ष्मीबाईंनी आपली स्वदेशभक्ती आणि वीरवृत्ती ओतली ती मराठी भाषा नष्ट होणे केव्हाही शक्य नाही !'

राजवाडे यांनी शारदोपासक संमेलनात भाषण केले, त्याला चौदा वर्षे उलटून गेली. एवढ्या काळात बहुतेक प्रमुख साहित्यसेवकांचे मत राजवाड्यांच्या मताशी विरोधी असता, त्यांच्या मताशी सहमत असणारा एकच प्रमुख साहित्यिक निघाला. तो म्हणजे भा. वि. वरेरकर होय. वरेरकरांचेही मत तसे राजवाड्यांच्या विरुद्धच होते. पण राजवाड्यांचे भविष्य केवळ कल्पनाविलास म्हणून मोडीत काढता येण्यासारखे नाही असेही त्यांना वाटते होते. ' दृष्टि तशी

सृष्टी ' या न्यायाने काही प्रमाणात हा वरेरकरांच्या दृष्टिकोनाचा परिणाम होता आणि काही प्रमाणात हा बदललेल्या काळाचा प्रभाव होता. चौदा वर्षात पुलाखालून पाणी पुष्कळच वाहून गेले होते. १९३९ साली नवव्या शारदोपासक संमेलनाच्या अध्यक्षपदावरून बोलताना वरेरकर म्हणाले,

' साहित्याच्या याच व्यासपीठावरून ' मराठी भाषा मृत्युपंथाला लागलेली आहे ' अशी घोषणा कैलासवासी राजवाडे यांनी केली होती. ती कठोर घोषणा सर्वांच्या जिव्हारी लागली. कित्येक नाराज झाले. कित्येकांना राग आला. कित्येकांनी हेटाळणीने त्या उद्‌गारांची उपेक्षा केली; राजवाडे यांचा गालिप्रदानाने उद्धार करावयालाही कमी केले नाही. ती घोषणा कठोर होती. पण अस्थानी नव्हती. मराठी भाषा मरेल असे म्हणण्याइतका निराशावादी मी नाही, पण त्यानंतरच्या दहा वर्षांच्या काळाचे सिंहावलोकन जर आपण केले तर कै. राजवाडे यांच्या त्या उद्‌गारात तथ्य नव्हते असे आपल्याला म्हणता येणार नाही. ' भाषणाचा उपसंहार करताना वरेरकर म्हणाले, ' कै. राजवाड्यांनी मराठी भाषा मरणार म्हणून भीती व्यक्त केली. तशी भीती मला वाटत नाही. सहजासहजी मरण्याइतकी मराठी भाषा दुबळी नाही तसेच महाराष्ट्र निर्बल नाही.'

१९४७ साली देश स्वतंत्र झाला. स्वराज्य आले. १९६० साली संयुक्त महाराष्ट्राची निर्मिती झाली. मराठी राजभाषा झाली. आता तरी राजवाड्यांचे भविष्य खोटे ठरायला व ते खोटे ठरले म्हणून स्वभाषेसाठी तळमळणाऱ्या राजवाड्यांच्या स्वर्गस्थ आत्म्याला समाधान वाटायला हरकत नव्हती. पण कसचे कायन् कसचे काय ? रामदासांनी म्हटल्याप्रमाणे, ' कठीण त्यावर कठीण आले आतां न दिसे उरी ' अशी स्थिती झाली. दिवसेंदिवस जे पाहावे ते विपरीतच घडू लागले. स्वातंत्र्यप्राप्तीनंतर पस्तीस वर्षांनी अकोला साहित्य संमेलनाचे अध्यक्ष म्हणून बोलताना गो. नी. दांडेकर मोठ्या खेदाने म्हणाले,

श्रीरामचंद्रानं म्हटलं होतं, ' जननी जन्मभूमिश्च स्वर्गादपि

गरीयसी ।।' तशी जी आमची राष्ट्रभाषा ती आम्हास स्वर्गापेक्षाही श्रेष्ठ असायला हवी. पण आम्ही तिचा उचित तो आदर करतो का? की अजून आम्ही तिला इंग्रजीची दासी– बटकी म्हणूनच वागवतो? सभ्य गृहस्थहो, दुर्दैवानं अशा निष्कर्षावर यावं लागतं की, तेवढंही मोल आम्ही स्वभाषेला देत नाही. कित्येक सुजन मला असे माहीत आहेत की, जे मातृभाषेत बोलायला लाजतात. आपली मातृभाषा मराठी आहे याची त्यांना खंत वाटते! मराठी साहित्य वाचता का, असा प्रश्न केला असता ते तुसडेपणाने सांगतात की, नाही बुवा, आम्हाला मराठी भाषेतलं नाही काही आवडत! आम्ही आपले इंग्रजी वाचतो! ध्यानी घ्या की, हे केवळ करंटेपण आहे आणि इंग्रजीतही यांनी शेक्सपियरला स्पर्श केलेला नसतो. वर्डस्वर्थ त्यांना माहीत नसतो. हेमिंग्वेची एकही ओळ यांनी वाचलेली नसते. यांची उडी पोचते ती पेरी मॅसनपर्यंत! यांनी इंग्रजी तत्त्वज्ञान वाचलेले नसते, इतिहास नव्हे, विज्ञान नव्हे, गिर्यारोहण नव्हे! यांचा अबलख वारू त्याच त्या 'हॉट' वाङ्मयाच्या आणि रहस्यकथांच्या रिंगणात फेऱ्या मारीत असतो! त्यांना काय म्हणून संबोधावे ते अजून माझ्या ध्यानी आलेलं नाही. मराठीची ही अशी गळचेपी करण्याचे कामी कोण कोण जाणता अजाणता व्यग्र आहेत, त्यांचा एकदा धांडोळा घ्यायला हवा. सगळे मराठी भाषक एकत्र नांदावेत म्हणून महाराष्ट्र राज्याची निर्मिती झाली. राज्याची राजभाषा मराठी ठरली. नव्हे, सगळं वर्षच राजभाषा वर्ष म्हणून साजरं करायचं ठरलं. पण अजूनही आम्ही इंग्रजीच्या दास्यातून मुक्त झालो आहोत काय? दुर्दैवाने याचं उत्तर नाही असं आहे. मंत्रालयात अजून इंग्रजीची प्रतिष्ठा आहे. न्यायालयांमधून अजूनही इंग्रजीतून काम चालतं. न्यायाधीश मिलॉर्ड म्हणून ओळखण्यात धन्यता मानतात. आकाशवाणीवरून अजून इंग्रजीचे पाश दूर झाले नाहीत. विद्यापीठं अजून इंग्रजी भाषा वापरण्यात औचित्य मानतात. अलीकडे कित्येक नाटकांची नावं तर इंग्रजी भाषेमध्ये बुचकळलेली असतात. पुणे विद्यापीठाने आपल्या वाणिज्य शाखेतून मराठीला बाहेर घालवून काय साधले? मातृभाषेचा संस्पर्श

नसलेली केवळ आकडेमोडी करणारी मानवी यंत्रे विद्यापीठाला तयार करायची आहेत काय ? महाविद्यालयांमधून संस्कृतबरोबर मराठीचेही उच्चाटन होण्याची दुर्दैवी घटिका सामोरी ठाकली आहे. मुंबईच्या फोर्ट विभागात तर मराठी ही घाटी हमालांची आणि रामा गड्यांची भाषा म्हणून ओळखली जाते ! हे न्याय्य आहे काय ? योग्य आहे काय ? महाराष्ट्राच्या राजधानीत हे व्हावे ? याचा एक परिणाम असा होत चालला आहे की, आमची मुलं भारतीय संस्कृतीपासून दूर चालली आहेत. त्यांना रामायण माहीत नाही. कालिदास ठाऊक नाही. ज्ञानेश्वर तर विचारायलाच नको ! आपल्या लेकरांना इंग्रजी माध्यमाच्या शाळांमध्ये मोठ्या हौसेने घालणाऱ्या पालकांना मी विचारतो की, मराठीची नाळ कापून टाकून आपण आपल्या पाल्यांची स्थिती न घरका न घाटका अशी करणार नाही काय ?

१९८३ साली मुंबई महानगर मराठी साहित्य संमेलनाच्या उद्घाटनप्रसंगी भाषण करताना तर, अशुभ भविष्यवाणी म्हणून हेटाळले गेलेल्या राजवाड्यांचीच ना. ग. गोरे यांना आठवण झाली. ते म्हणाले, 'फार वर्षांपूर्वी मराठी भाषेला भवितव्य नाही.' अशी कठोर भविष्यवाणी इतिहासाचार्य राजवाडे यांनी बोलून दाखविली होती. तीच चिंता मलाही अधून मधून स्पर्श करून जाते. ज्यांना आपण सुशिक्षित असे समजतो, त्यांच्या घरातून पुढल्या पिढीपर्यंत मराठी भाषेचा नामोनिशाणा तरी राहील की नाही, याचीच मला शंका येते. आजच्या नव्या पिढीतील मुलामुलींना बालकवि किंवा केशवसुत, पाडगावकर किंवा कुसुमाग्रज यांचे काव्य समजत नाही. मग आपले लाडके तुकोबा आणि ज्ञानोबा तर दूरच राहिले ! आजचे सुशिक्षित प्रौढ इंग्रजीचा आश्रय सहजतेने घेताना आढळतात. मराठीचे मराठीपण नष्ट होण्याच्या मार्गावर आहे. खेडूत माणसेदेखील तेथील पिंपळाच्या पारावर 'टाइम पास' करीत असलेले आढळतात. इतिहासाचा एक नम्र अभ्यासक म्हणून मी हे जाणून आहे की, काळाच्या विशाल उदरात गेल्या पाच हजार वर्षांत अनेक भाषा व अनेक लिप्या लुप्त झालेल्या आहेत. पण मराठी भाषेचा प्रेमी म्हणून माझ्या मनाला

एक आस लागलेली असते की, ज्ञानदेवाचा हा सोन्याचा पिंपळ शतकावेरी तसाच सळसळत राहावा. मी एवढेच म्हणेन– नमो वाचे। नमो वाचस्पतये ।।

१९८५ च्या ऑक्टोबरात हीरकमहोत्सवी मराठी साहित्य संमेलन मोठ्या थाटामाटाने मुंबईत भरले. त्याचे उद्घाटन करताना मुंबईचे महापौर श्री. दत्ताजी नलावडे म्हणाले, 'पन्नास ते साठ वर्षांपूर्वी कवि माधव ज्यूलियन यांनी 'मराठी असे आमुची मायबोली परी आज ती राजभाषा नसे' ही व्यथा व्यक्त केली. पण आज मात्र उलटे म्हणण्याची पाळी आली आहे. आज ही मराठी अधिकृत राजभाषा झाली आहे. पण ती मुंबईसारख्या नगरातून आणि वरिष्ठ वर्गातून मायबोली उरलेली नाही ! मम्मी, डॅडी, वाइफ, मिसेस, ब्रदर, अंकल, आँटी या शब्दांनी मराठी भाषा मारली जात आहे.' अध्यक्ष विश्राम बेडेकर म्हणाले की, 'जीवनातील मूल्यांचे भजन–कीर्तन मराठी भाषेत शतकानुशतके चालत आले आहे. हा वारसा देणाऱ्या आपल्या भाषेला आपण सध्या किती जागरूकपणे जपतो आहोत ? शासन व्यवहारात मराठीचा वापर ऐंशी टक्क्यापर्यंत वाढला आहे म्हणतात. पण हे मराठी समजून घेण्यासाठी मुख्यमंत्र्यांना तिची इंग्रजीत टिपणे करून घ्यावी लागतात ! अशी ही कोणती नवीन मराठी भाषा असेल ? लोकांशी जवळीक वाढावी म्हणून मराठीचा वापर वाढतो आहे. पण जी भाषा प्रशासकांनाच कळत नाही ती लोकांना कशी कळणार ? दुर्बोध भाषेचा हा प्रश्न हसण्यावारी नेण्यासारखा नाही. शासनाप्रमाणेच न्यायालयाशीही सामान्य माणसाचा जिव्हाळ्याचा संबंध येतो. तिथे तर तो जवळ जवळ अंधारातच चाचपडत राहतो. कारण तिथला व्यवहार त्याला मुळीच न कळणाऱ्या इंग्रजीत ! खरे म्हणजे समजेल अशा भाषेत न्यायदान झाले तर नागरिकांना निर्धास्त वाटते. न्यायसंस्थेवर श्रद्धा राहते; लोकशाहीला बळ येते. पण सगळ्यांच्या मते कायद्याचे सामर्थ्य पेलण्याची शक्ती इंग्रजी भाषेत आहे तशी मराठी भाषेत नाही. इंग्रजीलाही हे सामर्थ्य एका रात्रीत लाभलेले नाही; इकडे आपले

लक्ष जात नाही. इंग्रजी कायदेपंडितांच्या अनेक पिढ्यात विदग्ध वाङ्मयाचे विद्यार्थी, समर्थ लेखक, भाष्यप्रभू होऊन गेलेले दिसतात. त्यांच्या श्रमांनी कमावलेली भाषा साहजिकच आज इंग्रजी न्याय-सस्थेचा आधार होऊन बसली आहे. इंग्रजीमुळे तांत्रिक शिक्षण सुलभ जाते हे तिचे एक आकर्षण. द्रव्यार्जनासाठी तांत्रिक शिक्षण जास्त उपयुक्त. त्यामुळे तशा शिक्षणासाठी पडेल ती किंमत देऊन मुले धाव घेत असतात. ही मुले साहजिकच वाङ्मय, इतिहास, अर्थशास्त्र, मानसशास्त्र अशा सांस्कृतिक विषयांच्या संस्कारांना पारखी होतात. समाजात केवळ तंत्रज्ञांचाच बेसुमार भरणा झाला, तर संस्कृतीची जपणूक कितपत राहील, हा विचार जाणत्या पालकांनाही सुचत नाही. एकंदरीनेच आपले विचार आणि वर्तन यातली विसंगती वाढत असलेली दिसते. सगळ्यात मोठी विसंगती म्हणजे आपले राज्य मराठी आहे. पण त्याच्या राजधानीचे नावच इंग्रजी आहे ! ते 'मुंबई' करायचे नाही, कारण त्यामुळे इतर भाषकांची मने दुखव-तील, आपल्या भारतीय एकात्मतेला तडे जातील. इतर भाषकांच्या संस्कृतीचा 'बांबे' या इंग्रजी नावाशी काही संबंध नाही. त्यामुळे ते का दुखावतात हेही कळत नाही. सोईचे असेल त्याचे समर्थन करण्यात माणसे नेहमीच वाकबगार असतात !

१९२६ ते १९८५ या उण्या पुऱ्या साठ वर्षांच्या मराठी भाषेच्या जीवनप्रवासाचा हा आलेख पाहताना एक मोठा चमत्कार वाटल्या-शिवाय राहत नाही. तो असा, की कोल्हटकर किंवा परांजपे यांच्या सारख्या साहित्यिकांच्या भाषणात परराज्य असतानासुद्धा मराठी भाषेच्या भवितव्याबद्दल जो आत्मविश्वास दिसतो तो स्वराज्य झाल्यानंतर व महाराष्ट्र राज्य झाल्यानंतर सुद्धा दांडेकर, बेडेकर, गोरे या साहित्यिकांच्या भाषणात दिसत नाही. उलट अपेक्षाभंगाचे दुःख, चिंतेची छाया आणि उद्वेगाचे कढच दिसतात. या विपरीत परि-स्थितीची चिकित्सा करू जाता असे वाटते, की इतर कारणे कोणतीही असली, तरी मोठे कारण हे आहे, की आपला देश राजकीय दृष्ट्या स्वतंत्र असला तरी त्याच्या मनावरची इंग्रजांची व इंग्रजीची पकड

अद्याप सुटलेली नाही. ही मानसिक गुलामगिरी हे या अनर्थाचे मूळ आहे. आणि मग साहजिकच राजवाड्यांच्या वचनाची आठवण होते. 'गुलामांना स्वतंत्र विचार करणारी स्वतंत्र भाषा असल्याचे इतिहासात कोठे नमूद नाही.' दीडशे वर्षांपूर्वी मेकॉलेने इंग्रजी शिक्षण हिंदुस्थानात सुरू करताना म्हटले होते, की आपण असा वर्ग निर्माण करण्याचा प्रयत्न केला पाहिजे की जो रक्ताने व वर्णाने भारतीय असेल, पण अभिरुची, मते, नीति, आणि विचार या बाबतीत इंग्रज असेल. आज दीडशे वर्षांनंतर स्वराज्यातही मराठीची दुर्दशा पाहिली, तर मेकॉले साहेबाच्या इच्छेला आपल्या सहकार्याने फळे आली आहेत, व साहेब या देशातून गेला, नव्हे मेला असला तरी थडग्यातून आपल्या देशावर अद्याप वर्चस्व गाजवीत आहे असे म्हणणे भाग आहे.

या संदर्भात टिळकांची एक आठवण सांगण्यासारखी आहे. १९०४ साली टिळक संकेश्वराला गेले होते. तेथे संकेश्वरच्या शंकराचार्यांशी बोलताना टिळक म्हणाले, 'अलीकडल्या इंग्रजी शिकलेल्या सर्व सुशिक्षित तरुण मंडळींस आमच्या संस्कृतीची फारशी किंमत वाटत नाही, व धर्माबद्दल तर त्याची आस्तिक्य बुद्धी नाही व आस्थाही नाही. या बाबतीत ते अगदी उदासीन आहेत, किंबहुना संस्कृती व धर्म विसरण्यासही ते तयार आहेत. म्हणून हे क्वचित मनात येते की, आमची संस्कृती व धर्म कोणास नकोच असेल तर मग येथे आमचे स्वराज्य झाले काय किंवा परस्थ ख्रिस्तींचे कायमचे राज्य टिकले काय, सारखेच ! संस्कृती, देव, धर्म, परंपरा, स्वसंबंध याकरिता स्वराज्य आहे. पण या सर्वांचे अभावी, नुसते स्वराज्य, आहार, निद्रा भय वगैरे करिता स्वराज्य या सर्वांस हवे आहे !'

हॅम्लेटशिवाय 'हॅम्लेट' असावे, अर्थावाचून शब्द असावेत किंवा आत्म्याशिवाय शरीर असावे, त्याप्रमाणे 'स्व' त्वाच्या जाणिवेशिवाय 'स्वराज्य, स्वभाषा व स्वसंस्कृती व स्वदेश' असावा हा जीवनातला विरोधाभास आहे, नव्हे, वदतोव्याघात आहे. आपल्या राष्ट्राच्या व समाजाच्या जीवनात आज जो हा अनवस्था प्रसंग प्राप्त झाला आहे त्याचे मूळ अर्थातच आत्मविस्मृतीत आहे, आणि असा विचार करू

लागले, म्हणजे जवळ जवळ शंभर वर्षांपूर्वी राजवाडे यांनी 'स्वत्व-रक्षणाच्या खडतर कर्तव्याचा' जो विचार मांडला तो आजही किती खरा आहे याची प्रचीति आल्याशिवाय रहात नाही. ज्यात स्वत्वरक्षण नाही ते स्वराज्य कसले ?

मग जर असे आहे, तर ज्या ज्या कोल्हटकर व शिवरामपंत परांजपे यांच्यासारख्या थोर साहित्यसेवकांनी राजवाड्यांच्या मताला विरोध केला, ते सारे साहित्यिक चुकले व राजवाडे तेवढे बरोबर होते असे म्हणावयाचे काय ? राजवाड्यांच्या भाषणानंतर मनावर आलेले दडपण दूर करण्यासाठी त्यावेळी कवि यशवंतांनी 'न्याहरीचा वकुत होइल मैतरणी बिगि बिगी चाल' हे शृंगारमधुर गीत, साहित्यिकांच्या विनंतीवरून म्हटले, तो राजवाड्यांच्या भाषणाचा प्रच्छन्न निषेध होता काय ? राजवाड्यांसारख्या पवित्र आत्म्याला त्यांच्या शेवटाचे हे स्फुरलेले भीषण भविष्य होते ? राजवाडे विक्षिप्त होते की द्रष्टे होते ?

कोण जाणे! काळ सर्वसाक्षी आहे. तोच काय ते ठरवील.एवढे मात्र खरे की, समाजाच्या सुखदुःखाची रात्रंदिवस चिंता वाहणाऱ्या आणि समाजपुरुषाशी तादात्म्य झालेल्या राजवाड्यांसारख्या माणसाला चिमटा घेणे किंवा हसणे वाटते तितके सोपे नाही, कारण त्या चिमटयाने परिणामी आपलाच जीव कासावीस होतो आणि हसू आपलेच होते. शेवटी हसतो, तोच खरा हसतो, असे म्हणतात ते काही खोटे नाही.

अर्थात या सर्व विवेचनाचा अर्थ असा नव्हे की 'यत्किंचित मनुरवदत तद्वै भैषजम' या वचनाप्रमाणे राजवाडे जे जे बोलले ते ते प्रमाण मानावे.राजवाडे मोठे असले तरी अखेर माणूसच होते आणि माणसांच्या जातीला स्वाभाविक असलेले सारे गुण-दोष त्यांच्या जीवनाप्रमाणच त्यांच्या वाङमयातही ते असामान्य असले तरी उतरलेले आहेत.त्यांचे वाङमय हे वेदांप्रमाणे अपौरुषेय वाङमय आहे आणि त्यामुळे त्यांच्या साहित्याला वेदप्रामाण्य लावणे हे त्यांनी जन्मभर पतकरलेले व्यक्ति-

निरपेक्ष शास्त्रीय दृष्टीशी विसंगत होईल. ती व्यक्तिपूजा व ती विभूतिपूजा त्यांनाही आवडणार नाही, आणि पूजेचाच जर आग्रह असेल, तर किरात वेषधारी शंकराला ज्याप्रमाणे अर्जुनाने संग्रामात केलेली शरवृष्टि पुष्पवृष्टीप्रमाणे संतोषकारक वाटली, त्याचप्रमाणे कुरुंदकरांचे शब्दात सांगायचे म्हणजे राजवाड्यांची 'समतभेद' पूजाच त्यांना अधिक प्रिय होईल. कार्लाईलच्या मृत्यूनंतर त्यांच्या रेनॉयसांस पुस्तक प्रसिद्ध झाले. त्यावरून कार्लाईलबद्दल मोठे वादळ उठले. अनेकांना पूर्वी तो जितका मोठा वाटला तितका वाटेना. आपण इतके दिवस जो देव मानला त्याचे पाय मातीचेच आहेत असे त्यांना दिसून आले. तेव्हा एका टीकाकाराने त्या ग्रंथाबद्दल लिहिले की ह्या आठवणी वाचून वाचकांच्या डोळ्यापुढे जर अतिशय स्खलनशील तरीही अतिशय उदात्त अशा माणसाचे चित्र उभे राहात नसेल, तर ते पुस्तक त्या वाचकासाठी नाही व तो वाचकही त्या पुस्तकासाठी नाही. हेच विधान राजवाड्यांच्या जीवनाला व वाङ्मयाला लावावे लागले.

राजवाड्यांच्या काळी व त्यांच्या नंतरही त्यांच्या स्वभावावर व साहित्यावर टीका करणारे लोक थोडेथोडके होते असे नाही. पहिल्या खंडाच्या प्रस्तावनेत त्यांनी कऱ्हाडचा गोविंदपंत बुंदेल्यावर टीका केल्याबद्दल सरदेसाई मनातून त्यांच्यावर रागावलेले होते. 'शेणवी' शब्दाची व्युत्पत्ती सैन्यपती अशी लावून राजवाड्यांनी त्यांना क्षत्रिय ठरविण्याचा प्रयत्न केला तेव्हा सारस्वत त्यांच्यावर संतापले होते. 'कायस्थ धर्मदीप' या राजवाड्यांच्या लेखनावरून कायस्थात संतापाची लाट उसळली आणि प्रबोधनकार ठाकरे यांनी म्हटल्याप्रमाणे 'अरे तर कारे म्हणीप्रमाणे राजवाड्यांच्या अनेक विधानांच्या चिंधड्या उडवण्यासाठी आम्ही प्रत्युत्तरांचे भयंकर बाण त्यांच्यावर सोडून त्यांच्या पाठिराख्या भारत इतिहास संशोधक मंडळास दे मायधरणी ठाय करून सोडले होते. राजवाड्यांनी धंदेवाईक अध्यक्ष म्हणून ज्यांची कुचेष्टा केली होती ते केळकरही म्हणतात की, 'विद्वत्तेपेक्षा सौजन्याला मी केव्हाही जास्त किंमत देतो आणि म्हणून मनातून

बिसूभाऊ राजवाड्यांवर माझा राग असे, अगदी त्यांचा कनिष्ठ माध्यमिक व उच्च शाळांतील स्वानुभव हा वैयक्तिक संस्मरणाचा लेख घेतला, तरी त्यावरही मंगेश जिवाजी तेलंग यांनी अगदी कडक टीका केली होती, की राजवाड्यांसारख्या बेकाम देशभक्ताकडून या (शिक्षणपद्धती सुधारण्याच्या) देशकार्यास मदत होण्याचे दूरच उलट सप्रयत्नाचे आड येऊन ते करणाऱ्या इमानी लोकांचा वेळी अवेळी आपल्या आचरटपणाने पाणउतारा करण्याचे अश्लाघ्य व अपवित्र काम या देशभक्तांनी करण्याचे तहकूब केले तर मिळवली म्हणायचे.

एकदा पांगारकर आणि राजवाडे यांची चित्रशाळेत गाठ पडली. 'संतवाङमय हेच माझे अन्न व जीवन झालेले आहे. संतकाव्य हेच मी सदैव गुणगुणतो; पाठ करतो आणि त्यातच आनंद मानतो. स्वप्नातही तेच यावे अशी माझी इच्छा असते–' ही पांगारकरांची संत साहित्याविषयी भावना होती. स्वतःला ते 'संतांचा चरणरज' म्हणवीत. त्यांना राजवाड्यांची संतावरची पंगू, संतांळे अशी टीका किंवा 'ही ग्यानबा–तुकारामांची जोडी महाराष्ट्राच्या बहुत नाशाला कारणीभूत झाली आहे.' अशा प्रकारची चरचरीत विधाने कशी गोड वाटावीत बरे ? तेही राजवाड्यांवर धुळ्याच्या संताभिमानी चांदोरकरांप्रमाणे रागावलेलेच होते. पण असे असले तरी संशोधक म्हणून राजवाड्यांबद्दल त्यांना निरतिशय आदर होता. त्याला कारण होते. नुकतेच त्यांनी डोणजे येथे पहिले इतिहास संशोधन केले होते आणि संशोधकाच्या यातना काय असतात हे त्यांना स्वानुभवाने पटले होते आणि 'जलामध्ये मासा झोप घेतो कैसा, जावे त्याच्या वंशा तेव्हा कळे' या त्यांच्या आवडत्या तुकोबाच्या उक्तीची प्रचीति प्रत्ययाने आली होती. असो. भेट झाल्यानंतर राजवाडे यांनी पांगारकरांना विचारले की,' इतिहास संशोधनाच्या बाबतीत तुम्ही कोणाला अधिक श्रेय देता ?' पांगारकर म्हणाले, इतिहास संशोधनाच्या बाबतीत रुपयात आठ आणे श्रेय राजवाड्यांना आहे व बाकीच्या आठ आण्यात खरे, पारसनीस, सरदेसाई वगैरे येतील.' संतवाङमयाचा विषय निघाला तेव्हा पांगारकर म्हणाले, 'इतिहास संशोधकात

तुम्ही मोठे असला तरी तुमच्यासारखे पाचशे राजवाडे आले तरी संतवाङमयाची लोकप्रियता कमी होणार नाही.' जी गोष्ट पांगारकरांची, तीच शेजवलकरांची 'Famous in one night' या इंग्रजी म्हणीप्रमाणे ज्या पानिपतच्या प्रस्तावनेने, राजवाड्यांची एका रात्रीत, मराठीतील अव्वल दर्जाच्या संशोधकांत गणना होऊ लागली, तिच्याबद्दल शेजवलकर म्हणतात, 'राजवाड्यांनी आपल्या पहिल्या खंडाच्या प्रदीर्घ प्रस्तावनेत पेशव्यांचा हेतू हिंदुपदपातशाही स्थापण्याचाच होता असे खोटे प्रतिपादन मोठ्या कुशल वावदुकतेने केले. ही गाजलेली प्रस्तावना संबंध मराठ्यांचा इतिहास दूषित करण्यास समर्थ ठरली आहे–' पांगारकर आणि शेजवलकर या दोन टीकाकारांचा उल्लेख केला म्हणजे राजवाडे यांच्या इतर टीकाकारांबद्दल निराळे सांगण्यासारखे प्रायः फारसे काही उरत नाही. कारण, आदर असूनही विरोध आणि विरोध असूनही आदर हे राजवाड्यांच्या टीकाकारांचे सामान्य गुण या दोघात उत्तमोत्तम प्रकट झाले आहेत. म्हणून 'एतेन सर्वे व्याख्याताः !'

'परंतु 'पिंडे पिंडे मतिर्भिन्नाः' या न्यायाने राजवाड्यांच्या मतांबद्दल मतभेद असल्याने राजवाड्यांच्या मोठेपणाला बाधा येत नाही; कारण टिळकांनी एके ठिकाणी म्हटल्याप्रमाणे मते ही मनाची पांघरुणे होत.' राजवाड्यांचे मोठेपण, हे त्यांच्या मतांपेक्षाही, पुन्हा टिळकांनी आगरकरांबद्दल वापरलेले शब्द योजायचे म्हणजे, त्यांच्या 'स्वतःसिद्ध किंवा कमावलेल्या मनांत' आहे. त्यांच्या मोठेपणाचे हे मर्म त्यांचे डोळस भक्त म्हणा की टीकाकार म्हणा, श्री. शेजवलकर यांनी यथार्थ रीतीने विशद केले आहे–

'एकदा एका संशोधकाने आम्हास असा प्रश्न टाकला की, राजवाड्यांनी कोणता असामान्य सिद्धांत आपल्या अलौकिक बुद्धीने प्रस्थापित केला ते सांगा. या प्रश्नास खरोखरच उत्तर नाही, कारण, चिरकाल राहू शकेल असा कोणताही सिद्धांत त्यांनी बांधलेला नाही, किंबहुना त्यांचे बहुतेक सिद्धांत पुढेमागे सर्वस्वी चुकीचे ठरतील अशीही भीती वाटते; पण आपली बाजू मांडताना ते जे विवेचन

आणि विवरण करीत त्यातच त्यांच्या बुद्धीचे वैशिष्टय दिसून येते... राजवाड्यांची योग्यता अर्थातच त्यांच्या व्यक्तिविषयक दोषावरून, पूर्वग्रहावरून, विक्षिप्तपणावरून किंवा हास्यास्पद अज्ञानजन्य कोटीक्रमावरून ठरवावयाची नाही; तर त्यांच्या एकांतिक निष्ठेवरून, अंधारातील मार्गक्रमणावरून, अविश्रांत उद्योगावरून, बुद्धीच्या चमकेवरून, कल्पनेवरून, भरारीवरून ती ठरविली पाहिजे. त्यांची जिज्ञासा इतकी तीव्र होती, की तिची कायम तृप्ती केव्हाच होण्यासारखी नव्हती. एक शास्त्र संपले की दुसरे, दुसरे संपले की तिसरे, अशी त्यांची धाव सारखी सुरू होती. अमका एक टप्पा गाठल्यावर आज थांबायचे अशी त्यांची मनोरचनाच नव्हती. जिज्ञासा तृप्तीच्या एक जातीच्या वेडानेच ते पछाडले होते म्हणा ना–'

'त्यांची पद्धत रागे भरून शिकविण्याची होती, आंजारून, गोंजारून शिकविणे त्यांस माहीत नव्हते–' असे त्यांचे परममित्र भागवत यांनी त्यांच्याबद्दल म्हटले आहे ते खरे आहे. त्यांचे वाङमय वाचत असताना कोमलपणापेक्षा कठोरपणाचा, व गोडव्यापेक्षा कडवटपणाचा आढळ अधिक होतो हे काही खोटे नाही. पण समाजाच्या हिताच्या शुद्ध बुद्धीपलिकडे वैयक्तिक स्वार्थ राजवाड्यांच्या मनात कोणताही उरला नव्हता त्यामुळे 'रोषेऽपि निर्मळ धियां रमणीय एव।' या उक्तीप्रमाणे त्यांचा रोषही रमणीय होता आणि विषासारखे कडू बोलही परिणामी अमृतासारखे गोड होते 'देतो तीक्ष्ण उत्तरे। पुढे व्हावयासी बरे' या तुकारामाच्या वचनाप्रमाणे राजवाड्यांची तीक्ष्ण उत्तरेही मनाचा ठाव घेतात आणि काळजाला भिडतात, आणि त्यांची अनेक वचने, माटे यांची प्रसिद्ध उपमा वापरायची तर 'धार लावलेल्या पात्यासारखी मनांत घुसतात. समुद्राच्या तीरावर हिऱ्याप्रमाणे लखलखणारी रणे पडलेली असतील. त्याप्रमाणे राजवाड्यांच्या वाङमयात जेथे जावे तेथे मन उजळून टाकणारी सुभाषिते पावलोपावली भेटतात. उदाहरणार्थ– 'स्वार्थत्यागाचा परामर्श घेणारे कौशल्य जर देशात निपजले नाही तर

त्याग गाभटतो व जिवंत स्वातंत्र्याला पसरविण्यास असमर्थ ठरतो-' 'लोक अज्ञ, दारूबाज,हक्कांची जाणीव नसणारे व अशास्त्रज्ञ असले तर त्यांनी निवडलेले प्रतिनिधि तज्ज्ञ, सद्गुणी, व शास्त्रज्ञ असू शकणे प्राय: असंभवनीय असते.' 'सर्व सत्तांहून तज्ज्ञसत्ता ही श्रेष्ठतर आहे.' 'भौतिक संशोधनात आपण जोपर्यंत पाश्चात्य राष्ट्रांच्या बरोबर येत नाही, तोपर्यंत आपल्याला राजकीय मातब्बरी नाही.' 'राष्ट्राराष्ट्रात जो जीवनार्थ कलह चालला आहे, त्या कलहात उत्साहाने शिरण्याची जर आवश्यकता व इच्छा असेल, तर त्या कलहार्थ लागणारी साधनेही आपल्यापाशी इतरांपेक्षा श्रेष्ठ, निदान इतरांच्या बरोबरीची असणे आवश्यक आहे. कलहात शिरल्यावर लहानपणाच्या सबबीकडे लक्ष देऊन कोणी कीव करतो अशातली गोष्ट बिलकूल नाही.' 'विष जे आहे ते जाणून खा की नेणून खा, आपला अंमल केल्याशिवाय जसे राहात नाही, तसेच ज्याचे हत्यार त्याचे राज्य हा नियम-कोणाला समजो की न समजो आपले कार्य केल्याशिवाय राहात नाही.' 'राज्ये मिळविण्यास जसा तोफांचा व शिपायांचा उपयोग होतो तसा ती कायम राखण्यास व जतन करण्यास व्याख्यानांचा व विचारी पुरुषांचाही होतो.' 'गुलामांना स्वतंत्र नागरिकांचे शिक्षण कोठे बोलले आहे!' 'जसे ज्याचे तत्त्वज्ञान तसा त्याचा प्रपंच, 'जसा समाज तसे राज्ययंत्र, व जसे राज्ययंत्र तसा समाज' 'ज्या प्रकारचे शिक्षण प्रजेला द्यावे त्या प्रकारची मनोरचना प्रजेची होते.' 'प्रजा ख्रिस्ती करावयाची असल्यास तिला मिशनऱ्यांच्या शाळेत धाडावी.' प्रजा मुत्सद्दी व धोरणी बनवावयाची असल्यास, राजनीती व व्यवहार ह्यांची तत्त्वे तिला बालपणापासून शिकवावी.' विश्वबंधु बनवावयाची असल्यास तिला वेदान्त शिकवावा आणि खुळी निपजाववयाची असल्यास तिला मंत्रशास्त्र व जादूटोणे पढवावे.' वाद्ये वाजविण्यास किंवा भिकार नाटके पहाण्यास येथील प्रजेला मुबलक वेळ आहे, तेथील प्रजा खुळी, परतंत्र व जनानी व झिंगलेली आहे असे खुशाल समजावे.' दुष्काळाने व महर्गतेने पोटभर अन्न न मिळाले तरी चालेल परंतु भांडी विकून व

बायको गहाण टाकून नाटके पहाणारे कारागीर ज्या देशात फार झाले तो देश पक्का वेडा बनला असेल यात बिलकूल शंका नाही.' 'परिस्थितीचे गुलाम होण्यापेक्षा मालक होणे मोठ्या पुरुषार्थाचे कर्म होय.' 'राष्ट्रातील पुढाऱ्यांची व श्रेष्ठ पुरुषांची दानत धुतल्या तांदळासारखी असली तरच इतर सामान्य जनांची नीतिमत्ता मर्यादित राहाते.'

व्यक्तीप्रमाणे राष्ट्रांचाही जीवनप्रवास कधी अंधारातून कधी प्रकाशातून, कधी वादळातून, कधी चांदण्यातून अखंड चाललेला असतो. त्या अंधारयात्रेत वीज चमकावी आणि तिच्या शलाकेने मार्ग उजळावा, त्याप्रमाणे राजवाड्यांचे हे विचार चिरंतन 'मार्गदर्शक' होण्यासारखे आहेत. पण ते पहायला नुसते डोळे असून उपयोग नाही. डोळे हवेत आणि ते ज्ञात्या माणसाचे 'देखणे' डोळे हवेत.

राजवाडे हे जातीनेच नव्हे तर वृत्तीने व कर्मानेही ब्राह्मण होते. त्यांनी एकदा म्हटले होते, 'मी ब्राह्मण आहे म्हणून निःस्पृहवृत्तीने व निर्धनतेने राहून ज्ञानार्जनात आयुष्य दवडीत आहे. माझे हे प्राप्तकर्तव्यच आहे. पैशाचा संचय करणे हे माझे काम नव्हे. हांजी हांजी करणे हा ब्राह्मणधर्म नाही.' राजवाडे यांचे हे म्हणणे अगदी बरोबर होते. 'महाभारतात ' ब्राह्मणाचे तेज कशाने वाढले ' याचे उत्तर देताना, ' निर्लोभत्व, आहे त्यात संतोष मानणाऱ्या ब्राह्मणाने, ' असेच म्हटले आहे, ' यदृच्छालाभतुष्टस्य तेजो विप्रस्य वर्धते ' कनक आणि कान्ता यांचा मोह जिंकण्याच्या उग्र साधनेमुळे राजवाड्यांची चित्तवृत्ती अकलंकित राहून त्यांच्या मनात ज्ञानज्योतीचे निर्लेप स्फुरण ' झाले. त्या चिंतनातून स्फुरलेली राष्ट्राच्या भवितव्याची सत्ये राजवाड्यांनी आपल्या वाङ्मयांतून मंत्रद्रष्टचा ऋषींप्रमाणे सांगितली आहेत. त्यांची चिकित्सा करणे योग्य आहे पण त्यांच्याबद्दल संशय घेणे व त्यांची उपेक्षा करणे हे परिणामी आपणासच बाधक होण्यासारखे आहे. भवभूतीच्या शब्दात सांगावयाचे म्हणजे, 'सत्याचा साक्षात्कार झालेल्या ब्राह्मणांच्या ज्या उक्ति आहेत त्याबद्दल संशय घेऊ नये, कारण त्यांच्या वचनात कल्याणकारक लक्ष्मीचा वास असतो

आणि ते खोटे बोलणे बोलत नाही.'

१९०७ साली एकदा आपले स्नेही 'किरात' ऊर्फ कृष्णाजी लक्ष्मण सोमण यांच्यासह राजवाडे टिळकांना भेटायला गेले होते. 'किराता'ची व टिळकांची चांगली ओळख होती कारण ते केसरी-तील एक जुने प्रसिद्ध लेखक होते, औपचारिक प्रश्न झाल्यावर राजवाडे यांनी प्रत्यक्ष राजकारणात पडण्याची आपली इच्छा टिळकांना सांगितली. तेव्हा टिळक म्हणाले, 'तुमचे इतिहास संशोधनाचे काम झाले काय? झाले असले तर इकडे या. तुमच्यासारख्या झटून काम करणाऱ्या लोकांची आम्हाला जरूरच आहे. खरे वर्कर्स आहेतच कोठे?' नंतर राजवाडे यांनी दादाभाई नौरोजी, लाला लजपतराय, अरविंद घोष, बिपिनचंद्र पाल इत्यादि पुढाऱ्यांबद्दल टिळकांचे मत विचारले ते टिळकांनी अगदी मोजक्या शब्दांत स्पष्टपणे सांगितले. थोडा वेळ बसून 'किरात' आणि राजवाडे जाण्यास निघाले, तेव्हा टिळकांनी राववाडयांना पुन्हा विचारले, 'मग तुम्ही कधीपासून येणार?' टिळकांच्या प्रश्नातच उत्तर होते, की राजवाडे राजकारणात येणार नाहीत हे आपण जाणून आहोत. टिळकांची माणसाची पारख प्रसिद्धच होती. ती राजवाडयांच्याही बाबतीत चुकली नाही हे सांगणे नकोच. कारण राजवाडयांनी तेव्हा काय किंवा पुढे काय राजकारण कधीच केले नाही. आता 'इंडियन अनरेस्ट' लिहिणाऱ्या चिरोलने टिळकांना 'भारतीय असंतोषाचे जनक' ही पदवी दिली, त्याचप्रमाणे राजवाडयांना 'राजद्रोह पसरविण्याची नवीन पद्धत शोधून काढणारे' म्हणून प्रशस्तिपत्र दिले. चिरोलने दिलेले हे दूषण राजवाडयांना टिळकांप्रमाणे अर्थातच दूषण नसून भूषणच आहे. पण ते वस्तुस्थितीला सोडून आहे. का की, राजकारण हा राजवाडयांचा मूळ उद्देश नव्हता त्याच्या साहित्यातून जो युयुत्सु हिंदी राष्ट्रवाद निर्माण करण्याचा त्यांनी प्रयत्न केला त्याचा फार तर प्रचलित राजकारणावर परिणाम झाला असणे शक्य आहे. म्हणून राजकारणाशी राजवाडे यांचा संबंध साक्षात म्हणण्यापेक्षा परोक्ष होता असे म्हणणे अधिक योग्य ठरेल.

एवंच राजकारण हा राजवाडयांचा पिंड नव्हता. ते विचारवंत होते. परंतु, राजकारण न करिताही विचारवंत केवढा देशभक्त असू शकतो याची राजवाडयांइतकी उदाहरणे थोडीच सापडतील. देशभक्त कोणास म्हणावे ह्याची जॉन्सनची व्याख्या आहे, त्याप्रमाणे राजकारणात असणारे देशभक्त असतात, पण असतातच असे नाही, पण राजकारणात नसणारेही देशभक्त असतात. समुद्रात मासे असतातच पण समुद्राच्या बाहेरही मासे असतात. राजकारणातही शिवाजी, काव्हूर, मॅझिनी, बिस्मार्क, चाणक्य, चंद्रगुप्त अशी काही थोडी नावे सोडली, तर शाश्वत असे थोडेच राहते. बाकी सर्व कालचा गोंधळ बरा होता. यातला प्रकार असतो.

राजकारणातही वैचारिक दृष्टचा मौलिक असेल तेच टिकते, बाकी कटकारस्थाने निर्माण होतात आणि विसरली जातात. ' गीतेवरील टिळकांची टीका हेच त्याचे शाश्वत स्मारक होय. स्वराज्याची लढाई फत्ते झाल्यावरही ते टिकूनच राहील. ' असे गांधींनी म्हटले आहे त्यात राजकारणाची अशाश्वती आणि विचारवंताची शाश्वती यातला फरक मोठचा मार्मिक रीतीने दाखवला आहे. तो खरा आहे. राजकारणाच्या रंगभूमीवरील नायक आणि खलनायक, शकार आणि विदूषक आणि सूत्रधार यांच्यावर जेव्हा काळाचा पडदा पडेल, अशी ही तुरुतुरु चालणारी आणि चुरूचुरु बोलणारी केविलवाणी पात्रे जेव्हा अंतर्धान पावतील, तेव्हाही व्यास आणि वाल्मिकी, बुद्ध आणि शंकराचार्य, सॉक्रेटीस आणि प्लेटो याच विचारवंतांचे साम्राज्य पृथ्वीवर नांदताना दिसेल.

राजकारणातली माणसे हवे तेव्हा आणि नको तेव्हाही लोकांच्या डोळयांपुढे असतात. त्यामुळे या ना त्याप्रकारे ती प्रसिद्धच झालेली असतात. विद्वान व विचारवंत हा शोधावा लागतो, कारण ' माझे असतेपण लोपो, नामरूप हरपो, मजझणी वोसपो, भूतजाता ।' हीच मुळी त्याची जगावेगळी महत्त्वाकांक्षा असते. तो शोधायला जातीचा रत्नपारखीच लागतो. ते येरागबाळाचे काम नव्हे. एरवी बहुसंख्यांना अज्ञात असलेले नागपूरचे डॉ. भाऊजी दप्तरी हे विद्वद्रत्न कोल्हटकरां-

मुळ प्रकाशात आले. नाहीतर दाढी पोटभर वाढलेली, कपडे मळकट व केव्हा केव्हा तर फाटकेही व तोंडात अस्सल नागपुरी भाषा. अशा त्या ज्ञानानंदात निमग्न असलेल्या ज्ञानोपासकाची दखल कोण घेतो ! ते एकदा माडखोलकरांना तात्यासाहेब कोल्हटकरांबद्दल म्हणाले, ते खरे होते की, 'अहो, मी म्हणजे सांदीकोपऱ्यात पडलेला एक माणूस पण 'विस्तारा'त आलेला भारतीय युद्धकला वरील माझा लेख वाचल्यावर त्यांनी (कोल्हटकरांनी) मोरमकरांकडून माझा पत्ता कहाडला. मज प्रशंसापर पत्र पाठविले. आणि त्यानंतर नागपुरास आल्यावर माझ्या घराचा पत्ता कहाडीत, ते मज भेटण्यास येथवरी आले. करणग्रंथ लिहिण्यासाठी त्यांनीच माझी शिफारस लोकमान्यां-पाशी केली. नाहीतर, शतकातून एखादेच वेळी निर्माण होणारा असा ग्रंथ तयार करण्यासाठी माझ्यासारख्या माणसाची निवड कोण केली असती ? तात्यासाहेबांच्या ठिकाणी इतकी ज्ञानलालसा आणि गुण-वत्ता होती म्हणून त्यांचा आणि माझा निकट संबंध आला. एरवी दुसरे कोणते साधर्म्य आमच्यात होते ?' खरेच आहे. विद्वानेव विजानाति विद्वज्जन परिश्रमम् न हि वन्ध्या विजानाति गुर्वी प्रसव-वेदनाम् ।' कार्ल मार्क्स जेव्हा जिवंत होता, तेव्हा त्याच्या क्रांतिकारक विचारांमुळे त्याला स्वतःच्या देशातून निर्वासित होण्याची वेळ आली होती. त्याची मुलगी आजारी पडून मेली तेव्हा त्याच्याजवळ अक्षरशः औषधालासुद्धा पैसा नव्हता. ब्रिटिश म्युझियम हे घरच झालेल्या व 'ज्ञानामृतं भोजन' अशी स्थिती असलेल्या ह्या विचारवंताला राज-वाड्यांचे शब्द भाऊजी दप्तरीप्रमाणे लागू पडत होते.' इंग्लंडातही कादंबऱ्यांशिवाय इतर ग्रंथ लिहिणारास अन्नाची मोताद आहे. अशाचे अन्न ब्रिटिश म्युझियम असून तिच्या ज़ोरावरच ते क़ाम करतात.' मार्क्स मेला तेव्हा त्यांच्या प्रेतयात्रेला मोजून बारा लोक हजर होते. पण आज, त्याच्या मृत्यूनंतर शंभर वर्षांनी मार्क्स जिवंत झालेला आहे, आणि त्याचे विचार जगावर सत्ता गाजवीत आहेत आणि जेथे त्याचा जन्म झाला ते गाव साऱ्या जगातल्या यात्रेकरूंचे तीर्थक्षेत्र झाले आहे.

फ्रेंच आणि अमेरिकन राज्यक्रांतीचा अग्रदूत असलेला थॉमस पेन हा कुठे मेला आणि कुठे पुरला गेला याचा कुणाला पत्ताही नाही पण त्याचे विचार हे सगळ्या जगाचे विचार झाले आहेत. आणि म्हणून एका मार्मिक ग्रंथकाराने म्हटल्याप्रमाणे 'सारी पृथ्वी हीच त्याची समाधि आहे.' परंतु, विचारवंताचे कष्ट, त्याग आणि तपस्या यांच्या प्रमाणात तो जिवंत असताना काय किंवा मेल्यानंतरही काय, त्यांच्या कार्याची दखल घेतली जात नाही. चौकाचौकात व गावोगाव राजकीय व सार्वजनिक कार्यकर्त्यांचे पुतळे उभारले जातात पण पंडितांचा, विचारवंतांचा, शास्त्रज्ञांचा, वाग्वीरांचा पुतळा उभारलेला क्वचित दिसतो. आणि जेव्हा तो पुतळा उभारला जातो, तेव्हा वेळ निघून गेलेली असते, न्याय दिला जातो पण त्यात कसलीही शोभा राहिलेली नसते. नाइलाज म्हणून, काळाचे तडाखे खाऊन शहाणपण सक्तीने शिकल्यामुळे, जॉनसन म्हणतो त्याप्रमाणे, मरून गेलेल्या विचारवंताला राष्ट्र कण्हत, कुथत खत्रूडपणाने न्याय देते आणि नाखुषीने त्याचा पुतळा उभारते.

सामान्यतः साऱ्याच विचारवंताच्या कपाळी उपेक्षेची ही तप्तमुद्रा लिहिलेली दिसते. प्रचलित समाजकल्पनांविरुद्ध बंडखोरीची प्रवृत्ती हे त्या उपेक्षेचे जसे एक कारण आहे, तसे शेती, व्यापार, उद्योगधंदे, राजकारण या उत्पादक धंद्यांच्या मानाने लेखक, कवि, विचारवंत यांचे कार्य अनुत्पादक आहे, ही कल्पना लोकांच्या मनात ठाम बसलेली आहे, हेही महत्त्वाचे कारण आहे, ही गोष्ट नजरेआड करता येण्यासारखी नाही. मीमांसेच्या परिभाषेत शेती व कारखाने यांसारखे उद्योग 'दृष्टफळ' आहेत. त्यांची फळे चटकन् येतात व भोगायला मिळतात. विचारवंताचे कार्य 'अदृष्टफळ' आहे. ते अक्रोडांचे बी आहे. आज पेरले तर साठ वर्षांनी फळ येणार. ते पहायला जगणार कोण ? आज शेतकऱ्याने बी पेरले. उद्या पीक आले, मळा शिंपला धरती हिरवीगार झाली. वाळवंटात नंदनवन फुलले. विचारवंतांच्या कार्याचे तसे फल कोणते दाखवता येण्यासारखे आहे ? त्यामुळे 'त्वरित दान महापुण्य' या न्यायाने अंधेरात पडलेल्या विचारवंता-

पेक्षा उजेडात चमकणाऱ्या कार्यकर्त्यांकडे लोकांचा ओढा असावा हे स्वाभाविकच म्हटले पाहिजे.

परंतु जे जे स्वाभाविक असते ते ते बरोबर असतेच असे नाही, किंबहुना, अनेक वेळा ते नसतेच. सोन्याच्या शलाकेप्रमाणे सळसळणाऱ्या नागाशी खेळण्याची इच्छा काळाला झाली तर ते स्वाभाविकच होय, पण म्हणून ती बालबुद्धी शहाणपणाची नव्हे. त्याचप्रमाणे 'कृषिगौरक्ष्यवाणिज्य' हे तेवढे समाजाला उपयोगी आणि तत्त्ववेत्ते आणि विचारकर्ते मात्र समाजाला 'खायला काळ आणि भुईला भार' ही कल्पना स्वाभाविक असली तरी ती शहाणपणाची नव्हे आणि समाजालाही फायद्याची नव्हे. या संदर्भात 'सुत्तनिपातातील' कासिभरद्वाजसुत्तात' बुद्ध आणि शेतकरी यांचा दिलेला संवाद अत्यंत बोधप्रद आहे. एके दिवशी बुद्ध भगवान भिक्षाटन करीत असता भारद्वाज ब्राह्मणाच्या शेतावर गेला. तेथे भारद्वाज ब्राह्मण आपल्या मजुरांना जेवण देत होता. भगवान भिक्षेसाठी उभे आहेत, असे पाहून तो म्हणाला, 'माझ्याप्रमाणे तूदेखील शेत नांगर, पेर, धान्य गोळा कर आणि खा. भिक्षा का मागतोस ?' भारद्वाजाच्या बोलण्यावर बुद्धाने जे उत्तर दिले ते फार विचार करण्यासारखे आहे. तो म्हणाला, 'मीदेखील शेतकरी आहे. मी श्रद्धेचे बी पेरतो, त्यावर तपश्चर्येची वृष्टि होते. प्रज्ञा माझा नांगर, पापलज्जा इसाड, चित्त दोऱ्या, स्मृती नांगराचा फाळ व चाबूक. कायेने व वाचेने मी संयम पाळतो. सत्याच्या योगे मनोदोषांची मी खुरपणी करतो. संतोष माझी सुटी. उत्साह माझे बैल. माझे वाहन अशा दिशेकडे जाते की जेथे शोक करण्याची पाळी येत नाही.' बुद्धाच्या या कथेतील तात्पर्य हे आहे की, उत्पादक व अनुत्पादक या व्यवसायातील श्रेष्ठ-कनिष्ठ भाव व द्वंद्व हा केवळ तर्कदुष्ट पूर्वग्रहांचा कल्पनाविलास आहे. समाजाच्या धारणेला भिक्षा घालणारा शेतकरी जसा हवा आहे, त्याचप्रमाणे ज्ञान देणारा बुद्धही हवाच आहे, कारखाने व पाटबंधारे हवे आहेत त्याचप्रमाणे शास्त्रज्ञ आणि विचारवंत हवे आहेत, कृषिसंस्कृती हवी आहेच पण ऋषिसंस्कृतीही हवी आहेच आहे.

या ऋषिपरपरेतील आपल्या उग्रमंगल तेजाने आणि तपश्चर्येने तळपणारे, केवळ कौस्तुभाप्रमाणे निस्तुल असणारे रत्न म्हणजे राजवाडे होत. 'ऋषिर्दर्शनात' या 'ऋषि' शब्दाच्या धात्वर्थाने ते ऋषि होते, आणि 'दैवी स्फूर्ति झालेली प्रतिभावंत व्यक्ती' या त्यांनी स्वतः दिलेल्या अर्थानेही ते ऋषिच होते. इतिहासकार व तत्त्वचिंतक या नात्याने त्यांनी या भूमीचे भूत आणि वर्तमान यांची सबीज आणि साधारण चिकित्सा केली आणि द्रष्टा या नात्याने तिच्या भविष्याचे 'दर्शन' घेतले. एरवी १९५० साली ब्रिटिश साम्राज्याचा अस्त होईल, हे भविष्य त्यांना चाळीस वर्षे आधी वर्तविता येतेच ना. अशा विचारवंतांची त्यांच्या काळी आणि नंतरही; अगदी आज घटकेपर्यन्त, त्याच्या कर्तृत्वाच्या आणि योग्यतेच्या मानाने झालेली दारूण उपेक्षा हे जाणत्यांच्या मनात सलणारे शल्य आहे. अगदी १९८७ च्या जानेवारीत राजवाड्यांविषयी लिहिताना राजवाड्यांचे ग्रामबंधु धुळ्याचे ग. सि. गरूड लिहितात, 'त्यांचा धातुकोश प्रकाशित होऊन सुमारे चाळीस-पन्नास वर्षे झाली परंतु त्यांचा योग्य तो परामर्श घेण्यास माणूस मिळू नये हे अभ्यासदारिद्र्य महाराष्ट्राला शोभा देणारे खास नव्हे ! व्युत्पत्तिशास्त्रज्ञांना व पंडितांना ते अजूनही अज्ञातच आहे. राजवाडे यांना आम्ही त्यांच्या जिवंतपणी आणि नंतर उपेक्षा आणि अनुल्लेख यावाचून काय दिले? प्रत्येक मराठी भाषकाला राजवाडे यांचा अभिमान वाटला पाहिजे असे सह्याद्रीसारखे त्यांचे कर्तृत्व आणि कार्य आहे. परंतु दुर्दैव असे की, स्वराज्यातही जनतेचे सरकार आणि जनता राजवाडे यांना विसरली आहे. भारताची आणि महाराष्ट्राची नभोवाणी व दूरदर्शन त्यांची दखल घेत नाही. जनता त्यांची दखल घेत नाही. साहित्य परिषदा व विश्वविद्यालये त्यांची दखल घेत नाहीत. त्यांची शताब्दि झाली. पण वरीलपैकी कोणीही त्यांची दखल घेतली नाही. त्यांचे साधे टपाल तिकिट सुद्धा काढले गेले नाही, मग इतर गोष्टींबद्दल बोलण्याचे कारण नाही. समग्र राजवाडे वाङमय अजून अप्रकाशित आहे. मग त्यांचे पुनर्मुद्रण व ते एकत्रित मिळण्याची गोष्टच सोडा !

राजवाडे वाङमयाच्या देशी भाषेतील भाषान्तराची मुळीच सोय उपलब्ध नाही, मग परदेशी भाषेत भाषांतर करण्याची तर कल्पनाच सोडा. राजवाडयांची उपेक्षा अजून चालूच आहे, स्वराज्यात व कल्याणकारी राज्यात ही गोष्ट भूषणावह नाही.'

गरुड यांची ही व्यथा रास्त नाही असे कोणालाही म्हणता येणार नाही. पण उपेक्षा राजवाडे यांची एकटयाची झालेली आहे असे नाही. राजवाडे यांच्याप्रमाणे ज्ञानकोशकार केतकर, प्रियोळकर, विसुर्लेकर, खरेशास्त्री, शेजवलकर, चित्रावशास्त्री अशा विचार-वंताचीही उपेक्षा झालेली आहे. काही प्रमाणात या उपेक्षेचे कारण नुकतेच दर्शविलेल्या कृषिसंस्कृती आणि ऋषिसंस्कृती यांच्याबद्दल समाजाच्या मनाला जे द्वंद्व आहे, त्यात असणे शक्य आहे.

जगात दोनच माणसे आदरणीय आहेत. एक जमिनीची मशागत करून भाकरी देणारा कष्टाळू शेतकरी आणि दुसरा मनाची मशागत करून विचाराचे अन्न आत्म्याला देणारा विचारवंत, असा कार्लाइलच्या म्हणण्याचा भावार्थ आहे. याबाबत भाकरीचा पूर्वार्ध लहान मुलालाही चटकन पटतो कारण तो पोटाचाच प्रश्न असतो, परंतु आत्म्याच्या अन्नाचा उत्तरार्ध मात्र शहाणेसुद्धा जाणून किंवा नेणून विसरतात. व मग राजवाडे किंवा केतकर यांच्यासारखे हिरेमोती गारगोटयाच्या भावाने मोडीत निघण्याची आपत्ती समाजावर कोसळते,

त्यातल्या त्यात खरेशास्त्री किंवा केतकर यांच्या मानाने राजवाडे भाग्यवान म्हणायचे, त्यांच्या हाताने लावले गेलेले भारत इतिहास संशोधक मंडळाचे इवलेसे रोप आज गगनावर गेले आहे. 'तन्मित्रंयत्र विश्वासः!' अशा अलौकिक कोटीतले देव आणि भट यांच्यासारखे मित्र त्यांना लाभले आणि त्यांनी त्यांच्या शेवटच्या इच्छा शब्दशः पाळल्या. त्यांनी संशोधक मासिक काढले, राजवाडयांच्या ग्रंथांचे प्रकाशन केले. राजवाडयांनी जमविलेला हस्तलिखिताचा व वस्तूचा अफाट संग्रह 'अदाह्य' इमारतीत जपून ठेवला. दत्तोपंत पोतदार, आबा चांदोरकर, वा. सी. बेंद्रे असे शिष्योत्तम त्यांना लाभले आणि इतिहासाच्या प्रातांत 'राजवाडे परंपरा' त्यांनी स्थापन केली. राज-

वाडयांचे नावाने 'संशोधन मंदिर' निर्माण झाले आणि हजारात एखाद्या संशोधकाच्या वाटयाला येणारे भाग्य त्यांना मिळाले. त्यांचा पुतळा बसविला गेला. १९५८ साली साहित्य अकादमीने 'राजवाडे लेखसंग्रह' तर्कतीर्थ लक्ष्मणशास्त्री जोशी यांच्या विद्वत्तापूर्ण प्रस्तावनेसह प्रसिद्ध केला. वेळोवेळी दुर्गा भागवत, कां. डांगे, वसंत कानेटकर या विचारवंतांनी राजवाडयांच्या विचारांच्या मौलिक पैलूंचा परामर्श घेतला. सर्वात विशेष म्हणजे १९७६ साली राजवाडयांच्या पन्नासाव्या पुण्यतिथीनिमित्त, राजवाडे वस्तुसंग्रहालय व संशोधन मंदिर या इमारतींचे नूतनीकरण व विस्तृतीकरण झाले, त्याला धुळयातील लहानपासून मोठयापर्यंत सर्वांनी मदत केली. राजवाडयांचे आवाहन सामान्य माणसापर्यंत पोचल्याचा तो पुरावा होता. टिळकांनी एकदा पैसाफंडाबद्दल म्हटले होते, 'पैसाफंड हा मध्यमपदलोपी समास आहे. सामान्य माणसाने पैसा पैसा करून जमविलेला फंड तो पैसाफंड होय.' धुळयाच्या जनतेने जमा केलेला 'राजवाडे निधि' हाही ह्या उदात्त अर्थाने मध्यमपदलोपी समासच होता असे म्हटले पाहिजे.

'प्रसादचिन्हानी पुरःफलानि' या न्यायाने या साऱ्या गोष्टी चांगल्याच आहेत. पण त्या पुरेशा नाहीत. कारण हा प्रश्न राजवाडे या एका व्यक्तीचा नाही. त्यांच्या व त्यांच्यासारख्याच विचारवंतांचा आणि त्यांच्या विचारधनाचा आहे. विचारवंताच्या विचाराची विस्मृति ही व्यक्तीप्रमाणे राष्ट्राच्याही नाशाला 'स्मृतिभ्रंशात बुद्धिनाशो बुद्धिनाशाद्विनश्यति' या गीतावचनाप्रमाणे कारणीभूत होते. विचारवंताचे विचार आणि ऋषीचे वचन हा हसण्यावारी नेण्यासारखा विषय नाही. पाटलीपुत्राच्या धनानंद राजाने तपोधन, मानधन, 'कौटिलीय अर्थशास्त्र' लिहिणाऱ्या चाणक्याचा दरिद्री म्हणून अपमान केला आणि त्याला दरबारातून घालवून दिले. परिणामी 'बुद्धिस्तु मागान्मम' अशी सार्थ मनीषा बाळगणाऱ्या त्या चाणक्याने केवळ आपल्या बुद्धिप्रभावाने नंदांचे साम्राज्य उलथून पाडले. सत्ता, संपत्ती, मदिरा यांनी मदोन्मत्त झालेल्या यादवांनी गालवऋषींची थट्टा केली. त्या थट्टेचे पर्यवसान असे झाले की, सारे यादवकुळ धुळीला मिळाले.

ह्या दंतकथा नव्हेत. हा घडलेला इतिहास आहे. इतिहासात जे एकदा घडले ते अनेकदा घडू शकते. म्हणूनच 'इतिहासाची पुनरावृत्ति होते' असे म्हणतात. राष्ट्रेच्या राष्ट्रे व राज्येच्या राज्ये नष्ट होण्याच्या अशा आपत्तीच्या मुळाशी विचारवंताची उपेक्षा हाच महारोग बहुधा जडलेला दिसून येतो. अशा ह्या कारणाचे कारण असलेल्या सामाजिक उपेक्षेबद्दल राजवाडे यांनी आपल्या अमोघ आणि मंत्रमय वाणीने जे विवेचन केले आहे, त्याचा पुनरुच्चार करून, राजवाडे यांचा निरोप घेऊ.

'आपला हलगर्जीपणा घोर व अक्षम्य आहे. जिचे साहित्य करण्याकरिता आपण जन्मलात, त्या मराठी भाषेपासून पट्टीचा एकोनएक विद्वान पराङ्मुख झाला. वनस्पतिशोधक कीर्तिकर, रोगशोधक राव, प्राचीन शोधक भांडारकर, पंचागशोधक दीक्षित, रामायणशोधक वैद्य, वेदशोधक पंडीत, अतिप्राचीन इतिहासशोधक टिळक, वेदसमाजशोधक कुंटे, भारतीयार्थशास्त्रशोधक रानडे व जोशी इत्यादीप्रभृति झाडून चट सान्या, महाराष्ट्रात जन्मलेल्या पट्टीच्या बुद्धिमंतांनी, स्वदेशात गुणग्रहण करणारे कोणी नाही म्हणून विचारप्रदर्शनार्थ परभाषाद्वार पाहिले. पापाचे धनी बव्हंशाने आपण आहात. स्वदेशात गुणाचे चीज होत नाही, एतदर्थ परभाषार करण्यात ह्या बुद्धिमंतांनीही लहानसहान अपराध केला असे नाही. तथापि स्वदेशात स्वभाषाद्वारा गुणग्रहण होत नाही ही बाब काही विसरता येत नाही. आपण किंवा आपला जन्म होण्यापूर्वीच्या सभा जर गुणग्रहण करण्यास लायक असल्या तर हे शहाणे परभाषाद्वार कशास पाहाते! अधिगत परमार्थ जे पंडित त्याचा जाणून किंवा नेणून अवमान केला किंवा वेळीच परामर्श घेतला नाही तर केवढे भयंकर नुकसान होते, ते कीर्तिकरादी पंडितांच्या वर्तनावरून आपल्या ध्यानात आजपर्यंत यावयास हवे होते, व होतकरू विद्वान हातचा परभाषेत किंवा परलोकात अकाली जाऊ द्यावयाचा नाही असा निश्चय आपण केला पाहिजे होता तो वेळीच करण्याची बुद्धि न झाल्याने आपली गेली शंभर वर्षे केवळ फुकट गेली. जणू काय आपण मृतवत झालो. विद्यावंत,

बुद्धिवंत व प्रतिभावंत व्यक्तीचा अवमान आपल्या जुन्या संस्कृत धर्मशास्त्रात जसा, तसाच नवीन पाश्चात्य समाजशास्त्रातही अत्यंत गर्हणीय व हानिकारक गणला आहे.

॥ अधिगतपरमार्थान् पंडितान् मावमंस्था ॥ असे संस्कृत वचन आहे, व ह्यासारखीच श्रुतिस्मृतिग्रंथात अनेक वचने आहेत. हा संस्कृत उपदेश कदाचित जुनापुराणा भासेल. सबब, एका पाश्चात्य समाजशास्त्राचा उपदेश तरी परप्रत्ययनेयबुद्धिला ग्राह्य वाटण्याचा संभव असेल अशा समजुतीने तो येथे दाखल करतो. समाजशास्त्री लिहितो–

'ज्याच्या ठिकाणी प्रतिभा आणि समाजाभिमुखता याचा संयोग झाला आहे, असे स्त्री–पुरुष वाया जाऊ देण्याइतका अपव्यय अन्य कोणत्याही बाबतीत देशाला परवडण्यासारखा नाही. अशा स्थितीत जे लोक, लोकसंस्थेतील अशा प्रकारची माणसे देहदंड, बंदिवास आणि अशाच प्रकारच्या जुलमांनी जाणूनबुजून नष्ट करतात, त्यांच्याबद्दल काय बोलावे बरे ? समाजशास्त्राने मृत्यू, बंदिवास आणि जुलूम ही तीनच कारणे प्रतिभेच्या नाशाची युरोपातील दिली आहेत. आपल्या देशात प्रतिभाक्षयाचे निराळेच कारण आढळून येते. ते उपेक्षा हे होय. उपेक्षेने तर प्रतिभेचा नाश बेमालूम होतो. आणि प्रतिभेचा नाश म्हणजेच राष्ट्राचा नाश.

आता तरी पुढे हाचि उपदेश
नका करू नाश। प्रतिभेचा ॥ १ ॥



# आम्ही प्रकाशित केलेली
# इतर पुस्तके

## ललित कादंबऱ्या

| | | |
|---|---|---|
| सुरांची वाट | ग. वा. बेहेरे | वीस रुपये |
| श्रीमंत | चिंतामणी लागू | साठ रुपये |
| तुझ्या मना माझ्या मना | चिंतामणी लागू | चौदा रुपये |
| यात्रा | चिंतामणी लागू | तीस रुपये |
| मर्मबंधातली ठेव ही | अनंत मनोहर | तीस रुपये |
| त्या नदीच्या पार वेड्या | अनंत मनोहर | अठरा रुपये |
| अगतिक | अनंत मनोहर | चोवीस रुपये |
| कठपुतळी | अनंत मनोहर | सोळा रुपये |
| नभ मेघांनी आक्रमिले | अनंत मनोहर | सोळा रुपये |
| पाठलाग | अनंत मनोहर | सोळा रुपये |
| विळखा | उषा परांडे | वीस रुपये |
| गौतमी | उषा परांडे | वीस रुपये |
| आता उशीर झाला | आनंद साधले | पस्तीस रुपये |
| तुझी माझी प्रीत | प्र. ह. जोशी | पंचवीस रुपये |

## विनोदी कादंबऱ्या

| | | |
|---|---|---|
| आले देवाजीच्या मना | चिंतामणी लागू | पंधरा रुपये |
| ऱ्हॅकजॅक | राजा राजवाडे | वीस रुपये |
| कुबेर जिंकला | | |
| कुबेर हरला | राजा राजवाडे | अठरा रुपये |
| चंबुगवाळं | राजा राजवाडे | वीस रुपये |
| हुंडा पाहिजे | प्रभाकर तामणे | सोळा रुपये |
| आमचं असं जमलं | प्र. ह. जोशी | वीस रुपये |

## विनोदी कथासंग्रह

| | | |
|---|---|---|
| गडबडगुंडा | विजय कापडी | चोवीस रुपये |
| अधिक खसखस | पद्माकर | |
| पिकवा | गोवईकर | पस्तीस रुपये |
| पेरी मेसनचे भूत | अनंत मनोहर | वीस रुपये |
| बाशिंगबळ | श्यामला | |
| | कुलकर्णी | पंचवीस रुपये |
| बडबड | वि. आ. बुवा | चाळीस रुपये |

## रहस्यमय कादंबऱ्या । भयकथा

| | | |
|---|---|---|
| निशाचरांचं जग | ग. रा. टिकेकर | तीस रुपये |
| अदृश्य युद्ध | पंढरीनाथ सावंत | पस्तीस रुपये |
| एका कोळियाने | अरुण हेबळकर | तीस रुपये |
| वृकमोहिनी | अरुण हेबळेकर | चाळीस रुपये |
| कळसूत्री | निरंजन घाटे | पंधरा रुपये |

## ललित लेखसंग्रह

| | | |
|---|---|---|
| संसारयात्रा | ग. वा. बेहेरे | साठ रुपये |
| आनंदयात्रा | ग. वा. बेहेरे | साठ रुपये |
| निसर्गयात्रा | ग. वा. बेहेरे | साठ रुपये |
| अक्षरयात्रा | ग. वा. वेहेरे | साठ रुपये |
| कल्लोळ | प्रमोद नवलकर | छत्तीस रुपये |
| मनोवेध | प्रमोद नवलकर | तीस रुपये |
| उमाळा | प्रमोद नवलकर | तीस रुपये |
| जिव्हाळा | प्रमोद नवलकर | छत्तीस रुपये |
| सहज | प्रमोद नवलकर | पंचेचाळीस रुपये |
| विरंगुळा | प्रमोद नवलकर | चाळीस रुपये |
| झरोका | लक्ष्मण लोंढे | चोवीस रुपये |
| खिरापत | वसंत मिरासदार | वीस रुपये |
| बाजारात तुरी | माधव अत्रे | बारा रुपये |

# विश्वनाथ काशिनाथ राजवाडे

इतिहासाचार्य या सार्थ गौरवाचे मानकरी ठरलेले, अत्यंत परखड आणि निस्पृह व्यक्तित्त्व.

मराठ्यांच्या इतिहासाची अस्सल साधने शोधण्यामध्ये या बुद्धिमान माणसाने आपले सारे आयुष्य व्यतीत केले.

महाराष्ट्र, मराठी भाषा आणि इथल्या इतिहासाची वाटचाल यासंबंधी आंतरिक आस्था बाळगणारे राजवाडे स्वभावाने काहीसे विक्षिप्त आणि शीघ्रकोपी होते. म्हणूनच कदाचित त्यांनी एकारलेले जीवन स्वीकारले आणि स्वतःची मते लिहिताना निर्भीड बाणा बाळगला.

अशा या व्यक्तित्त्वाचा आणि त्यांच्या असामान्यसाधारण कर्तृत्वाचा हा व्यासंगपूर्ण आलेख – राजवाडे यांच्या विचार-धनाचा परिचय करून देणारा......

रविराज प्रकाशन, पुणे ३०.

28